श्रीसयाजी साहित्यमाला, अंक २२३

# तंजावरचे मराठे राजे



लेखक

विनायक सदाशिव वाकसकर.

राधेयकर्णचरित्र, अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें, शिवाजी व शिवकाल, ९१ कलमी बखर इत्यादि ग्रंथांचा लेखक.

सकलगुणैश्वर्यमंडित, साहित्यप्रेमी, विद्याभिलाषी,

गुर्जराधिपति



श्री मन्महाराज सयाजीराव गायकवाड

सेनाखासखेल, समशेर बहादूर-राज्य बडोदें.

श्री.

# विज्ञापना

आपल्या देशी भाषांतील साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें विद्याभिलाषी श्रीमंत सरकार महाराजसाहेब सयाजीराव गायकवाड, सेनाखासखेल, समशेर बहादूर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. इ., एलएल. डी. यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रक्कम अनामत ठेविली आहे, तिच्या व्याजांतून "श्री सयाजी–साहित्यमाले"तून विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यांत येत असतात.

तदनुसार "**तंजावरचे मराठे राजे**" या नांवाचा ग्रंथ श्रीयुत विनायक सदाशिव वाकसकर, बडोदें, यांजकडून तयार करवून उक्त मालेंतील २२३ वें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

भाषांतर शाखा,
प्राच्यविद्यामंदिर
बडोदें.
१-१०-३३

**मं. र. मजमुदार**
भा. मदतनीस.

**भा. का. भाटे**
विद्याधिकारी,
राज्य बडोदें.

# आधारभूत ग्रंथांची यादी.



१ Shivaji and his Times by sir Jadunath Sarkar Third Edition.

२ History of Marathas by Grant duff

३ History of the Maratha people by Kincaid and Parasnis.

४ सभासदाची बखर

५ ९१ कलमी बखर

६ राजवाडे ८ व १५ असे दोन खंड

# प्रस्तावना

१ मद्रासचे विद्वान इतिहासलेखक श्रीयुत सुब्रह्मण्य यांनीं हें पुस्तक संशोधनपूर्वक लिहिलें असल्याचें श्रीयुत अयंगार या प्रख्यात इतिहासज्ञांनीं आपल्या उपोद्घातांत स्पष्ट म्हटलेंच आहे. अशा या मूळ इंग्रजी पुस्तकाचा हा अनुवाद आहे. तो करीत असतांना अवश्य त्या विशेष माहितींची भर ठिकठिकाणीं घातली आहे. त्या मुळे हें पुस्तक आतांपर्यंतच्या माहितींच्या निष्कर्षरूपानें मराठी वाचकांपुढें ठेवण्याचा प्रयत्न झालेला आहे.

२ तंजावरचा शिलालेख विस्तृत असून तो मराठी भाषेंत खोदविलेला आहे. त्याचें सर्व इंग्रजी भाषांतर श्रीयुत सुब्रह्मण्य यांना न मिळाल्याचे त्यांनीं आपल्या भूमिकेंत लिहिलेंच आहे. तो दुर्मिळ शिलालेख मोठ्या प्रयत्नानें मिळवून मुद्दाम परिशिष्टांत दिला आहे. त्यावरून इतिहास अभ्यासूंना अवश्य तें साहाय्य होईल अशी खात्री आहे. शिलालेखाचा सारांश आरंभीं दिलाच आहे.

३ प्रस्तुत अनुवादक अज्ञानी असल्यानें त्याला या कामीं त्याच्या अनेक विद्वान मित्रांचे साहाय्य घ्यावें लागलें आहे. त्या सर्वांचा तो कृतज्ञतेनें आभारी आहे. मुख्यतः सांगावयाचें म्हणजे या पुस्तकांतील चुकीच्या भागाचा तोच जबाबदार असल्यानें विद्वान् इतिहासभक्त

त्याला सज्ञानी करतील अशी त्याची खात्री आहे. प्रस्तुत पुस्तक बडोद्याच्या भाषांतरशाखेनें प्रसिद्ध केल्यामुळें व छपाइचें काम बडोद्याचे चिरपरिचित श्रीयुत दामोदर शेटजी यांनीं मुंबईस मोठ्या आस्थेनें केल्यामुळें हें पुस्तक इतक्या लवकर प्रकट करितां येत आहे हें लेखकाचें सद्‌भाग्यच होय.

४ पुस्तकांत कांहीं चुका राहिल्या आहेत. पृष्ठ ४९ ते ५५ या सात पृष्ठांपैकीं प्रत्येक विषम पृष्ठावरील मथाळा चुकला आहे. तो '( दुसरा ) शहाजी सन १६८४–१७१२' असा पाहिजे. इतर चुका किरकोळ आहेत.

विजयादशमी.
बडोदें, तारीख
२८–९–१९३३

वि. स. वाकसकर.

# अनुक्रमणिका.

# परिशिष्टें



## चित्रांची यादी

श्री

# तंजावरचे मराठे राजे

## प्रकरण १ लें

### स्थूल निरीक्षण.

#### मुद्दे

१ विजयानगरचें साम्राज्य व दक्षिणेची स्थिति.
२ मुसलमानी सत्तेची आक्रमणशीलता व हिंदूंचा मत्सरीपणा.
३ शहाजी व व्यंकोजी याचें कर्तृत्व.
४ शिवाजीचें कर्तृत्व व मोंगलांची त्रेधा.
५ मोंगलांची सत्ता व निजामाच्या सत्तेचें कारण.
६ कर्नाटकाचे नबाब, मदुरेची व्यवस्था व चंदासाहेबाचा उत्कर्ष.
७ चंदासाहेबाच्या अधिकाराचा ऱ्हास व मराठ्यांचा उत्कर्ष.
८ मराठ्यांचे पराक्रम, मुरारीराव व प्रतापसिंह यांची एकी.
९ निजामाचें पुनरागमन व कर्नाटकाच्या नबाबाची स्थापना.
१० कर्नाटकाच्या सत्तेसंबंधीं भानगडी व निजामाच्या उलाढाली.
११ इंग्रज व्यापाऱ्याविषयीं बार्थोलोम्यूचा अभिप्राय.

**विजयानगरचें साम्राज्य व दक्षिणेची स्थिति.**

तुंगभद्रा नदीच्या दक्षिणप्रदेशावर अलीकडेस सुमारे दोनशें वर्षे पर्यंत जी एकछत्री सत्ता गाजत होती, ती सत्ता विजयानगरसाम्राज्याची होय. त्यापूर्वी तामिळ, चोल वगैरे प्रख्यात राजे तिकडेस होऊन गेले. ( परिशिष्ट १ पहा.) बहामनी सुलतानाच्या दक्षिणेकडील राज्यविस्ताराला प्रतिबंध या नात्यानें हे विजयानगरचें साम्राज्य स्थापन करण्यांत आलें होतें. या साम्राज्यानें जांबुद्वीपाचा दक्षिणप्रांत आश्चर्यकारक त्वरेने व्यापिला. कुमार कंपनापासून अच्युतापर्यंत ( सन १३६५–१५४२ ) सुमारें पावणे दोनशें वर्षांतील अनेक विजेते व आधिराजे यांच्या कारकीर्दींतील पुष्कळ खोदिव लेखाचे अवशेष आजहि दृग्गोचर होतात; त्यावरून हा प्रांत त्याच्या सत्तेखालीं होता असें सिद्ध होतें. कृष्णदेवरायाच्या आधिपत्याखालीं हें साम्राज्य कळसाला पोंचलें होतें. यवनसत्तेपासून अलिप्त राहिलेलें हें साम्राज्य कृष्णदेवानंतर तीस वर्षांनीं संयुक्त शत्रूंनीं लयास नेलें व दक्षिणेकडील सर्वांत भव्य नगर नामशेष होऊन राहिले. संरक्षणाच्या आशेनें हिंदूंचे स्वातंत्र्य दक्षिणेकडेस गेलें होतें, पण तालिकोटच्या सन १५६५ मधील युद्धाने त्याची मृत्युघांटच वाजविली. तथापि, यानंतर नायक व मराठे यांनी कांहींकाल स्वातंत्र्य उपभोगिले, परंतु तेहि अल्पजीवीच झाले. त्यामुळें सर्व दक्षिणहिंदुस्थान प्रथम यावनी अमलाखालीं व नंतर आंग्लसत्तेखाली कायमचे गेलें. विजयानगरच्या साम्राज्यांत मोडणारी जिंजी, तंजावर, मदुरा (परिशिष्ट २) व म्हैसूर हीं संस्थानें त्या साम्राज्याचा नाश होतांच स्वतंत्र होऊन पुढे लवकरच दक्षिणेचे सुल्तान व उत्तरेचे मोगल यांच्या आधिराज्यात प्रविष्ट झाली. विजयानगरची साम्राज्यसत्ता प्रचलित असतांना त्या सत्तेतील ज्या मांडलीकांना विजयानगराच्या राजाधिराजाचे पादत्राण शिरोधार्य समजण्यांत भूषण वाटत

असे, त्या मांडलीकांची पुढें कांहींहि मदत विजयानगराधिपतीला अवनतीच्या प्रसंगीं झाली नाहीं. तथापि, शिवाजीच्या दयार्द्रबुद्धीच्या व आश्रयाच्या आधारावर विजयानगराचें राज्य सन १६७६ पर्यंत जीव धरून राहिलें होतें.

**मुसलमानी सत्तेची आक्रमणशीलता व हिंदूंचा मुत्सद्दीपणा.**

२ विजयानगरच्या साम्राज्याला रसातळाला पोंचविण्यासाठीं दक्षिणेंतील पांच बहामनी सुलतान एक झाले होते. त्यांतील विजापुर व गोवळकोंडा येथील सुलतानांनाच आपल्या राज्याचा विस्तार दक्षिणेकडेस करण्यास पुरेसें सामर्थ्य होते. शिवाजीचा पिता शहाजी भोसले यानें विजापुरी फौजेंतील सरदार रणदुल्लाखान याचा दुय्यम अंमलदार अशा नात्यानें दुर्बळ व निवारसी झालेल्या विजयानगरच्या साम्राज्यातून रस्ते बनवून म्हैसूरचा एक भाग व वेलोर आणि जिंजी हे प्रदेश सन १६३८ मध्यें विजापुरी सुलतानाच्या नांवाखालीं, परंतु स्वतःच्या वंशजासाठीं हस्तगत केले. वेलोर व जिंजी हे प्रदेश हस्तगत करण्यास मदुरेच्या तिरुमल नायकानें शहाजीस सहाय्य करून विजयानगरच्या साम्राज्याची अप्रतिष्टा करण्यांत समाधान मानिलें. विजयानगरचे साम्राज्यमनोरथरूपीं पिशाच्च दुर्बळ व असाहाय्य झालें होते. त्याला फक्त तंजावरच्या नायकांचाच आश्रय होता. असें हें पिशाच्चसुद्धां मदुरेचा नायक व म्हैसूरचा उडियार यांच्या ठिकाणची स्वार्थी स्वातंत्र्यलालसा नष्ट करूं शकलें नाहीं. आपल्या धन्याविरुद्ध मुसलमानाना बोलाविण्यांत मदुरेच्या तिरुमल नायकाला यत्किंचितूहि किंतु वाटला नाहीं. उडियार राजांनीं आपली सत्ता हळूं हळूं व इतरांना न कळत वाढविली. त्यांची स्वार्थांधता व कलहप्रियता यांजवर दाब ठेविण्यासाठींच विधिघटना म्हणून मुसलमानांची सत्ता जणूं त्यांच्या प्रदेशमर्यादेवरच उभी होती.

**शहाजी व व्यंकोजी यांचें कर्तृत्व.**

३ बेडकांना जसा ओंडक्याच्या ऐवजी बगळा राजा मिळाल्याची काल्पनिक कथा इसापानें लिहून ठेविली आहे, तसाच प्रकार विश्वास घातकी कपटपटू दासाचा ठरलेला आहे. म्हणजे त्यांस विद्यमान् धन्याच्या ऐवजीं दुसरा धनि मिळतो, इतकेंच. विजापुराच्या सुलतानास खडंणी देण्यास शहाजीनें तंजावर व मदुरा येथील नायकांना भाग पाडिलें. सन १६६३ मध्यें विजापुरी फौज त्रिचनापल्ली पर्यंत जाऊन धाकानें कर वसूल करती झाली. शहाजीनें आदिलशहाच्या नांवावर म्हैसूरचा जो भाग जिंकला होता तो शहाने शहाजीस देऊन टाकिला. सन १६६४ मध्यें शहाजीच्या मृत्यूनंतर ही म्हैसूरची जहागीर व्यंकोजी किंवा एकोजी यास मिळाली. हा एकोजी शहाजीच्या द्वितीय पत्नीचा पुत्र होय. शहाजीचा एकहि पुत्र भित्रा किंवा दुर्बळ नव्हता. तंजावरच्या नायकांचें म्हैसूरवर जे स्वामित्व होतें तें व्यंकोजीने स्वतःस प्राप्त करून घेतले होते.

**शिवाजीचें कर्तृत्व व मोंगलांची त्रेधा**

४ हिंदुस्थानच्या विस्तृत इतिहासपटावर मराठी सत्तेचा उदय व उत्कर्ष हीं एक आश्चर्योत्पादक घटना होय. शहाजीचा पुत्र शिवाजी याने स्थापन केलेलें मराठ्यांचे राज्य हे दक्षिणेतील सुलतान व उत्तरेकडील मोगल बादशहा यांच्या कुशींत तीक्ष्ण शल्याप्रमाणें होते. मोगलांनी विजापुर व गोवळकोंडा हीं राज्यें जिंकल्यावर त्याचा मराठ्याशी निकट संबंध आला. महाराष्ट्रांतील मराठ्यांची सत्ता ढांसळल्यावर त्यांनी प्रतिकाराचें केंद्र जिंजीस नेऊन राजाराम आणि ताराबाई यांच्या धाडसी नेतृत्त्वाखाली मोगली सत्तेचा प्रतिकार केला.

**मोंगलांची सत्ता व निजामाच्या सत्तेचें कारण.**

५ अनेक वर्षे चाललेला जिंजीचा वेढा सन १६९८ मध्यें संपला व कावेरी आणि वइगई या नद्यांच्या दुआबात आपल्या पादुकांचें पूजन होण्याइतका मान आपणांस मिळाला हेंहि वृद्ध **औरंगजेबाच्या** दृष्टीस पडलें. जिंजीचा वेढा चालू असतांना **झुलफिकारखानानें** कर्नाटकाच्या सर्व भागावर खंडणी बसविली. झुलफिकारखानानंतर मोगलांच्या दक्षिण हिंदुस्थानाच्या फौजदाराच्या हुद्यावर **दाउदखानाची** नेमणूक झाली. दक्षिण हिंदुस्थानांत नवीन जिंकलेल्या प्रदेशातून वसूल उत्पन्न करण्याचें काम त्यानें नियमितपणानें फार चोख बजाविलें. सन १७०७ मध्यें **औरंगजेबाचा** मृत्यु झाल्यावर दोनच कारकीर्दीमध्यें सर्व दक्षिण हिंदुस्थान दूरच्या मोगली साम्राज्यातून विभक्त होऊन तत्त्वतः स्वतंत्र झाले. या दक्षिण हिंदुस्थानची प्रत्यक्ष मालकी **निजामाकडेस** आली. त्याच्या ताब्यात कांही हिंदु राजे व तीस नबाब आले. यापैकींच कर्नाटकाचा मुख्य हा एक होता.

**कर्नाटकचे नबाब, मदुरेची व्यवस्था व चंदासाहेबाचा उत्कर्ष.**

६ **सादतुल्लाखान** हा सर्वमान्य व क्रमानें पहिला असा कर्नाटकाचा नबाब होय. (सन १७१०–१७३२) **दोस्तअल्ली** हा या सादतुल्लाखानाचा दत्तक पुत्र असल्यानें तोच वारस झाला. **निजाम उल्मुल्क** व हा **दोस्त अली** यांच्यांत मुळींच रहस्य नव्हतें. त्यामुळें, दिल्लीच्या भानगडीच्या राजकारणात **निजाम** अगदीं गर्क होऊन गेला असतांना, **दोस्त अल्लीनें** त्या स्थितीचा फायदा घेतला. तंजावरचे **मराठे**, मदुरेचे **नायक**, रामनदचे **मरवे**, व म्हैसूरचे **उडियार** या संस्थानिकांकडून तरवारीच्या धाका-

शिवाय खंडणी वसूल होत नसे. आपल्या कुटुंबाचें पाषणे परभारें या संस्थानिकांकडून व्हावें या हेतूनें पुत्र सुबदरअल्ली व जामात चंदासाहेब यांना दोस्त अल्लीनें दक्षिणेकडेस विजय मिळविण्यासाठीं पाठविलें. मदुरेचें राज्य त्याच्या आटोक्यांतील शेवटचें होतें. तेथील राजा चोक्कनाथ याच्या मृत्यूनंतर तेथें मीनाक्षी ही राणी राज्य करीत होती. विश्वासघात व डावपेंच यांच्या जोरावर चंदासाहेबांनें सन १७३६ मध्यें मीनाक्षी राणीला राज्यावरून दूर केलें ( परिशिष्ट ३ पहा. ) व चंदासाहेबाच्या भावानें केरळपर्यंत स्वाऱ्या करून विभक्त असलेल्या पाळेगाराना जिंकिलें.

**चंदासाहेबाच्या अधिकाराचा ऱ्हास व मराठ्यांचा उत्कर्ष.**

७ चंदासाहेबाच्या सत्तेचा उत्कर्ष लक्षांत घेऊन नबाब दोस्त अल्लीनें त्याला दिवाणाच्या पदावरून कमी केलें. मदुरेचें राज्य खालसा करण्याइतका मुसलमानी सत्तेचा उत्कर्ष पाहून दक्षिण हिंदुस्थानांतील हिंदु राजांनीं मराठ्यांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला. पहिला पेशवा बाळाजी विश्वनाथ (सन १७१४–१७२०) याच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांची सत्ता पुनरुज्जीवित झाली होती व ते इसवी सनाच्या अठराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास सर्व हिंदुस्थानावर वर्चस्व मिळविण्याच्या विचारांत होते. सत्तेची वृद्धि व मुसलमानांना तिची जाणीव करून देणें या दोन गोष्टी करण्याला मराठ्यांना ही संधी उत्तम प्राप्त झाली.

८ मराठी सैन्यानें सन १७४० मध्यें विजयामागून विजय मिळविले. कर्नाटकचा ( दुसरा ) नबाब दोस्त अल्ली याचा पराभव होऊन तो मृत्यु पावला. चंदासाहेबाला कैद करून राजबंदी या

नाल्यानें साताऱ्यास नेण्यांत आलें. त्रिचनापल्लीचें राज्य **मीनाक्षी** व **चंदासाहेब** याना लागोपाठ मिळालें. पण चारच वर्षांत तिसऱ्या स्वामीच्या ताब्यांत तें गेलें. गुटीचा **मुरारीराव** हा त्यावेळीं लुटारू म्हणून प्रसिद्ध होता. या लुटीच्या धंद्याला तो काळ मोठ्या किफायतीचा होता. तंजावरचा **प्रतापसिंह** हा या **मुरारीचा** मित्र होता. या **प्रतापसिंहाच्या** ताब्यात चौदा हजार लोकांचे सैन्य होतें. **मुरारी** व **प्रतापसिंह** हे दोघेहि मराठ्यांस मिळाले. तो काळ मराठ्याच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखा होऊन गेला. त्या काळीं मराठीसत्तेचें केन्द्र साताऱ्यास असून तेथूनच मराठ्यांच्या सत्तेच्या सूत्रांना चालना मिळत असे. अशा वेळीं तंजावर व त्रिचनापल्ली येथील मराठासत्ताधीश एक होऊन सातारच्या छत्रपतीच्या अंकित झाले असते तर दक्षिणहिंदुस्थानांत त्यानी फार महत्त्वाची कामगिरी केली असती. परंतु तसा योगायोग नव्हता असें म्हणावें लागतें.

**मराठ्यांचें पराक्रम, मुरारीराव आणि प्रतापसिंह यांची एकी.**

९ कर्नाटकचा नबाब **सुबदरअल्ली** याचा सन १७४२ मध्यें खून झाल्यावर त्याचा मुलगा त्याचे गादीवर आला. यावेळीं दिल्लीच्या भानगडींतून **निजाम** मुक्त झाला होता. तो अर्काट येथें गेला. त्याने **सुबदरअल्लीच्या** मुलाच्या ऐवजीं दुसऱ्या नबाबाची नेमणूक करून मराठ्याजवळून त्रिचनापल्ली हस्तगत केली. कर्नाटकात दुसऱ्या नबाबाची रीतसर नेमणूक झाल्यावर लवकरच त्याला विषप्रयोग झाला, म्हणून निजामानें त्याच्या जागीं **अन्वरुद्दीनची** नेमणूक सन १७४४ मध्यें केली.

**निजामाचें पुनरागमन व कर्नाटकच्या नबाबाची स्थापना.**

**कर्नाटकाच्या सत्ते- संबंधीं भानगडी व निजामाच्या उलाढाली**

१० या समयांत नशीबाचा चरखा निराळेंच सूत कांतीत होता, व त्याचें एक स्वतंत्र वस्त्र विणले जात होते. या वस्त्राच्या जाळ्यांत हे दक्षिणेकडील सत्ताधीश बेसावधपणानें गुरफटले जाऊन त्यांना प्रस्तुत युगांत त्या जाळ्यानें **आंग्ल-सत्तेखालीं** खेंचून आणिलें. सन १७४९ मध्ये कर्नाटकचा नबाब **अन्वरुद्दिन** हा मृत्यु पावला. त्यानंतर महंमदअल्ली हा नबाब झाला. तो **महमंदअल्ली** व **चंदासाहेब** यांचे वैर व सन १७४८ मधील **निजा-माच्या** वारसांतील तंटा, फ्रेंच व इंग्रज यांनीं घेतलेले निरनिराळे पक्ष, कर्नाटकमध्ये **महमंदअल्ली** व इंग्रज यांचे विजय हे प्रकार हिंदुस्थानच्या अलीकडच्या इतिहासांत प्रारंभींचेच असल्यानें सर्वप्रसिद्धच आहेत.

**इंग्रज व्यापाऱ्यांविषयीं बार्थालोम्यूचा अभिप्राय**

११ **महमंदअल्ली** फक्त नामधारी नबाब असल्याने दुसऱ्याच्या हातांतील बाहुलें होऊन राहिला होता. इंग्रज ( कंपनीच्या ) व्यापाऱ्यांच्या मेहरबानीमुळें त्याला राज्य प्राप्त झालें. कर्नाटक प्रांत इंग्र-जांच्या सत्तेखालीं येण्याला क्लाइव्ह व **वेल्स्ली** यांचें दूरदर्शित्व व राजकारण मुख्य असल्यानें त्यानांच धन्यता देणे प्राप्त आहे. जे इंग्रजलोक फक्त व्यापाराच्या लालसेनें हिंदुस्थानांत आले त्याना एतद्देशीय राजकारणांत प्रविष्ट होण्याला तत्कालीन राजकारणविषयक तर्कपरंपरा व प्रांतसंबंधीं लालसा मुख्यतः कारणीभूत होत. आणि परमेश्वरी इच्छेनुरूप पूर्वोक्त आधारावर इंग्र-जांनीं आसेतुहिमाचल असें एक समर्थ साम्राज्य स्थापन केलें. अठ-राव्या शतकांत इंग्रजी राजकारणाचें शब्दचित्र **बार्थालोम्यूच्या** लेखांत चित्रित केलें आहे त्याचें भाषांतर या पुढें देतों. सदर प्रवासी

सन १७७६ पासून १७८९ पर्यंतच्या अठरा वर्षांच्या काळांत हिंदुस्थानांत आला होता. तो म्हणतोः—

" हिंदुस्थानांत इंग्रज लोकांना प्रथम व्यापारी म्हणून वास्तव्य करिता येतें. ते कोणालाहि न कळत आपली सत्ता वाढविण्याचा प्रयत्न करितात. व्यापारांत मिळालेल्या सवलतींनीं त्यांची तृप्ती होत नाहीं, म्हणून ज्या राजानीं त्यांना आश्रय दिला असेल त्याच्याच हिताविरुद्ध ते स्वतःच्या हिताची तरफदारी करितात. अशा निर-निराळ्या राजांना परस्पराशीं युद्धप्रवण करण्यास त्यांना साधनेहि तत्काल प्राप्त होतात. मागाहून मोबदला मिळावा म्हणून कित्येक वेळां ते त्या राजांना मदतहि करितात. कित्येक वेळां ते दोन राजांत कलह उत्पन्न करून वितुष्ट आणितात किंवा त्यांच्या राजकीय संबं-धांत घोंटाळे उत्पन्न करण्याचा प्रयत्न करितात. सारांश, ज्या प्रदेशा-वर त्यांचा डोळा असतो तो प्रदेश त्यास प्राप्त होईपर्यंत ते स्वस्थ बसत नाहींत. "

## पहिल्या प्रकरणाचे आधारभूत ग्रंथ.

1 Dr. S. K. Iyengar. Sources of Vijayanagar History, Introduction.

2 Mr. Krishna Sastri : The Later Vijayanagar Emperors ( Arch--Survey of India Rep 1908-of and 1911-12 )

3 Rev. Heras : The Aravidu Dynasty chs 7. and 9.

4 Dr. S. K. Iyengar : Ancient India chs II

5 Justic Ranade ; Rise of Maratha power ch. 12.

6 Prof. Sarkar : Aurangzeb vol. V ch. 1.

7 Grose ; A voyage to the East Indies 1750-64 Vol 2 Introduction.

8 Orme: A history of the military transaction in Hindustan Vol 1.

9 Copies of Papers relative to the restoration of the King of Tanjore, Vol 3 P 56 see Pratap Singh's letter of 1762 about theNaveails (connemara library, Madras )

10 Bartelomeo: A voyage to the East Indies P. 49-50.

# प्रकरण २ रें

## तंजावरांत मराठी राज्याची स्थापना

### मुद्दे

१ तंजावराकडील प्रदेशाचे नैसर्गिक गुणदोष.
२ चोल राजांची असाहाय्य स्थिति.
३ एका क्षत्रपाचा राजद्रोह व बदली.
४ तंजावर मदुरा येथील संस्थानिकांचा कलह.
५ शहाजीनें जिंजी कशी काबीज केली.
६ विवाहविषयक बोलण्यावरून मदुरा व तंजावर येथील राजाचें भांडण.
७ विजयराघवाचे अनेक विवाह व युद्धांत त्याचा मृत्यु.
८ चोक्कानें मदुरेची सत्ता धारण केली;
९ बालराजपुत्राचा बचाव, वेंकन्नाचें राजकारण व आदिलशहाकडेस मदतीची मागणी.
१० अलगिरीचा पराजय आणि वेंकाजीचा पराक्रम.
११ तंजावरास एकोजीची स्थापना व कपटी तेलगू ब्राह्मणाचें पलायन.
१२ तंजावरांतील ज्ञानयुगाची परंपरा व अभिवृद्धि.
१३ राजांची अदलाबदल व राज्यकारभाराशीं प्रजेची फारकत.
१४ कायमची राज्यव्यवस्था अद्यापि अस्तित्वांत यावयाची होती.

**तंजावराकडील प्रदेशाचें नैसर्गिक गुणदोष**

कावेरी नदीच्या मुखाजवळील प्रदेश हा वैभवशाली सुधारणेचें माहेर म्हणून आजहि प्रसिद्ध आहे. तो प्रांत निसर्गतःच सुपीक असल्यामुळे तेथील जनतेला जमिनीच्या मशागतीसाठीं फारसा वेळ खर्च करावा लागत नाहीं. अर्थात् अशा रीतीनें मिळालेला सर्व वेळ

प्राचीनकाळापासून जनतेने कलाकौशल्याची व सरस्वतीदेवीची उत्तम रीतीनें समृद्धि करण्यात घातलेला आहे. तेथील आर्यसमाज यवनसंस्कृतीला प्रदेशतःच फार दूर राहिल्यामुळें त्यानें आपली संस्कृति व कलानैपुण्य याचें संगोपन उत्तम रीतीनें केलें. परंतु तंजावरासारख्या लहान संस्थानाला स्वतःचे स्वातंत्र्य संभाळीत असतां बुद्धिमत्ता किंवा कलाभिज्ञता याचा स्वतःस काहींहि उपयोग न होता स्वतःभोवती अनेक मत्सरी शेजारी उत्पन्न होणें अपरिहार्य झालें. तिकडील सुपीक जमीन व आल्हादकारक वातावरण याच्या योगाने राजा व प्रजा दोघेहि सुखाधीन झाले. मध्यवर्तीं राजसत्तेला ते लोक अगदींच मुकल्याने उच्च प्रकारचा देशाभिमान त्यांच्या ठिकाणीं वास करीत नव्हता. व म्हणूनच स्वातंत्र्य संरक्षणार्थ लागणाऱ्या शारीरिक बलाची जोपासना तेथील राजाकडून मुळींच झाली नाहीं.

**चोल राजांची असाह्याय्य स्थिति.**

२ लष्करी सामर्थ्याच्या उणीवीमुळें हे तंजावरचें संस्थान अवनतीला पोचून शेंघटीं खालसा झालें. जरी शेवटच्या मराठी राजाजवळ प्रचंड फौज असती व तो स्वतः मोठा शूर असता आणि त्यानें पुढील पिढीला एखादा **लिओनिडास** दिला असता तरीहि तंजावरच्या स्वातंत्र्याचें संरक्षण त्यावेळीं सुद्धां झालें नसतें. विजयानगर-साम्राज्यविस्ताराच्या लाटेपुढें शेवटचा **चोलराजाहि** त्या अपरिहार्य घटनेला शरण गेला असता. कारण त्याचीं साधनें भिकार होतीं व त्याला साहाय्यकर्तेंहि मिळणें शक्य नव्हतें. सर्वांवर कळस म्हणजे त्याला राज्यकारभाराच्या कांहीं आधुनिक सुधारणेशीं सतत झगडावें

लागलें हा होय. त्या आधुनिक सुधारणा इतक्या नूतन आणि म्हणूनच अपूर्व होत्या की, हिंदुस्थानांतील तत्कालीन इंग्रजांनासुद्धां त्या सुधारणा अडचणीच्या वाटून त्यांना तोंड देतां देतां पुरेवाट झाली होती.

**एका क्षत्रपाचा राजद्रोह व त्याची बदली.**

३ सन १८०० मध्यें तंजावरच्या शेंवटच्या आधिपतीने काहीं नियमित वार्षिक वेतन घेऊन इंग्रजांना आपल्या राज्याची सत्ता अर्पण केली. तंजावर येथें नायकांनीं सव्वाशें वर्षांवर राज्य केलें, पण सन १६७६ मध्ये पहिल्या मराठी राजाने ( **वेंकोजीनें** ) त्यांच्यापासून तंजावरची राज्यसूत्रें हरण करून आपल्या हातीं घेतली. **बुक्करायाचा** पुत्र कुमार **कंपन** याने दक्षिण हिंदुस्थान जिंकिले व आपली सत्ता विजयानगरास स्थापन केली तेव्हांपासून **कृष्णदेव रायाचा** भाऊ **अच्युत** याच्यापर्यंत तंजावर प्रांतावर वेळोवेळी सुभेदाराच्या नेमणुका विजयानगराहून होत असत, व तिकडील राज्यव्यवस्था चालत असे. सन १४२४ मध्ये दुसऱ्या **देवरायाच्या** कारकीर्दीत **मादन्ना** हा विजयानगरच्या चोलराजांनीं नेमिलेला तंजावर प्रांताचा सुभेदार होता. मुख्य क्षत्रप **नागम्मा** यानें **पंडनाचें** राज्य बळकाविलें होते. त्या पंडनाच्या साहाय्याने **कृष्णाच्या** ताब्यातील वीर **नागम्मा** या क्षत्रपानें साम्राज्याविरुद्ध बंड केलें. **अच्युतानें** बंडखोरांचे पारिपत्य करून त्याच्या जागीं **विश्वनाथाची** नेमणूक केली. क्षत्रप या नात्याने **विश्वनाथाचें** दक्षिणहिंदुस्थानासंबंधीचें प्रेम **नागम्मासंबंधी** अपत्यप्रेमापेक्षांहि श्रेष्ठ होतें. पुढे, त्याच्या ताब्यांतील प्रांतांपैकी तंजावरचा प्रांत निराळा करून तो **शिवाप्पास** दिला. हा **शिवाप्पा** माजी विजयानगरसाम्राज्याधिपतीचा साडू होता.

**तंजावर व मदुरा येथील संस्थानिकांतील कलह.**

४ आपल्या साम्राज्याधिपतिविषयीं प्रशंसनीय निष्ठावंत असण्याचा सद्गुण तंजावरच्या **नायक** राजांमध्यें होता. हा सदगुण इतर संस्थानिकांत मात्र नव्हता. तालीकोटच्या युद्धानंतरहि तंजावरचे राजे चंद्रगिरीचा क्षत्रप (Viceroy ) जो **व्यंकट** त्याशीं राजनिष्ठ होते. सन १५८६ मध्यें **व्यंकट** हा साम्राज्याधिपति झाला तेव्हां **शिवाप्पाचा** नातु व वारस हा आपल्या साम्राज्याच्या छत्राखालीं मदुरेच्यानायकाशीं सिंहाच्या शौर्यानें लढला. हा मदुरेचा नायक फारच दुष्ट होता. सन १६१४ मध्यें तो गादीवर आल्यानंतर त्याने सम्राटाच्या वारस पुत्राचें स्वागत केलें. तंजावरचा राजा दुसरा **श्रीरंग** याने वैरी सरदारांच्या कटाला शौर्यानें तोंड देऊन त्या अनुजीवित वारसाला त्याच्या पूर्वजांच्या सिंहासनावर बसविलें. मदुरेच्या नायकाचें व याचें वैर कायमचें राहण्याला याची प्रखर राजनिष्ठाच कारण होय. **कारिकालाच्या** वेळेपासून तंजावरची भरभराट कावेरी नदीच्या धक्क्याच्या आधारावर अवलंबून होती. जिंजी, सोलग व पोर्च्युगीज या मुख्य त्रिकुटाचें **रघुनाथांशीं** वैर होतें. मदुरेच्या नायकाने आतांच सांगितलेल्या त्रिकुटाची मैत्री संपादन करून मागे कथन केलेला कावेरीचा धक्का जमीनदोस्त केला. हें पाहून साहाय्यकर्त्याच्या जोरावर **रघुनाथानें** त्या त्रिकुटावर चालून जाऊन आनिकट जवळ टोपूर येथें त्याचा पराभव करून त्याला पळवून लाविलें.

**शहाजीनें जिंजी कशी काबीज केली ?**

५ सन १६४६ मध्यें विजयानगरचा राजा **श्रीरंग** हा बेदनूर येथें पळून गेला, त्याबरोबरच विजयानगरचा इतिहासहि या वेळेपासून बंदच झाला. विजयानगरचा सम्राट् सन १६४० मध्यें जिंजीच्या बंडखोर

मुख्याचा समाचार घेण्यास गेला होता. जिंजी येथील आपल्या मुख्याच्या विरुद्ध लढण्याला मदुरेच्या त्रिमूल नायकानें गोवळकोंड्याच्या सुलतानाला बोलाविलें व मुसलमानी सैन्य आपल्याविरुद्ध येत असलेले पाहून तो जिंजीचा मुख्यहि पळून गेला. त्यामुळें गोवळकोंड्याच्याच्या सुलतानाला सहज विजय प्राप्त झाला. या सुलतानाचे जिंजीसंबंधीं कांहीं दुष्ट हेतु होते ते त्रिमूलाच्या लक्षांत येतांच त्यानें अदूरदर्शीपणानें गोवळकोंड्याच्या सुलतानाविरुद्ध विजापुरच्या सुलतानाला म्हणजे एकाच्या विरुद्ध त्याच्याच दुसऱ्या धर्म बांधवाला पाचारण केले. विजापुरकरानी कांही त्रिमूल नायकाचा नफा केला नाहीं. विजापुरकरातर्फे शहाजीनें जिंजीचा प्रांत काबीज केला व तंजावर आणि मदुरा यांवर खंडण्या मात्र बसाविल्या.

**विवाहविषयक बोलण्यावरून मदुरा व तंजावर येथील राजांचें भांडण.**

६ रघुनाथाचा मुलगा विजयराघव विजयानगरच्या गादीवर असताना ( विजापुरच्या ) सुल्तानाला शरण गेला व खंडणी देण्याचे त्याने कबूल केलें. त्याचा शेजारी मदुरेचा चोक्कनायक याने त्याच्याशी दोन लढाया केल्या. पहिली लढाई सन १६६४ मध्ये झाली. त्या लढाईत तंजावर व जिंजी येथील मुख्य आणि मदुरेचे दलवाय यांचें त्रिकूट एक झालें होतें. दुसरी लढाई मात्र सन १६७३ मध्यें एकदम उपस्थित होऊन उभय पक्षांना हानिकारक झाली. तंजावरच्या राजकन्येचा मदुरेच्या चोक्कराजपुत्राशी विवाह ठरावा किंवा न ठरावा हा वादाचा मुद्दा होता. ( मदुरेच्या ) चोक्कराजपुत्राला आपली कन्या पत्नी म्हणून देण्याला ( तंजावरचा ) नायक सिद्ध नव्हता. व चोक्काला मात्र ती मलगी आपल्या घराण्यांत येणें इष्ट वाटत होतें. अशा या

मतभेदामुळें **चोक्क** व **नायक** या दोन पक्षांत तंटा उपस्थित होऊन युद्धप्रसंग ओढवला. हें दर्शनी कारण असलें, तरी या दोन राजांचें वैर अनेक पिढ्यांचें होतें हें मुख्य कारण होय.

**विजयराघवाचे अनेक विवाह व युद्धांत त्याचा मृत्यु.**

७ विलक्षण व भयप्रद असा शत्रु विजयानगरच्या गोपुराशीं मूर्तिमंत दृग्गोचर होईपर्यंत विजयानगरचा राजा **विजयराघव** हा देवपूजा करण्यांत तनुमनोधनेंकरून गर्क होऊन गेला होता. सन १६७३ मध्यें शत्रूनें वालम नगर हस्तगत केलें व नंतर तंजावराला वेढा घातला. तंजावरचा सेनापति व सैनिक यांच्यामध्यें प्रेम नसल्यानें राजाला फौज सोडून गेली व तो अगदी एकाकी झाला असें **मनुची** म्हणतो. **विजयराघवानें** आपल्या अंमलदाराच्या बायका व मुली भ्रष्ट करून आपल्या जनानखान्यांत त्यांपैकीं कांहींना कायमचे ठेविलें होतें. या राजाच्या विवाहित स्त्रिया सातशे व उपपत्न्या पंधरा हजार तीनशे होत्या. म्हणजे पौराणिक कृष्णाची या बाबतींत बरोबरी करण्याला फक्त एकशेंआठच स्त्रियांची उणीव दिसते. असो, या भक्तशिरोमणि **विजयराघव** राजाची राहणी याप्रमाणें होती. याने आपल्या पुत्रालाही कैदेंत ठेविले होतें. या पुत्राचें नांव **मन्नरु** होतें. हा राजपुत्र मोठा बुद्धिशाली व आनंदी होता. शत्रुसैन्य विजयानगरावर चालून येऊन त्या सैन्यानें लढाईस सुरुवात केली. या लढाईंत शत्रुसैन्याची सरशी पाहून मदुरेच्या **चोक्काला** राजकन्या मिळूं नये म्हणून **विजयराघव** राजानें आपला सर्व जनानखाना तोफांनीं प्रथम उडवून दिला, नंतर **मन्नरु** राजपुत्राला कैदेंतून मुक्त केलें व समशेर हातांत घेऊन त्याच्यासह मोठ्या शौर्यानें शत्रूसैन्यात शिरला, लढला व शेवटी रणभूमीवर देह ठेवून स्वर्गास निघून गेला. याप्रमाणें

त्याची आख्यायिका प्रसिद्ध आहे. काहीहि असो हा सर्वच प्रकार फार उद्वेगकारक घडला.

**चोकनें मदुरेची सत्ता धारण केली.**

८ दीर्घकाळपर्यंत राजनिष्ठ म्हणून प्रसिद्ध असलेल्या तंजावरच्या राजघराण्याच्या अपकर्षास एव्हापासून सुरुवात झाली, हे पाहून मदुरेच्या विजयी **चोकाला** आनंद झाला. त्याने मोठ्या त्वरेने तंजावरच्या क्षत्रपाच्या जागी **अलगिरी** नावाच्या आपल्या वडील **बंधूची** स्थापना केली व तो आपल्या राजधानीला परत आला. परत आल्यावर त्याने मदुरेची सत्ता धारण केली न केली तोच या **अलगिरीनें** कृतघ्नतेनें स्वतःचे स्वातंत्र्य जाहीर केले.

**बाल राजपुत्राचा बचाव, वेंकन्नाचें राजकारण व आदिलशहाकडेस मदतीची मागणी.**

९ युद्धापूर्वी **विजयराघव**राजाने आपला सर्व जनानखाना तोफानी उडवून दिला हें मागें सांगितलेच आहे. याप्रमाणे तो जनानखाना उडवून देण्यापूर्वीच **विजयराघवाच्या** पट्टराणीनें आपला मुलगा **चेंगमलदास** याला एका दाईबरोबर दूर सुरक्षित स्थळी पाठवून दिले. त्या राज्याधिकारी वंशजाला दाईनें सुरक्षितपणें नेगापट्टम येथे नेले. तेथे एका चेट्टीने त्याचे संगोपन केले. **रायसम वेंकन्ना** या नावाचा एक नियोगी तेलंगी ब्राह्मण हा प्रथम **विजयराघव** व नंतर **अलगिरी** याचा चिटणीस होता. अलगिरीच्या कारकीर्दीत या चिटणिसाला राज्यकारभारांत स्वतंत्रपणे ढवळाढवळ करिता येत नसल्यानें त्याने त्या मुलाला परत आणून वडिलोपार्जित गादीवर बसविण्याचा कट उभारिला. त्या तेलंगी ब्राह्मणाने उन्मत्त **अलगिरीचा** सूड उगविण्याची शपथ घेऊन **विजयराघवाचा** बचावलेला मुलगा **चेंगमल**-

**दास** याला बरोबर घेतले आणि दक्षिणेकडील सम्राट् विजापुरचा सुल्तान ( आदिलशहा ) याच्याकडेस नेलें, व त्याला सर्व वृत्तांत **निवेदन** केला व तरुण राजपुत्राला साहाय्य करण्याची विनंति केली.

**अलगिरीचा पराजय आणि वेंकाजीचा पराक्रम**

१० या प्रसंगीं **आदिलशहाच्या** तर्फेनें **शहाजीचा** मुलगा **वेंकोजी** भोसले हा बंगलोरचा जहागिरदार होता. नवीन नेमिलेल्या तंजावरच्या **अलगिरी** नायकाची हकालपट्टी करून तेथें **चेंगमल-दासाची** स्थापना करण्याची कामगिरी आदिलशहानें त्या **वेंकाजी** भोसल्यालाच सांगितली. **सरभोजीच्या** कारकीर्दीत **राघवार्याचा** मुलगा **वेंकटकवि** यानें भोसल वंशावली नावाचा एक संस्कृत ग्रंथ लिहिला असून तो आज तंजावरच्या ग्रंथसंग्रहालयात आढळतो. त्यावरून असें दिसते कीं, **वेंकोजीनें** अरणी सर केली व नंतर त्रिचनापल्लीच्या **नायकाशी** त्याचें युद्ध झालें. त्याच्या ताब्यांतून तंजावरची मुक्तता **व्यंकोजीनें** केली व तिरुवाडी जवळ तिरुमलवाडी येथे तो राहिला. त्याला तेथें असे स्वप्न पडले कीं, त्यानें एकदम तेथून आपल्या घरी जाऊं नये. या सुमारासच तंजावरच्या लोकात यादवीस सुरुवात होऊन एका पक्षानें मराठ्यांचे ( म्हणजे **वेंकोजीचें** ) साहाय्य घेतलें व तंजावरचें राज्य हस्तगत करण्यास मराठ्यांस सुचविलें. त्याप्रमाणें **वंकोजीनें** तंजावरचे राज्य घेतले. **अलगिरीला** पदच्युत करून तंजावरच्या गादीवर **चेंगमलदासास** बसवावे या कामासाठीच **आदिलशहानें वेंकाजीस** पाठविले होते, परंतु मिळालेल्या विजयानंतर **चेंगमलदासानें** खर्चाची रक्कम **वेंकोजीस** तत्काळ न दिल्यानें **वेंकोजीनें** तंजावरचें राज्य घेतलें असें एक कारण **विल्क्स** देतो.

११ आपणांस मदत करावी अशी **अलगिरीनें** मदुरेच्या **चोक्कांना** विनंति केली होती पण तिचा काहीच उपयोग झाला नाही; त्यामुळे अय्यं-पेंटच्या लढाईंत **वेंकोजीला** पूर्णपणें यश प्राप्त झालें व त्याने मोठ्या प्रयत्नानें राजधानी

**तंजावरास एकोजीची स्थापना व कपटी तेलगू ब्राह्मणाचें पलायन.**

काबीज केली. आपल्या पित्याची जहागीर आपल्या ताब्यांत येण्या साठी **व्यंकोजीनें** तंजावरावर स्वारी केली, परंतु तेथील राजा **पेडलगिरी** यानें तंजावरच्या एका तटावर **व्यंकोजीचा** पराजय केला असा मजकूर एका तेलगू हस्तलेखांत आहे. **चेंगमलदास** यास राज्याभिषेक करण्यात आला, परंतु त्याने तें राज्यपद मिळविलें नसल्याने तो तें संभाळण्यासहि असमर्थ ठरला. या नवीन राजाची दाई, त्याचा पालनकर्ता पिता चेट्टी व कटाच्या सूत्रांचा चालक तेलगू ब्राह्मण **वेंकण्णा नियोगी** या तिघांत मुख्याधिकाराची अहमहमिका लागली. त्या कारस्थानी तेलगू ब्राह्मणानें बहुमताच्या जोरावर राजकीय परिस्थिति दूषित केली, पुनः सूड उगविण्याची प्रतिज्ञा केली व अशा गप्पा पसरून दिल्या की, ' मराठ्यानीं तंजावर सर करण्याचा विचार चालविला आहे. ' ही बातमी ऐकतांच तंजावरचा शेवटचा नायक जीव वांचविण्याच्या हेतूनें पळून गेला. तेलगू ब्राह्मण **वेंकण्णा** हा मोठा कर्तृत्वशाली व राजकारस्थानी होता. बदललेल्या परिस्थितीला साजेल अशी त्याने जनतेची तयारी केली. **वेंकण्णानें** पुढे **एकोजीची** महत्वाकांक्षाहि प्रज्वलित केली. तंजावर हस्तगत करण्याची इच्छा **एकोजीस** होतीच. परंतु विजापुरच्या सुलतानापासून स्वतंत्र होण्यास त्याची अदूरदर्शी सारासारविचारशक्ति अनुकूल नसल्यानें तो स्तब्ध राहिला होता, अशी हकीकत तंजावर येथील

आंध्रभाषेंतील राजुल चरित्रांत आहे. ( परंतु विजापुरचा आदिलशहा सन १६७२ मध्येंच मृत्यु पावला असल्यामुळें वरील हकीकत विश्वसनीय दिसत नाहीं. ) विजापुरचा सुलतान मृत्यु पावल्यामुळे एकोजीनें सारासार विचारशक्तीस बाजूस सारिले व बंदुकीचा एकहि बार उडविल्याशिवाय मोठ्या विजयानें तंजावरांत प्रवेश केला. तंजावरच्या राजाची दुर्बलता, त्याच्या मंत्र्यांतील फूट व त्याच्या प्रजेतील अनेक पक्षोपपक्ष या कारणानी तंजावरचें राज्य हस्तगत करण्याचा स्वार्थी विचार मराठ्यांच्या मनात फार दिवसांपासून होता. राजकारणी वेंकण्णा हा असाधारण उद्योगी व अत्यंत धूर्त होता, तसाच तो सदसद्विवेकशून्य व कृतघ्नहि होता. त्याचा स्वभाव सतत कांहींतरी उपद्व्याप करण्याचाच होता. तो आपल्या परीनें एक राज्यपददाताच होता. त्याचा नवीन धनि त्याला पूर्णपणें ओळखीत असल्यानें आरंभी त्याला पुष्कळ सला मिळाली होती. त्या तेलगू ब्राह्मणानें ( १ अलगिरी व २ चेंगमलदास ) अशा दोन धन्यांना बाजूला सारिलें होतेच. तसेंच त्यानें वेंकोजीलाहि बाजूस सारिलें असत, परंतु आपला सुरक्षितपणा धोक्यांत असल्याचें त्याच्या लक्षात आल्यानें तो तेलगू ब्राह्मण वेळींच सावध होऊन तेथून निसटून गेला.

तंजावरच्या ज्ञानयुगाची परंपरा व अभिवृद्धि.

१२. याप्रमाणे नायकांनी तंजावरचें राज्य गमाविलें व अगदीं निराळी भाषा जाणणारे लोक त्या राज्यावर अधिष्ठित झाले. हे नवीन राजे जरी दूरचे होते तरी त्यानी तंजावर हे आपलेच घर आहे असे समजून तेथे वसति केली; व प्रजासंरक्षणाची परंपरा चालविणे, धर्मसंबंधी कार्याचा पुरस्कार करणें, कलांना व शिक्षणाला उत्तेजन देणे ही सत्कृत्यें त्यांनी सतत व अखंड चालविलीं. नायकांच्या ' राज्यात तंजावराकडेस संस्कृत '

तेलगू वाङ्मयाची अपरिमित वृद्धि झाली. दुसरा नायक राजा **अच्युत** याचा दिवाण **गोविंद दीक्षित** हा काही कालपर्यंत **रघुनाथाचा** मुतालिक व नंतर दिवाण म्हणून प्रसिद्ध झाला तो, विद्वच्छिरोमणि **अपया** दीक्षिताचा मित्र असून विद्वान् म्हणून प्रसिद्ध होता. याचाच पुत्र **यज्ञनारायण** याने साहित्य रत्नाकर हा ग्रंथ लिहिला. याच ग्रंथात **रघुनाथाच्या** कार्यांचे वर्णन आहे. नायक राजेहि मोठे गुणाढ्य होते. **गोविंदानें** 'साहित्यसभा' या ग्रंथात लिहिले आहे की, **रघुनाथ** हा गायनकलावेत्ता असून मोठा संस्कृतज्ञ व तेलगू भाषाभिज्ञ होता. तसेच या **रघुनाथ** राजानें सहा ग्रंथ लिहिले होते. तो मोठा योद्धाहि होता. त्यानें पोर्च्युगीज लोकाचा पराजय करून **जाफूनाला** त्याच्या पूर्वजांच्या गादीवर बसविले. **रघुनाथ** हा पापभीरु व मोठा दाता असल्यामुळे त्याने आपले संचित द्रव्य देवधर्मांत व परोपकारांत खर्च केले. तो आठ भाषाचा ज्ञाता होता. **मदुरावनी** व **रामभद्राम्बा** या दोघी नामांकित कवयित्रींनी **रघुनाथाच्या** दरबारांतील वाङ्मय मंडळ भूषविलें होतें. नायक हे वैष्णव होते. तथापि त्यांनी शंकराची मंदिरेंहि शृंगारिलीं होतीं. **सुधींद्र** व **राघवेंद्र** या दोन माध्व **गुरूंनाहि** **रघुनाथानें** आश्रय दिला होता. नायक राजांनी गरीबांसाठी धर्मशाळा बांधिल्या होत्या व विद्वान् ब्राह्मणांना ते चांगल्या देणग्याहि देत असत. नायकाच्या मागून तंजावरावर मराठ्याचे राज्य झालें व मराठ्यांनींहि नायकाच्या दानधर्माचा कित्ताच पुढे चालविला होता, हे पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्षात येईल. **अपया** व **नीळकंठ** यानीं जें ज्ञानयुग सुरू केले, त्यात **कृष्णानंद** व **रामभद्र** ही विद्वानाची जोडी शेवटी झाली होती.

१३. नायकानीं संस्थानाच्या हिताकडेस कधीहि दुर्लक्ष केलें नाही. नेहमी चालणाऱ्या लढायामुळें नायक हे फार सावध राहात असत. डच व डेन्स व्यापाऱ्याना त्यानी आश्रय दिला होता. त्यांत युद्धप्रसंगी त्या लोकांकडून आपणांस तोफाचा पुरवठा व्हावा असा नायक राजाचा हेतु होता. विजयराघवानें आपल्या राजधानींतील किल्ल्यांची दुरुस्ती करून पट्टुकोदिया, अरनतंगी, किल्लेनेलीकी, निरुपदूर या व इतरहि ठिकाणी कांही नवीन किल्ले बांधिले. परंतु युद्धकलेमध्ये तो आपल्या पित्यापेक्षा कनिष्ठ होता. ज्या संस्थानात प्रजेवर कसलीच जबाबदारी नसते त्या संस्थानाविषयीं ती प्रजाहि इतकी निष्काळजी असते की, तेथे कोण राजा राज्य करीत असतो याचीहि चौकशी ती करीत नाही; मग परकीयाच्या हल्ल्यापासून त्या संस्थानचे संरक्षण प्रजेनें करावे अशी आशा तेथील संस्थानिक कसा करूं शकेल? तंजावरच्या प्रजेलाहि परकीय सत्तेची इतकी संवय झाली होती की, ती चोक, नायक व मराठे यांच्यांत कांहीच भेद मानीत नव्हती. कारण कोणा-च्याहि कारकीर्दींत राजकारण व सत्ता याशी तिचा संबंध आलाच नाहीं. परकीयसत्तेनेंसुद्धां तेथील जनतेची पूर्वींच्या सत्तेहून अधिक अशी आर्थिक हानि काहीं केली नाहीं. तंजावरांत त्या काली जित व जेते हा भेद प्रचलीत असला तरी जेत्यांनी जितांना निःशस्त्र करण्याच्या कलेचा गंधहि नव्हता. अनेक घराण्यांचे उदयास्त झाले, परंतु त्यामुळें प्रजेच्या व त्यांच्या लौकिक व्यवहारांत कांही खंड पडला नाहीं.

**राजांची अदलाबदल व राज्यकारभाराशीं प्रजेची फारकत**

**कायमची राज्य-व्यवस्था अद्यापि अस्तित्वांत यावयाची होती.**

१४. तिकडील पृथक् पृथक् संस्थानें स्वतंत्रपणे युद्ध करण्यास असमर्थ होती व अशा अनेक असमर्थ संस्थानिकांची जूट होण्यास मत्सर हा एक मनोविकार आडवा येत असे. त्या संस्थानांच्या पसंतीनापसंतीकडे लक्ष न देतां त्यांना बाहेरच्या बाजूनें विजेते सेनापती हे बलाढ्य सैन्यबलाच्या जोरावर नामशेष करण्याच्या प्रयत्नांत होते. सन १६७६--७७ मध्ये **शिवाजीनें** जी या बाजूस स्वारी केली होती ती एकाद्या विद्युच्छलाकेप्रमाणें किंचित्काल दृश्यमान झाली. मोगली सत्तेने या संस्थानांना कांहीकाळपर्यंत आपल्या सत्तेखालीं आणिले, परंतु शातता नादण्याला तो काळ फारसा अनुकूल नव्हता. सर्व हिंदी संस्थानांना समान दर्जा प्राप्त करून देणे, सर्व हिंदीप्रजेला सर्व साधारण कायद्यांची बंधने घालणे व तिला आलस्य, अव्यवस्था व अधःपात या त्रिदोषांतून मुक्त करून, उत्साही, व्यापारविषयक व उच्च राजकारणी शिक्षण देण्याचें कार्य करणें अशीं तीन महत्कृत्यें पार पाडण्यास एक अधिक कुशल लष्करी सामर्थ्य व राजनीतिविषयक धोरण सर्व हिंदुस्थानांत अद्यापि ( शंभर दीडशे वर्षांनंतर ) प्रस्थापित व्हावयाचें होतें.

## Additional authorities.

1 Tanjore district gazetteer P. 35-53.

2 Tanjore district manual Part V, ch. 3

3 Madura district manual Part III. ch. 8

4 Mr. Sathyanadhan : The Nayaks of Madura, Introd. ch. I and 10-14.

5 Rey Heras: The Aravidu dynasty ch. 8. 13-17, & 19.

6 Manucci 1653-1708 Storio Do Mogor vol. 3 P. 103.

7 Mr. T. S. Kuppusami Sostri: Nayaks of Tanjore.

8 Dr. S. K. Iyengar: Sources of Vijayanagar History. P. 252-327.

9 MER 1924 P. 119 and MER 1925 P. 92.

# प्रकरण ३ रें

## राज्यसंस्थापक एकोजी सन १६७६-१६८३.

### मुद्दे

१ व्यंकोजीनें तंजावर हस्तगत केलें त्यास शिलालेखाचा आधार
२ मृत्यूनंतरहि राजा या नात्यानें व्यंकोजीचें नांव चाललें.
३ दुसऱ्या शहाजीच्या राज्यारोहणाचा सन.
४ व्यंकोजीचें कर्तृत्व व राजकारणकौशल.
५ शिवाजीची कर्नाटकावर स्वारी व व्यंकोजीशीं भेट.
६ व्यंकोजीस शिवाजीचा उपदेश.
७ व्यंकोजी व शिवाजी यांचा तह व पुढील वागणूक.
८ तंजावरकरांचें स्वातंत्र्यच त्याच्या नाशास कारण झालें.
९ व्यंकोजी व म्हैसूरकर यांचें वैर व वेंकाजीचा थोरपणा.
१० शिवाजी व वेंकाजी यांचा पराक्रम.
११ संस्कृत व तेलगू भाषांची जोपासना.
१२ रामनदच्या किलावय याचे राजकारण.
१३ वेंकाजीचें कर्तृत्व व किंचित् महत्त्वाकांक्षा.
१४ अनेक राण्या व उपपत्न्या याच्यामुळें भानगडी झाल्या.
१५ अनेक मराठी राजांच्या राण्या व उपपत्न्या याची संख्या.
१६ राण्या व उपपत्न्या यांचें शिक्षण.
१७ मुद्दुपलानी या उपपत्नीचें ग्रंथकर्तृत्व.

तंजावर येथील बृहदीश्वर शिलालेखांत एकोजीनें ( वेंकाजीनें )

**व्यंकोजीनें तंजावर कधीं हस्तगत केलें त्यास शिलालेखाचा आधार**

राक्षसनामसंवत्सरे शके १५९६ (या शकाला सन १६७४ येतो पण मूळ ग्रंथांतील ) सन १६७६ च्या माघ शुद्ध पक्षात तंजावर सर केलें असें म्हटलें आहे. ( परिशिष्ट १ पाहा ) अनल संवत्सर (?) शके १५९७ च्या चैत्रात म्हणजे सन १६७६ च्या एप्रिलमध्यें तंजावरात वेंकाजीनें कायमचा मुक्काम केला. त्या शिलालेखांत जे असे उल्लेख आले आहेत त्यांच्या सत्यतेबद्दल शंका राहत नाहीं. कारण वेंकाजींच्याच वंशांतील (दुसऱ्या) सरफोजींच्या कारकीर्दींत प्राप्त होणारे सर्व कागदपत्र व आधार मिळवून हा शिलालेख खोदविलेला आहे; व सन १६७४ पासून सन १६७६ पर्यंतचे कालनिर्देश कारकीर्दीच्या आरंभींच इतिहासकारांनी दिले आहेत. सन १६७६ पूर्वीं तंजावर हस्तगत झालें असल्याचा आधार नाहीं. मद्रास--तामिल हस्तलिखितांत आनंदसंवत्सरापासून काल्युक्त संवत्सरापर्यंत म्हणजे सन १६७४ पासून सन १६७९ पर्यंतचा काळ एकोजीस दिलेला आहे. परंतु त्या हस्तलिखितातील काल वरील शिलालेखांतील काळाशीं जुळत नाहीत. दुसरें, वेंकाजीचा धनी जो विजापुरचा सुलतान त्याच्या मृत्यूनंतर लवकरच तंजावर हस्तगत झालें असें तंजावर येथील आंध्र राजुल चरित्र या ग्रंथांत म्हटलें आहे. आदिलशहाच्या वंशवृक्षाच्या परीक्षणावरून असें दिसतें कीं, सन १६७६ मध्यें विजापुरच्या गादीवर अल्पवयस्क सुलतान होता; व विजापुरचें राज्य मोंगलांनीं खालसा करीपर्यंत हा तेथें राज्य करीत होता. याचें नाव सिकंदर आदिलशहा होय. सन १६७६ मध्यें एकोजीनें

पोर्च्युगीज लोकांस दिलेली एक देणगी प्रसिद्ध आहे. ती देणगी म्हणजे **विजयराघवानें** पूर्वी नेगापट्टम् हें डचलोकाना दिले होतें, तीच देणगी मान्य करणारी सनद होय. आणि हें उघड दिसतें की, राजांची बदली होताच डच लोकानी नवीन राजापासून ( यांतच **एकोजीहि** समजावयाचा आहे ) पूर्वीची वतनें कायम करून घेतलीं असावीत.

**मृत्यू नंतरहि राजा या नात्यानें एकोजीचें नांव चाललें**

२. एकोजी हा रुधिरोद्गारी संवत्सरांत शके १६०४ मध्ये म्हणजे सन १६८३ मध्यें निवर्तला असें शिलालेखांत लिहिले आहे. सन १९१८ मध्यें सांपडलेल्या ५४० व्या शिलालेखावरून असें दिसते की, ५४० वा शिलालेख **एकोजीनें** कलियुगाच्या ४७८४ व्या वर्षी (सन १६८२) म्हणजे शके १६०५ (१६०३ ?) दुंदुभीसंवत्सरात कोरलेला असावा. ) सन १७९८ चें **चौकशी** मंडळ व श्वार्ट्स ( Schwarts ) याच्या मतें **एकोजीनें** सात वर्षे राज्य केले होते असे दिसते; व विल्कस म्हणतो कीं, चिक्कदेवरायाला बंगलोर विकत दिले त्या विक्रीसंबंधीचा करार एकोजीनें सन १६८६-८७ मध्यें केला होता. सन १६९९-१७०० मध्ये मंगमलाशी एकोजीनें युद्ध केलें असा उल्लेख ईस्ट इंडिया कंपनीच्या दप्तरातून ( Records ) दिसतो. सन १६८१ पासून पुढे ते एकोजीचें वर्णन वारंवार करितात. सन १६८१ मध्ये जनगांवचा नायक एकोजी होता. सन १६८२ मध्यें म्हैसूरकडून **एकोजीस** श्रालम् हा गाव मिळाला ( म्हैसूरनेंच मदुरा हस्तगत केली होती. ). **एकोजीचा** प्रांत म्हणून तंजावरचा उल्लेख सन १६८५ मध्यें आहे. **एकोजीशीं** तह झाल्यावर तिरुमलवसल येथें करार

झाल्याचा निर्देश सन १६८७ मध्ये आहे. नागापट्टम् जवळील एका किल्ल्यासंबंधीं फ्रेंचानी **एकोजीच्या** मुलाशी सन १६८८ मध्यें तह केल्याचा लेख आहे. इंग्रजानीहि त्याच्याशीं याच साली तह केला असा दाखला आहे. याच सालच्या निराळ्या तीन पत्रांत तंजावरच्या राजाला **एकोजी** म्हटल्याचे दिसते. सन १६९० मध्यें **एकोजीनें** इंग्रजाशी काही करार केल्याचे लिहिले आहे. या शिवाय या पत्रात असेहि म्हटले आहे की, तंजावरच्या राजाकडून **राम-राजाला** मोठी मदत मिळाली व त्या मदतीच्या जोरावर मोगलांचा पराभव करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. सन १६९१ मध्यें **झुलफिकारखानानें एकोजीच्या** राज्यापर्यंत चाल केली होती, म्हणून राजाने डच लोकांशी तह केला. तंजावर हा प्रांत **एकोजीचा** असल्याचा आधार सन १६९२ च्याहि एका पत्रांत आहे. दोन वर्षांनंतर म्हणजे सन १६९४ मध्ये झुलफिकारखानानें तंजावरचा राजा **एकोजी** याशी तह केल्याचे लिहिले आहे. यावरून स्पष्ट दिसतें की, **एकोजी** व त्याचा वडील मुलगा **शहाजी** यांच्या उल्लेखांच्या संबंधांत **एकोजीच्या** मृत्यूनंतरच्या कागदात बराच घोटाळा झालेला आहे. **एकोजीच्या** मृत्यूनंतरहि अनेक वर्षे त्याच्याच नावाचा उल्लेख होत असे इतका तो प्रसिद्ध होता.

**दुसऱ्या शहाजीच्या राज्यारोहणाचा सन**

३. दुसऱ्या शहाजीचा मंत्री **गंगाधर** याचा मुलगा **त्र्यंबकराय** मखी यास एकोजीनें मंत्रीपदाचें शिक्षण दिले असा एक उल्लेख असल्याने एकोजी-संबंधीच्या काळाच्या ऐतिहासिक गोंधळांत आणखी भर पडली आहे. रामायणावरील धर्मशास्त्रविषयक प्रसिद्ध व दुर्मिळ टीका ‘ धर्मकूट ’ ही या त्र्यंबक-

**रायानेंच** लिहिलेली आहे. या टीकेच्या एका कडव्यात **शहाजी**-साठीं ( म्हणजे आपल्या मुलासाठी ) **एकोजीनें** राज्याचा त्याग केला असे अस्पष्टपणे म्हटले आहे. हीच ऐतिहासिक गोष्ट **अय्या-अव्वलच्या** शाहेन्द्रविलास काव्यांत उल्लेखिली आहे. यानंतर **एकोजी** आणखी किती वर्षे जगला हें कळत नाही. **विल्क्स** म्हणतो त्याप्रमाणें तो सन १६८७ पर्यंत जगला असावा. कारण, **एकोजीच्या** सैन्याबरोबर काल्लर व मारवाडी पेढारी याचे सन १६८६ मध्यें युद्ध झाल्याचा उल्लेख मदुरेच्या मिशनच्या एका पत्रात आहे. सन १६८३ मध्यें **एकोजी** फक्त ५४ वर्षांचा होता. पट्टुकोटाई येथील शिलालेख शके १६०६ मधील आहे त्यावरून दुसरा **शहाजी** हा सन १६८५ मध्ये महाराजपदाधिष्ठित झाला होता असें सिद्ध झाले आहे. यावरून दुसऱ्या **शहाजीला** सन १६८५ पूर्वी म्हणजे सुमारे सन १६८४ मध्ये राज्यारोहण झाले असावे असे मानावें लागते.

४. छत्रपति **शिवाजी** हा **एकोजीचा** वडील बंधु होय, हें सर्वमान्य सत्य आहे. **शिवाजी**एवढे कर्तृत्व **एकोजी** मध्ये नव्हते याबद्दलहि वाद नाही. परंतु असे असले तरी, आपल्या काळच्या मोगलाशी

**एकोजीचें कर्तृत्व व राजकारणकौशल**

**एकोजी** हा नेहमीं मोठ्या साहसाने व उमेदीनें झगडा करीत असे हे प्रसिद्धच आहे. मद्रास येथील हस्तलिखित ग्रंथावरून असे सिद्ध होतें कीं, **एकोजी** हा फक्त योद्धाच नसून पीकपाण्याची उन्नति करण्यातहि मोठा कर्तृत्वशाली राजा म्हणून प्रसिद्ध होता. त्याने कांही जुने कालवे दुरुस्त केले, कांही नवीनहि बांधिले व कांही पडित जमिनी लागवडीस आणिल्या. मदुरा मिशनची कांही पत्रें **'मदुरेचे नायक'** यामध्ये भाषांतरित झाली आहेत त्यांवरून या **एकोजी**

राजाला आपल्या संस्थानची किती तळमळ वाटत होती हें स्पष्ट दिसतें. पाण्याच्या पुराने कांहीं खेड्यांचा नाश केला होता; द्रव्याच्या बाबतींत राजा **एकोजी** अगदी हातटेकीस आला होता. रयतेच्या मालकीचें बरेंचसे पीक स्वार लुटून नेत असत किंवा अमीन लोक त्यासाठीं रयतेला मनस्वी छळीत असत; हें लक्षांत घेऊन **एकोजीनें** चार पंचमांश पीक आपल्या ताब्यांत घेतलें. **शिवछत्रपतीला** कांहीं दंड वगैरे देणें **एकोजीला** भाग पडलें असल्यानें तो देण्यासाठींहि **एकोजीनें** प्रजेजवळील पै न् पै हिसकावून घेतली होती.

**शिवाजीची कर्नाटकावर स्वारी व एकोजीची भेट.**

५. **एकोजीच्या** कारकीर्दींतील रोमांचकारी धामधुमीचा प्रसंग म्हणजे **शिवाजानें एकोजीवर** व कर्नाटकावर सन १६७६--१६७७ मध्ये जी स्वारी केली तो होय. आपल्या तीर्थरूपाच्या जाहगिरींतील आपला भाग घेण्यासाठीं ही स्वारी **शिवाजीनें** केली होती हे प्रसिद्धच आहे. मुख्य मुसलमानी सत्तेपासून विभक्त होऊन स्वतंत्र होण्याचा प्रयत्न **एकोजी** करीतच होता. त्यास मदत करून मराठी राज्याचा भगवा झेंडा कर्नाटकांत फडकवावा या हेतूनें **शिवाजीनें** ही कर्नाटकावर स्वारी केली होती. **रघुनाथ पंडित** हा **एकोजीचा** एक मंत्री होता. परंतु तिकडील कारभारात त्याचें तेज पडत नसल्यानें तो अगदीं वैतागून गेला होता. पुढें त्यानें **एकोजीची** नोकरी सोडिली व तो **शिवाजीच्या** पदरीं येऊन राहिला. त्यानेंच **शाहाजीच्या** जहागिरींत भाग मिळविण्यासाठी **शिवाजीची** महत्त्वाकांक्षा प्रदीप्त केली. **शिवाजीनें** गोवळकोंड्याच्या **सुलतानाशीं** तह केला, जिंजी हस्तगत केली व नंतर तंजावरावर चाल केली आणि **एकोजीची** भेट घेतली. वेलोरसुद्धा कोलेरूनचा उत्तरेकडील

( औदिच्य ) प्रदेश शिवाजीच्या सैन्यानें काबीज केला. शिवाजीची व एकोजीची ( म्हणजे या बंधूंची ) भेट निष्फळ झाली. आपण इकडेच राहिलों तर मोंगलांची स्वारी आपल्यावर होईल अशी शंका घेऊन शिवाजी घाईघाईनें परत महाराष्ट्रात आपल्या राजधानीस गेला.

**एकोजीस शिवाजीचा उपदेश**

६ महाराष्टांत परत येताना शिवाजीनें जिंजी व कोलेरून या प्रांतावर आपल्यातर्फे शहाजीचा दासीपुत्र संतोजी यास मुख्य सुभेदार नेमिलें. वेंकाजीनें संतोजीवर स्वारी केली. पण संतोजीनें मोठ्या शौर्यानें ती स्वारी परतवून स्वसंरक्षण केलें. वेंकाजीचें वागणें शिवाजीला कमीपणा आणणारें असें होतें. शिवाजीशीं कलह करण्यास वेंकाजी उद्युक्त झाला होता पण त्याच्या अशा वागण्याने शिवाजीचा सर्व हिंदुस्थानावर मराठशाही स्थापण्याचा थोर मनोरथ दुर्बळ झाल्याने शिवाजीला मनस्वी दुःख झालें. शिवाजीचीं इतिहासप्रसिद्ध दोन पत्रे याच वेळीं वेंकोजीला त्यानें लिहिलेलीं ( परिशिष्ट ४ व ५ ) आहेत. पुढें सन १६८० मध्यें विजापुरकरांशीं जो तह झाला त्यायोगें आसमंतांतील प्रदेशासह जिंजीचा मुलुख शिवाजीकडेस आला; तेथील राज्यव्यवस्था कशी उत्तम असावी यासंबंधाचे विवेचन करून तहाची कलमें (परिशिष्ट ६) ठरविली आहेत. प. ४ चे पत्र सन १६७८ मधील असून त्यात त्या दोन बंधूंतील बेबनावाच्या दुष्परिणामाचें निदान केलें आहे. प. ५ चें पत्र सन १६८० मधील असून त्यात वेंकाजीनें दुःख करीत बसण्यापेक्षा भूषणभूत कर्तव्य करावे असा उपदेश केला आहे. कारण सन १६७८ मधील युद्धात वेंकाजीचा पराजय झाल्यापासून त्याला मनस्वी खेद वाटूं लागला होता. दुसऱ्या पत्राचें तात्पर्य असें कीं,

'आपल्या कुटुंबांत मीच ( शिवाजी ) वयानें वडील असल्याने तुझ्या ( **वेंकाजीच्या** ) संरक्षणाची जबाबदारी माझ्यावरच आहे हें तुलाहि मान्य असावे. तुझ्या सैन्यांतील शिस्तीकडेस लक्ष दे व स्वःस्थितीकडेस काळजीपूर्वक पाहा. माझ्या लहान भावाची कीर्ति व स्तुति ऐकून मला किती आनंद होईल त्याची कल्पना करा. थोर कृत्यें करण्याची हीच वेळ आहे. तरी सावधानता ठेवून कर्तव्यतत्पर व्हा.

**एकोजी व शिवाजी यांचा तह व पुढील वागणूक**

७ ( विजापुरचा **आदिलशहा** ) सुलतान हा **वेंकोजीपेक्षां** अधिक बलिष्ट असूनहि **शिवाजीच्या** अटी मान्य करीत असे. त्यामुळें **वेंकोजीलाहि शिवाजीच्या** अटी मान्य करणे भागच होतें. तत्काळ एक मोठी रक्कम **शिवाजीला** देण्यात आली व वार्षिक खंडणीहि देण्याचे **वेंकोजीनें** मान्य केलें. **शिवाजीच्या** मृत्यूनंतर ( म्हणजे सन १६८० नंतर ) तंजावराहून खंडणी मिळण्याचें बंद झालें व परस्परसाहाय्य व कार्यप्रसंगी आमंत्रण यांशिवाय **सातारकर भोसले** व **तंजावरचे भोसले** यांचा कांहीं संबंध राहिला नाही. म्हणजे सन १६८० नंतर लगेच **तंजावरकर भोसल्यांचा** संबंध मराठी सत्तेच्या केन्द्रस्थानापासून स्वतंत्र झाला.

**तंजावरकरांचें स्वातंत्र्यच त्यांच्या नाशास कारण झालें**

८ याप्रमाणें कर्तृत्वदर्शक बुद्धिसामर्थ्याची व नेतृत्वाची संधि तंजावरकर भोसल्यानी घालविली. जिंजी, तंजावर व सातारा येथील मराठेराजांमध्यें क्षुल्लक पण मत्सरमूलक झगडे झाले. त्यांनीं दक्षिणेंत मराठी साम्राज्यस्थापनेचा संभवहि नष्ट केला. ( दुसऱ्या ) **शहाजीच्या** मृत्यूनंतर तंजावरचा पृथक्पणा

त्याच्या राज्यकर्त्याला लाभदायक झाला नाहीं. कारण मुसलमानी सत्तेला तंजावरच्या असहाय राजाचा प्रथमच बळी पडला. त्यामुळें सर्वांत अधिक बळकट अशी मुख्य सत्ता दक्षिणेकडून अगदीच उघडी पडली. अठराव्या शतकात हिंदुस्थानाच्या इतिहासाच्या उंबरठ्यावर ऐक्याचा अभाव हें मोठें संकट उभें ठाकलेलें दृग्गोचर होतें.

एकोजी व म्हैसूरकर यांचें वैर व एकोजीचा थोरपणा

९ तंजावरासारख्या लहानशा संस्थानाचे शेजारी मोठे मत्सरी होते व त्यांनीं तंजावराला सतविण्याची एकहि संधी व्यर्थ घालविली नाही, म्हणून नवीन राज्यकर्त्याला संकटग्रस्त परिस्थितीला तोंड देणे भाग पडले. तेथील प्रजेला परक्या राजसत्तेची संवय झाली असल्यामुळे तिनें या शेवटच्या परक्या सत्तेविरुद्ध कुरकुर केली नाही. परंतु त्या सत्तेच्या शेजारच्या सत्ताधीशानीं तंजावरच्या राजाला शांतता मिळूं दिली नाहीं. वेंकाजीविरुद्ध मदुरेच्या चोक्कनाथानें जिंजीच्या संताजीस साहाय्य केलें, परंतु वेंकाजीनें संताजीशीं लढत असताना पलायन केल्यामुळें वेंकाजीचा नाश करण्याचा चोक्कनाथाचा मनोदय जागच्या जागीच राहिला. सन १६७८ ते सन १६८० च्या काळात एका धाडसी मुसलमान सरदारानें चोक्कनाथाचीच गादी बळकाविली. पुढे चोक्कनाथानें स्वतःचें राज्य मिळविलें न मिळविलें तोंच म्हैसूरच्या राजानें त्रिचनापल्लीवर स्वारी केली. पूर्वीचें वैर बाजूस सारून वेंकाजीनें चोक्काला मदत केली. कामलकालानिधिविनाभका शोकपर्यवसायी पण प्रेममूलक अशा एका तेलगू काव्यांत वेंकाजीच्या या उदार बुद्धीचें वर्णन आलें असल्यानें वेंकाजीची ही उदारबुद्धी अमर झाली आहे.

१० एका संस्कृत शोकपर्यवसायी निबंधावरून वरील काव्य ग्रथित केलेले आहे. त्या संस्कृत निबंधाचा

कमल कलानीधीमध्यें शिवाजी व वेंकाजी यांचे पराक्रम.

कर्ता वीरराघवाचा मुलगा नेलूर शिवराम कवि हा होय. एकोजीचा नातु जयसिंह याला हा संस्कृत निबंध शिवराम कवीनें अर्पण केलेला आहे. शिवाजी व वेंकाजी यांचीं महत्कृत्यें कवीनें नेहमीच्या रसभरित पद्धतीनें वर्णन केलीं आहेत. "शिवाजीनें मोंगलांचा पराजय करून छत्रपति पदवी मिळविली. वेंकाजीनें नर्मदेच्या दक्षिणेकडील सर्व राजाचा पराजय करून पाड्यांना म्हैसूरच्या जोखडांतून सोडविलें." ही नेहमीची वर्णन पद्धति होय.

११ नायकांच्या आश्रयानें संस्कृत व तेलगू वाङ्मय भरभराटीस येऊन वैभवसंपन्न झालें व त्याच्या दर्शनीय

संस्कृत व तेलगू भाषांची ओपासना

वृद्धीसाठी नायकाच्या मागून येणाऱ्या राजाला फक्त पूर्वपरंपरा कायम ठेविण्याचेच काम राहिले होतें. तेथील राजे ब्राह्मणाचें फार मोठे भक्त असल्यामुळें, तंजावराकडील लौकिकभाषाकडेस त्यांचे दुर्लक्ष होऊन संस्कृत व तेलगू भाषांची मात्र चांगलीच वृद्धी झाली. असें म्हणतात कीं, स्वतः वेंकोजीनेंहि तेलगू भाषेमध्यें द्विपाद रामायण ग्रथित केलें असून त्याच्या कारकीर्दींत तेलगू भाषेंतील इतर कांहीं ग्रंथ लिहिलेले आहेत.

१२ रामनदचा मुख्य हा मदुरेच्या नायकाचा अंकित होता. प्रसिद्ध किलावन हा रामनदचा मुख्य

रामनदाचा किलावय याचे राजकारण

असून तो सेतुपतींच्या इतिहासांत अंतिम मर्यादारूप होय. त्याची महात्वाकांक्षा व

स्थलांतर करण्याची त्वरा मोठी आश्चर्यकारक होती. तो स्वतः बंडखोर असल्यानें आपल्या ताब्यांतील सरदारांच्या मनांतील बंडखोरपणाचा अंकुर मूळांतच खुडून टाकीत असे. पुडुकोट्टाईचा जहागिरदार त्याचा अंकित असून तंजावरच्या मुख्याच्या कच्छपीं लागला होता. तें पाहतांच त्यानें जहागिरीच्या मालकीसंबंधीं मूळ घराण्यांतच फेरफार करून ती मालकी त्याचा मेहुणा तोंडामन याला दिली. मदुरेच्या राजाच्या अंकितपणातून सुटून आपण मोकळें व्हावें अशी त्याची प्रखर इच्छा होती. या इच्छेनें प्रेरित होऊनच त्यानें पांबर व पुडुकोट्टाई यामधील प्रदेश वेंकाजीला देऊन त्या देणगीच्या मोबदल्यात त्याच्याकडून सैन्याची मदत मिळविली. ही लढाई वेंकाजीचा मुलगा जो ( दुसरा ) शहाजी याच्या कारकीर्दीत संपली. या युद्धांत मदुरेचा पराजय, पुडुकोट्टाईच्या जहागीरदाराच्या संयुक्त सैन्याला विजय व तंजावरकराना प्रदेश याप्रमाणें तिघांना तीन प्राप्त झाले.

वेंकाजीचें कर्तृत्व व त्याची महत्वाकांक्षा

१३ तंजावरच्या मराठ्याच्या इतिहासात असल्या विपुल लढायांचे उल्लेख आहेत. सुमारें अठराशें वर्षांपूर्वी ज्या उत्साहानें प्रदेश व सत्ता यांच्या संबंधी ज्या महत्वाकांक्षेनें चकमकी झडल्या त्याच महत्वाकांक्षेनें व उत्साहानें त्या, खिस्ताच्या अठराव्या शतकांतहि झाल्या. आपल्या शेजाऱ्यांनां तोंड देऊन वेंकाजीनें आपलें राज्य संभाळिलें व ते पुढील पिढीच्या स्वाधिन केलें. त्याच्या राज्यापासून बेंगलोर हे फार दूर असल्याने तेथें व्यवस्था ठेविणें हें फार खर्चाचे व त्रासदायक काम आहे असे पाहून तें विकून टाकून जवळच प्रदेश मिळवून तो आपल्या राज्यास जोडून राज्याचा प्रदेश शक्य तेवढा विस्तृत करावा असा पोक्त विचार वेंकाजीनें केला. यावरूनच

हें उघड होतें. कीं, साम्राज्य स्थापन करण्याचा त्याचा थोर विचार नव्हता. कीर्ति व ऐश्वर्य याच्या महासागरांत धोक्यानें विहार करण्यापेक्षां तंजावरराज्याच्या ऐश्वर्यरूपी कुंडांतच आपल्या पूर्वजांप्रमाणें आनंदाने डुंबत राहण्यातच वेंकाजीला समाधान वाटत होतें. मराठ्यांचा देशाभिमान व त्यांची अधिक विजयाची महत्वाकांक्षा याच्या भरीला भरून इतर कोणाहि मराठ्याला अधिक पराक्रम करून मराठी सत्ता तंजावराकडेस वृद्धिंगत करण्याला वेंकाजीनें सवडच दिली नाहीं. तसेंच शेजारच्या जहागिरदारांनी एकमत होऊन मोगली सत्तेच्या विस्ताराविरुद्ध झगडा करावा, निदान स्वसंरक्षण करण्यास तरी त्यांनी तयार व समर्थ असावें, यासाठी वेंकाजीनें शक्य ते प्रयत्नहि केले. परंतु त्याचाहि फारसा उपयोग झाला नाहीं. आपल्या मराठी राज्याच्या बाहेर जाणें, ते वाढविणें, त्याचा लौकिक व मानसन्मान वृद्धिंगत करणें, त्याच्या लष्करी सामर्थ्याची वृद्धि करणें हे प्रकार वेंकाजीनंतर त्याचा पुत्र ( दुसरा ) शहाजी याच्याशिवाय इतर कोणीहि मराठा राजा अमलात आणूं शकला नाहीं.

अनेक राण्या व उपपत्न्या यांच्यामुळें भानगडी झाल्या.

१४ मराठे राजांच्या राण्या व उपपत्न्या याबद्दल थोडेसे विवेचन करून हें प्रकरण संपवूं. पूर्वी सर्वसाधारण जनता व राजा याच्या खाजगी व सार्वजनिक राहणींत म्हणण्यासारखा तफावत नसे. अशा काळीं राजानें अनेक विवाह केले असतां त्यापासून होणाऱ्या संततीमध्यें राज्याधिकारित्वासंबंधीं तंटे उपस्थित होत. राण्या व उपपत्न्या यांचे आप्तसंबंधी सार्वजनिक कार्यामध्यें लुडबुड करीत. दरबारांत कारस्थानें उत्पन्न होत. जबाबदार व्यक्तीस विषप्रयोगहि होत. राजाची सांसारिक काळजी वृद्धिंगत होऊन दुःखाचा उद्भव होई. या सर्वांचा परिणाम अर्थातच संस्थानाच्या

उन्नतीवर फार वाईट होई. शिवाय त्या काळी राजांचे प्रधान पूर्ण सत्ताधीश असत व राज्यव्यवस्था अनेक कारभाऱ्यांमध्यें विभागून दिलेली असे. त्याचा परिणाम सहाजिकपणेंच उद्वेगकारक होई.

प्रत्येक मराठी राजांच्या राण्या व उपपत्न्या यांची संख्या.

१५. वेंकाजीला दोन राण्या व नऊ उपपत्न्या होत्या. त्याला दहा मुलगे होते. वेंकाजीचा मुलगा ( दुसरा ) शहाजी यालाहि कित्येक उपपत्न्या होत्या. पहिल्या सरभोजीला तीन राण्या होत्या. तुकोजीला पांच राण्या व अनेक जातींच्या अशा सहा उपपत्न्या होत्या. दुसऱ्या एकोजीला सहा राण्या व तीन उपपत्न्या होत्या. प्रताप याला पांच राण्या व अनेक जातीच्या अशा सहा उपपत्न्या होत्या. तुळजा राजाला पांच राण्या होत्या. (दुसऱ्या) सरभोजीला दोन राण्या व चोवीस उपपत्न्या होत्या. शिवाजीला तास राण्या व अनेक उपपत्न्या होत्या. मुबलक द्रव्य व अनियंत्रित सत्ता हीं राजांजवळ असल्यामुळे बहुपत्नीकत्वानें त्यांना कधींहि खर्चाची अडचण भासलीसुद्धां नाहीं. बहुपत्नीकत्वाला धार्मिक अडचण कांहींच नव्हती. कारण शास्त्रप्रणेत्यानी तशी परवानगी पूर्वीच देऊन ठेविली आहे. परंतु राजकीय दृष्टीनें मात्र ही चाल फार अडचणी उत्पन्न करणारी व हीन राज्यव्यवस्थेला कारणीभूत झाली यांत शंका नाहीं.

राण्या व उपपत्न्या यांचे शिक्षण.

१६ राजाच्या उपपत्न्यांपैकी कित्येक फार गुणसंपन्न होत्या. त्या नामांकित रूपवती होत्या इतकेंच नव्हे परंतु त्या प्रख्यात विदुषी व नृत्यगायनांच्या कामांतहि फारच मार्मिक होत्या. विशेषतः नायक राजांच्या कित्येक तेलगू उपपत्न्या विदुषी म्हणूनहि प्रसिद्ध

आहेत. अशा कित्येक विदुषींनीं रचिलेलीं सुंदर व मनोहर पदें आजलाहि तामिल व तेलगू देशांत अनेक ठिकाणीं ऐकावयास मिळतात. **रंगाजी** या नांवाची एक प्रसिद्ध नायकीण **विजयराघव** नायकाची उपपत्नी होती. विद्वत्तेमध्यें तिची बरोबरी एकाहि नायकिणीनें आजपर्यंत केल्याचें प्रसिद्ध नाहीं. कारण ती मोठी विदुषी म्हणून आजहि प्रसिद्ध आहे. **विजयराघवाचा** विलास ज्यांत वर्णिला आहे असें ' मन्नरुदसा विलासम् ' नावाचें एक सर्वोत्कृष्ट काव्य तिनें रचिलें आहे.

**मुद्दुपल्लानि या उपपत्नीचें ग्रंथकर्तृत्व.**

१७ **प्रतापसिंहाची** उपपत्नी **मुद्दुपल्लानी** हीहि मराठ्यांच्या कारकीर्दीतील नामांकित नायकीण म्हणून प्रसिद्ध आहे. राधिकासन्तवनम् नावाचें एक काव्य तिनें रचिलें आहे. सप्तपादुल याचें कर्तृत्वहि तिच्याकडेसच आहे. **तिरुमल भट्टाचार्य** कुटुंबातील **वीरराघव देसिक** हा तिचा गुरु होता.

## Additional authorities.

1 The Report of the Tanjore Commission 1798.

2 Wilks: sketches of south Inda 2 vols.

3 Grant Duff: History of the Marathas vol I. ch 9.

4 Sarkar : Sivaji Ch. 12.

5 Takakhav and Keluskar; The life of Sivaji Maharaj Ch. 26

6 M. E. R. 1924 Page 119-122.

7 Exhibit No. B. 140 in Apeal No. 199 and 200 of 1919 In H. c. of Madras which gives a summary of the Mar. Ins.

8 Exhibit No. B. 141. Do which gives a summary of the Madras Tamil mss.

9 Tanjore district mannual part V ch 4.

10 Madura district manual part III ch 9.

# प्रकरण ४ थें

## ( दुसरा ) शहाजी सन १६८४ ते १७१२

### मुद्दे

१ वेंकाजीच्या तीन पुत्रांची कारकीर्द
२ मराठी सत्तेचा अपक्षय व मोंगलांची सरशी
३ राजाराम व ताराबाई यांचे पराक्रम.
४ जिंजीचा वेढा व झुल्फिकारखानाची कामगिरी.
५ शहाजीचा वकील व सेनापतीचा पराक्रम.
६ म्हैसूर, त्रिचनापल्ली, मदुरा व तंजावर यांची युद्धें.
७ शहाजीचें कर्तृत्व.
८ शहाजी व तत्कालीन वा[illegible].
९ कांहीं तामिल नाटकें.
१० या कारकीर्दीतील तेलगू वाङ्मय
११ संस्कृत वाङ्मय व पंडित
१२ इतर संस्कृतज्ञ पंडित.
१३ बाकीचे पंडित व त्यांची विद्वत्ता.
१४ इतर ग्रंथकार.
१५ शृंगारमंजरी नाटक.
१६ अप्पय्या दीक्षिताची माहिती.
१७ विद्वत्समूहाची स्तुति व राजावरचे अभिनंदन.
१८ भोसल्यांचें विरक्त जीवन.
१९ मराठी राजे व तामिल वाङ्मयाची आवड.
२० कांहीं तामिल ग्रंथ व ग्रंथकार.
२१ मराठी ग्रंथरचना.
२२ मराठी राजे व ख्रिस्ती लोक.
२३ ख्रिस्ती लोकांचे अपराध.



राजा शहाजी

( व्यंकोजीचा वडील पुत्र व तंजावरचा दुसरा राजा )

# प्रकरण ४ थें

## (दुसरा) शहाजी सन १६८४ ते १७१२

### मुद्दे

१ व्यंकोजींच्या तीन पुत्रांची कारकीर्द.
२ मराठी सत्तेचा अपक्षय व भोंसल्यांची सरशी.
३ राजाराम व ताराबाई यांचे पराक्रम.
४ जिंजीचा वेढा व झुल्फिकारखानाची कारागिरी.
५ शहाजीचा वकील व सेनापतीचा पराक्रम.
६ म्हैसूर, त्रिचनापल्ली, मदुरा व तंजावर यांचीं युद्धें.
७ शहाजींचे कर्तृत्व.
८ शहाजी व तत्कालीन वा[illegible]न.
९ कांहीं तामिल नाटकें
१० या कारकीर्दींतील [illegible]
११ संस्कृत वाङ्मय व पंडित
१२ इतर संस्कृतज्ञ पंडित.
१३ वाक्षीचे पंडित व त्यांची विद्वत्ता.
१४ इतर ग्रंथकार.
१५ शृंगारमंजरी नाटक
१६ अप्पय्या दीक्षिताची माहिती.
१७ विद्वत्समूहाची स्तुति व तंजावरचे अभिनंदन.
१८ भोंसल्यांचें धार्मिक जीवन.
१९ मराठी राजे व तामिल वाङ्मयाची आवड.
२० कांहीं तामिल ग्रंथ व ग्रंथकार.
२१ मराठी ग्रंथरचना.
२२ मराठी राजे व ख्रिस्ती लोक.
२३ ख्रिस्ती लोकांचे अपराध.

१ बृहदीश्वर शिलालेखावरून (प्र. १ पहा) दिसतें कीं, शहाजी, सरभोजी व तुकोजी असे तीन पुत्र एकोजीस होते, व त्यानीं एका विचारानें राज्य केलें. या तिघांची एकी होती याला

**एकोजीच्या तीन पुत्रांची कारकीर्द.**

अन्य प्रमाण म्हणजे धर्मकूट हा ग्रंथ होय. हे तिघेहि राजपुत्र वयांत आल्यावर पृथक् ठिकाणीं राहत असत. यांच्यापैकी सरभोजी हा कुंभकोणम जवळ सक्कोटाई येथें व सर्वांत लहान तुकोजी हा मानारगुंडी सुभ्यातील महादेवीपट्टण येथें राहत असे. थोरला शहाजी हा राजपदधारी असल्यानें कदाचित् बहुधा तंजावरासच राहत असणे साहजिक आहे. बहुदा पहिले दोघे हे त्या त्या ठिकाणचे सुभेदार असावेत. शके १६३३ नंदननाम संवत्सरे म्हणजे सन १७१२ मध्ये (दुसरा) शहाजी हा अवघा चाळीस वर्षांचा असताना निपुत्रिक मृत्यु पावला. शहाजीच्या मृत्यूनंतर सरभोजी व तुकोजी हे एकचित्तानें राज्याची व्यवस्था पाहूं लागले. परंतु शके १६४९ प्लवंगनाम संवत्सरे म्हणजे सन १७२८ मध्यें सरभोजी हाहि वयाच्या त्रेपनाव्या वर्षीं निवर्तला. दुसरा एक शिलालेख शके १६४० मध्ये कोरलेला आहे, त्यावरूनहि या तिघा बंधूंनीं एका विचारानें राज्य केल्याचें निश्चित होतें. सरभोजीच्या मृत्यूनंतर सन १७२८ मध्यें तुकोजी हा राज्याचा एकटा धनि झाला. तो शके १६५७ अनल संवत्सरांत (म्हणजे सन १७३६ मध्यें) आपल्या वयाच्या एकुणसाठाव्या वर्षीं मृत्यु पावला. एकोजीनें शेवटपर्यंत राज्य केलें.

२ शिवछत्रपतीच्या मृत्यूनंतर मराठ्यांच्या सत्तेला उतरतीच कळा लागली. सन १६८७ मध्यें औरंगजेबानें दक्षिणेकडील

सुलतान नामशेष केले व औरंगजेबाच्या सरदारांनीं पश्चिम हिंदुस्थानांतील मराठी सत्ता खिळखिळी करून टाकिली. विजापुरकरांशीं दुसऱ्या शहाजीचें रहस्य होतें असें शिलालेखावरून दिसतें व औरंगजेबापुढें विजापुरकर सरदार पळून गेल्यावर सरभोजीनें त्यांना मदत केली असें मद्रास येथील कांहीं हस्तलेखावरून दिसते.

**मराठी सत्तेचा आपकर्ष व मोंगलांची सरशी**

३ औरंगजेबानें दक्षिणेत स्वारी केली तेव्हां मराठ्यांनी सातारा ही राजधानी सोडून दिली व स्वतः राजाराम जिंजीस जाऊन राहिला. अर्थात्च मोगलांना प्रतिकार करण्याचें मराठ्यांचें केंद्रहि सातार्‍याहून जिंजीस गेलें. राजाराम व त्याची राणी ताराबाई यांनीं मोंगलांच्या स्वाऱ्याचा प्रतिकार मोठ्या शौर्यानें केला व त्यांचे सेनापति आणि सैन्य यांना जिंजीच्या किल्ल्यापर्यंत नेलें. साताराचा राजाराम व तंजावरचा दुसरा शहाजी यांचें नातें पुढें दर्शविल्याप्रमाणें चुलतभावांचें होते.

**राजाराम व ताराबाई यांचें पराक्रम.**




राजारामावरील या आपत्तीच्या प्रसंगीं दुसऱ्या शहाजीनें त्याला मदत केली होती असें ' धर्मकूट ' ग्रंथावरून दिसतें. एकोजीनेंहि रजारामाला मदत केली होती असें ऑर्म म्हणतो. ती

मदत **राजारामाला** नसून संभाजीला केली असणें संभवनीय दिसतें. व **अय्या अय्वालच्या** शाहेंद्रविलास काव्यावरून असेच दिसतें. फोर्ट सेंट जॉर्ज येथील सन १६९० ची रोजनिशी व विचारविनिमयाचे चोपडे ( Diary and consultation book ) यावरून असे दिसतें कीं, **एकोजीनें** मोगलाचा पराजय करण्यासाठीं **राजारामाला** स्वारांची व पैशाचीहि मदत केली होती. सन १६९३ मध्यें **राजारामानें** तंजावराहून पुनः मदत मिळवून वीस हजार स्वारांचें पथक जिंजीस आणिलें.

**जिंजीचा वेढा व झुलफिकारखानांची कर्तबगारी**

४ जिंजीला मोगलांचा वेढा पडला होता, त्या काळात मोगलांनी आसपासच्या गांवांवर खंडण्या बसविल्या. सन १६९८ मध्ये मोगलांनी जिंजीचा किल्ला सर केला. तेव्हा हिंदुस्थानातील मोगलांचे विजयहि पूर्णच झाले. जिंजीचा वेढा लढविणारा मोगलाचा सेनापति झुल्फिकारखान यानें सन १६९१ पासून तंजावर जिंकून चार लक्ष रुपयाची खंडणी तंजावरावर लादली होती. परंतु ही खंडणीची रक्कम वसूल करण्यास नेहमीं सालोसाल स्वाऱ्या कराव्या लागत. सन १६९३, १६९४, १६९८, १७००, १७०१ या सालांतील फोर्ट सेंट जॉर्जच्या पत्रांवरून स्पष्ट दिसते की, तंजावराहून खंडणीची रक्कम सालोसाल वसूल करण्याला मोगल सेनापतींना तंजावरावर चाल करून जावे लागत असे. दुसऱ्या **शहाजीनें** त्रिचनापल्लीच्या **मंगम्माल** राणीकडून कांहीं प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला होता. झुल्फिकारखानानें तो सन १६९७ मध्ये परत राणीस देवविला, असा उल्लेख नवावास लिहिलेल्या एका टाचणात दिसतो. कर्नाटकाच्या फौजदारीच्या जागेवर **झुल्फिकार-**

ख्यानानंतर दाऊदखानाची नेमणूक झाली. त्यानें झुल्फिकारखाना-च्याच किल्ला गिरविला होता. खंडणी वसूल करण्यासाठी त्यानेंहि तंजावरावर मुसलमानी स्वाऱ्या केलेल्या दिसतात. याप्रमाणें तंजावरचें आधिपत्य आदिलशहाकडून मराठ्यांना घेतलें शिवाजीस अर्पण केलें व नंतर दिल्लीच्या मोगलांस दिलें.

५ दुसऱ्या शहाजीचा वकील गंगाधर याचा मुलगा बाबाजी यानें पंजर व पुदुकोटाई यांच्यामधील प्रांत हस्तगत करून तेथे एक किल्ला बांधिला असें पुदुकोटाईच्या शिलालेखांत अभिमानपूर्वक उल्लेखिलें आहे. परंतु सेतुपती राजानें हा प्रांत हस्तगत केला होता हें पूर्वीच सांगितलें आहे. मरवाच्या मुख्याविरुद्ध मरवांला या दुसऱ्या शहाजीनें मदत केल्याचें ' धर्मकूट ' ग्रंथांत लिहिलें आहे.

शहाजीचा वकील व सेतुपतीचा पराक्रम.

६ सेतुपतीच्या साहाय्यानें दुसऱ्या शहाजीनें त्रिचनापल्लीच्या मंगम्माळ राणीचा कांहीं प्रांत हस्तगत केला होता. ( मदुरा व त्रिचनापल्ली हीं राज्यें पूर्वीच एक झालीं होतीं. ) त्यासाठीं सन १७०० मध्यें दुसऱ्या शहाजीशीं तिचें युद्ध सुरू होतें. या युद्धांत राणीनें शहाजीचा पराजय केला, परंतु शहाजीचा दिवाण बालोजी ( बाबाजी ? ) यानें शत्रुपक्षाला लांच देऊन शांतता प्रस्थापित केली. पुढें लवकरच म्हैसूरकरांनी कावेरीवर एक पूल बांधिला त्यायोगें त्रिचनापल्ली व तंजावर यांना सारखेंच संकट उत्पन्न झाल्यामुळें तंजावरकरांनी आपली बाजू बदलली. कावेरीचा धक्का पडल्यानें भावी युद्धाचें संकट टळलें. परंतु तंजावर व त्रिचनापल्ली येथील

म्हैसूर, त्रिचनापल्ली मदुरा व तंजावर यांचीं युद्धें.

आधिपतींचें सर्वसाधारण सख्य इंग्रजांशी जर झालें नसतें तर या उभयतां आधिपतींनीं [illegible] धक्क्यावर म्हैसूरकरांशीं निकराची लढाई केली असती. त्रिचनापल्ली व तंजावर येथील संस्थानिकांचें वैर पिढीजात होतें. परंतु तें नाहींसें होऊन त्यांचें सख्य झाल्यानें म्हैसूरचा [illegible] हा राजा फार [illegible] झाला. तथापि त्यानें त्रिचनापल्लीच्या मंगम्माळ राणीच्या फौजेचा पराजय करून सन १७०९ मध्यें तंजावरकर (दुसऱ्या) शहाजीचा अरणींगी किल्ला हस्तगत केलाच. [illegible] एकदा एकाचा तर नंतर दुसऱ्याचा याप्रमाणें म्हैसूर-तंजावर-त्रिचनापल्ली व [illegible] विजय-पराजय [illegible] पर्यंत चालू होता. परंतु या [illegible] एतद्देशीय [illegible] अधिक सुखी असा राहिला नाहीं. कारण तसा जर [illegible] राहिला असता तर त्यानें युद्धांतून तत्काळ आपलें अंग काढूनच घेतलें असतें. असो.

७ दुसरा शहाजी [illegible] गादीवर



[illegible] जरी [illegible] अगदीं अल्प त्याचा होता तरी [illegible] मोठ्या चातुर्यानें व हुशारीनें चालविलें. शहाजी हा स्वतः फार चाणाक्ष व दूरदर्शी होता. एकोजीच्या वेळचें निष्णात कारभारीमंडळ त्यास मदत करण्यास सिद्धच होतें. याच्या कारकीर्दींत [illegible] समृद्धी असे. एकोजीच्या वेळची (म्हणजे त्याच्या पित्याच्या कारकीर्दींतील) व्यवस्था त्यानें तशीच सुरळीतपणें पुढें चालविली होती असें मद्रास येथील हस्तलिखितावरून दिसतें. या कारकीर्दींत जमिनीवरील सार्‍यांत वाढ झाली होती तरी प्रजा नाराज नसून आनंदी व आज्ञाधारक अशीच राहिली होती असें सन १७२८ च्या

कमीशननें लिहून ठेविलें आहे. या शहाजीनें तंजावर येथील किल्ला सुधारून दुरुस्त केला, कांहीं धर्मशाळा नवीन बांधविल्या व कित्येक रुग्णालयेंहि उभारलीं. या रुग्णाल्यांत रोग्यांना योग्य उपचार करण्यासाठीं अरबस्थानांतून मोठमोठें नामांकित हकीमहि राजानें आणविले व दिवाणी आणि फौजदारी दावे चालविण्यासाठीं उत्कृष्ट न्यायमंदिरें स्थापन केलीं, असे हिकी म्हणतो. इंग्रजी ईस्ट इंडिया कंपनीच्या लेखावरून असें दिसतें कीं, या शहाजीच्या सैन्यांत घोडदळ व पायदळ मिळून चौदा हजाराची संख्या होती. एवढ्या सैन्यानें सन १६९९ मध्ये ट्रँक्वेबारला वेढा घातला होता. यावरून उघड दिसतें की, ज्याच्या जोरावर राज्याचे महत्त्व व थोरपण अवलंबून असतें त्या सेनेच्या पराक्रमपटुत्वाविषयींहि ( दुसरा ) शहाजी मोठा दक्ष असे.

**शहाजी व तत्कालीन वाङ्मयोत्तेजन.**

८ शहाजीच्या कारकीर्दींत वाङ्मयाची इतकी समृद्धी झाली होती कीं, तंजावरचा एकहि राजा या बाबतींत या शहाजीची बरोबरी करूं शकत नाहीं, असे दिसते. तो स्वतः मोठा विद्वान् व भाषाशास्त्रज्ञ होता. त्याने शिक्षणाला उत्तेजन दिले. छापखाने व सुज्ञ वाचकवर्ग यांचे अभावीं राजे, सरदार मंडळी आणि लक्ष्मीपुत्र यांनींच विद्येची थोरवी जाणून विद्वानांना उत्तेजन दिलें पाहिजे व त्यांच्या वाङ्मयसेवेचें चीज केलें पाहिजे. लक्ष्मी व सरस्वती यांचे वैर नैसर्गिक असल्यानें अशिक्षित श्रीमंताना लक्ष्मी फारच प्रिय असते व ते तिला जीवापाड जपतात. सरस्वतीभक्त मात्र बहुशः दरिद्रीच असतात. यामुळे सरस्वतीदेवी ही दारिद्र्यदेवतेची सतत प्रार्थना करून आपल्या भक्ताना जमतेस तीवढा केविलवाचा भ्रमत्व करिते.

**कांहीं तामिल नाटकें**

९ या कारकीर्दीच्या वर्णनात्मक अशीं कांहीं तामिल नाटकें तंजावरच्या पुस्तकालयांत आढळतात. तामिल भाषेत त्यांना कुथु ( कथा ? ) म्हणतात. भूलोकदेवेंद्रविलासम्, अतिरूपवती कल्याणम्, शंकरनारायण कल्याणम्, चंद्रिकाहासविलास नाटकम्, कोरवंजी, विष्णुसहराज विलासम् हीं सर्व नाटकें तामिळ भाषेत आहेत. यांची गणना उच्च वाङ्मयात होत नाही. कारण, यांतील कथानक, विनोद व रचना-पद्धति ही उच्च प्रकारची नसून यातील काही भाग थोडासा अश्लील आहे. ही नाटकें बहुदा राजदरबारांत होत असावींत. मराठ्यांची व्यावहारिक भाषा या नाटकांतील पात्रांच्या तोंडी घातली आहे. एखादी राजकन्या शहाजावर प्रेम करूं लागते व शेवटी त्याच्याशीं विवाह लाविते असें साधारण कथानक या प्रत्येक नाटकांत आहे. एक मोठा भाषापंडित व योद्धा अशा रीतीचे वर्णन या नाटकांतून या शहाजीराजाचें केलेले आहे. याशिवाय यांत जो भाग आहे त्यांत फकोजी, शहाजी व सरफोजी यांची विशेषतः स्तुति केली, व असे भाग मोठे मोठे व विस्तृत आहेत. परंतु ते वाङ्मयाच्या उत्कृष्टपणाचे दर्शक नाहींत.

**या कारकीर्दींतील तेलगू वाङ्मय**

१० पूर्वी नायक राजांच्या कारकीर्दींत तेलगू भाषेतहि कांहीं ग्रंथ रचिलेले दिसतात. त्या नायक राजांच्या कारकीर्दीनंतर तंजावरास मराठी राजे आले त्या मराठी राजांच्या कारकीर्दींत तयार झालेल्या ग्रंथांची माहिती वर दिलीच आहे. या ग्रंथांशिवाय या कारकीर्दींत कांहीं ग्रंथरचना तेलगू वाङ्मयातहि झालेली आहे. परंतु हे ग्रंथहि पूर्वीच्या नायक राजांच्या कारकीर्दींत तयार झालेल्या

तेलगू वाङ्मयाच्या ग्रंथांच्या दृष्टीनें हीनच ठरतात. मराठे हे राज्यकर्ते होईपर्यंत पूर्वीच्या राजदरबारांत तेलगू भाषाभिज्ञ वगैरे होतेच. अर्थात् मराठी राजांनीहि त्या वर्गांना दरबारी नोकरींत पुढें चालूंच ठेविलें. होतें. शहाजीनें आपल्या बंधूंच्या मदतीनें मुसलमानांचा पराजय केला, मदुरा हस्तगत केली व बनारस पावेतोंचा प्रांत जिंकिला असे वर्णन सहराज विलास नाटकामध्यें आहे. येथें बनारस पावेतोंच्या विजयाचा उल्लेख झाला आहे, परंतु त्यावरून दुसऱ्या शहाजीनें फारतर एखादे वेळीं काशीची यात्रा केली असेल एवढेच समजावयाचे आहे. कारण त्यानें उत्तरेकडे बनारसपर्यंत विजय मिळविल्याचा दाखला ऐतिहासिक साधनांत उपलब्ध नाहीं. शिवाय सहराजविलास ही तामिल भाषेतील कुरु ( कथा ) असून तेलगू लिपींमध्यें लिहिलेली आहे.

११ सन १६७६ पासून १७३६ पर्यंतच्या सुमारें साठ वर्षांच्या

संस्कृत वाङ्मय व पंडित

काळांत उच्च दर्जाचें संस्कृत वाङ्मय निर्माण झालेलें आहे. धर्मकूट ग्रंथाचा उल्लेख पूर्वीं एकवेळ येऊन गेलाच आहे. दुसरा शहाजी हा सर्वतोपरी श्रेष्ठ राजा असल्याबद्दल त्याची पुष्कळ स्तुती या ग्रंथांत केली आहे. त्र्यंबकरायमखी या विद्वानानें रामायणाचा एक नवीन व निराळा अर्थ बसविला आहे. एकोजीनें या कवीची आर्थिक उन्नति करून त्याला आपला पुत्र जो दुसरा शहाजी याचा कारभारी नेमिलें. एकोजीचा मंत्री जो गंगाधर मखी त्याला तीन पुत्र होते. त्यांची नावें त्र्यंबक, नरसिंह व भगवंत अशीं होतीं. पूर्वोक्त त्र्यंबकराय हा या तिघांपैकीं ज्येष्ठ होय. दुसरा भाऊ नरसिंह मखी हा होता. यानेच त्रिपुरविजय-चंपू

नामक **ग्रंथ** रचिला. हा **नरसिंहहि** कांही काळपर्यंत **एकोजीचा मंत्री** होता. ( दुसऱ्या ) **शहाजीनंतर सरभोजी हा** गादीवर आला. त्यानेहि आपल्या दिवाणाच्या जागीं पूर्वोक्त **त्र्यंबकरामाला** ठेविलें होतें. त्याचा भावाटा भाऊ जो **नरसिंह** याचा पुत्र **आनंदराय** मखी यानें आचारनवनीत नांवाचा एक **ग्रंथ** लिहिलेला आहे, त्यावरून असें सिद्ध होतें की, **सन** १६९८ मध्यें **त्र्यंबक** दिवाणानें शहाजीच्या मदतीनें एक मोठा यज्ञ केला होता. **स्त्रीधर्म** नांवाचा एक **ग्रंथ** या **त्र्यंबकानेंच** केलेला आहे. **गंगाधराचा** सर्वांत लहान पुत्र **भगवंतराय** याचें नांव वर आलेंच आहे. राघवाभ्युदय नाटक, मुकुंदविलास काव्य आणि उत्तरचंपु हे ग्रंथ या **भगवंतरायानेंच** रचिलेले प्रसिद्ध आहेत.

**इतर संस्कृतज्ञ पंडित**

१२. **शहाजीच्या** दरबारांत **वेंकटकृष्ण** दीक्षितार या नांवाचा एक कविशिरोमणि होता. **त्यानेंच** नटेश विजयम् नाटक लिहिलें आहे. सन १६९३ मध्यें **शहाजीनें** तिरुवसनलुर या खेडें गांवाचें मूळ नांव बदलून शहाजीराजापुरम् असें नवीन नाव ठेविलें व तो गांव आपल्या दरबारांतील शेहेचाळीस पंडितांना देणगी म्हणून दिला. या शेहेचाळीस पंडितातच उपर्युक्त **वेंकटकवि** हा एक होता. हा खेडेंगांव **विद्वानांचें** माहेरघर **म्हणून** प्रसिद्ध होता. कारण भाषा, **वाङ्मय**, तत्वज्ञान व औषधी यांबद्दल तंजावरांतील मराठी **कारकीर्दींत** हा गाव फार प्रसिद्ध होता. कांही नामांकित तेलगू व्यक्ती याच गावतील म्हणून प्रसिद्ध होत्या. **वेंकटकवीनें** नटेशविजय नाटकाशिवाय 'श्रीरामचंद्रोदय **काव्य**, उत्तर

चंपु व कुशलवविजय नाटक हे ग्रंथ लिहिले आहेत. तंजावर येथें राजधानीच असल्यानें तेथें तो प्रसिद्ध होता इतकेंच नव्हे, पण त्रिचनापल्ली व जिंजी या शहरांतील दरबारामध्येंहि तो नामांकित विद्वान् म्हणून विख्यात होता.

बाकीचे पंडित व त्यांची विद्वत्ता.

१३. **शहाजीनें** आपल्या दरबारांतील शेहेचाळीस पंडितांना एक गांव इनाम दिल्याचा उल्लेख वर आलाच आहे. त्या शेहेचाळीस पंडितांतील आणखी काही विद्वानांची ओळख वाचकांना करून देणे इष्ट आहे. मदनभूषण व गौरीमयूरचंपू हे ग्रंथ आप्पा **दीक्षिताचे** आहेत. शिवाय या **अप्पानें** गौरीमयूर नांवाचा एक ग्रंथ लिहून तो त्याचा आश्रयदाता **आनंदराय** याच्या नावानें प्रसिद्ध केला. या शेहेचाळीस कवीमध्ये **रामभद्रदीक्षित** हा कवि सर्वांत श्रेष्ठ होता. त्याची बुद्धिमत्ता सागराप्रमाणें विस्तीर्ण व पाताळासारखी खोल होती. **तिरुमलनायकाच्या** दरबारांत ज्यानें विद्वत्तेंत अग्रमान मिळविला तो **नीळकंठ** दीक्षिताचा शिष्य होय. वेदान्ती भगवत्पद **बाळकृष्ण** व **चोक्कनाथ** दीक्षित यांच्या विद्या तर **रामभद्रानें** सहज ग्रहण केल्या. यांच्यापैकीं **चोक्कनाथ** दीक्षितानें आपली कन्या **रामभद्राला** देऊन जांवई करून घेतलें. दर्शनशास्त्र, व्याकरण व स्वर यांमध्यें **रामभद्रानें** लवकरच प्राविण्य संपादन केलें. वस्तुतः **अर्वाचीन पतंजली** या नांवानें तो प्रख्यात झाला होता. त्याने अनेक ग्रंथ रचिले आहेत. त्यांपैकी कांहींचा उल्लेख करावयाचे मनांत आणिलें तर जानकी परिणय, शृंगारतिलकाभाण परिभासवृत्तीवरील टीका आणि **सद्दर्शन सिद्धांतसंग्रह** असा उल्लेख करितां येईल. **कुंभकोणम्** जवळ **कडार-**

मणिक्कम् नांवाच्या गांवचा **रामभद्र** हा मूळचा राहणारा होता. विद्वानांना या कंडारमणिक्कम् गांवांत विद्वत्तेचें बाळकडू मिळत असे. **रामभद्र** हा विव्दन्मंडळांतील मुकुटमणि म्हणून प्रसिद्ध झाला होता. संस्कृत भाषेच्या इतिहासांत ही त्याची प्रसिद्धी वज्राक्षराप्रमाणें चिरंजीव राहिलेली आहे.

इतर ग्रंथकार

१४. सिद्धान्तसिद्धाजन हा एक वेदान्तपर ग्रंथ आहे. त्यावर रत्नतूलिका नांवाची टीका लिहिणारा **भास्कर** दीक्षित नावाचा विद्वान, विद्यापरिणय व जीवानन्द हे दोन ग्रंथ लिहून ते आश्रयदाता **आनंदराय** मखीला अर्पण करणारा **वेदकवि**, सुखसंदेश व अद्भुतदर्पण नाटक याचा कर्ता महादेव कवि, रसात्मक काव्याचा कर्ता म्हणून आजहि प्रसिद्ध असलेला **वेंकटेश** उर्फ **अय्या अवल**, शृंगारमंजरी शहाजीयम् या काव्याचा कर्ता **पेरियाप्पा** कवि याची श्रेष्ठ स्तुतिस्तोत्रें **शहाजीच्या** दरबारांतील ज्या नऊ कवींनीं केली आहेत ते नऊ कवी व **पेरियाप्पा** कवि अशा इतर अनेक प्रसिद्ध कवींनीं तिरुवसनलुर येथें **शहाजीच्या** वदान्यत्वाचा लाभ घेतलेला आहे.

शृंगारमंजरी नाटक

१५. शृंगारमंजरी शाहजीयम् हें नाटक असून तेंच तिरुवइयर येथें उत्सवप्रसंगीं करावें असें ठरलें होतें. हे काव्य **शहाजीच्या** चरित्रांतील ऐतिहासिक भागावर रचिलेलें आहे. **शहाजी** एका सुंदरीवर प्रेमानें अगदी लुब्ध झाला होता असा प्रसंग यात वर्णिला आहे. या नाटकात नायिकेच्या सौंदर्याचें आणि नायक तें सौंदर्य पाहून अगदी भुलून गेल्याचें उत्कृष्ट व नमुनेदार वर्णन आहे. कवि **पेरियाप्पा** हा एक

विद्वान् घराण्यांतील असून दरबारामध्यें तत्कालीन विद्वच्छिरोमणीच्या मालिकेंतील एक म्हणून प्रसिद्ध होता.

अप्पया दीक्षिताची माहिती

१६. रामराज्याभिषेक नाटक व वल्लीपरिणय यांचें प्रयोग पेरियाप्पाच्या खेड्यांतील उत्सवप्रसंगीं होत असत. तिरुवसनालुर येथील वीरराघव याचें पार्वतीस्तोत्र त्यानें याच काळांत लिहिलेलें आहे. दंदार माणिकम नाटकाचा कर्ता नल्लु कवि होय. या कर्त्यानें राजाज्ञेवरून कर्मकांडावरहि ग्रंथरचना केलेली आहे. अप्पया दीक्षित हा मयूरगौरीचा राहणारा होता. त्यानें आचार-नवनीत नांवाचा ग्रंथ रचिला हें पूर्वींच सांगितलें आहे. या ग्रंथांत अन्त्यविधि व श्राद्धविधि या संबंधीं माहिती दिली आहे. राजाच्या इच्छेवरून अप्पय्यानें प्रथम एक सारग्रंथ तयार केला व राजानेंहि स्वतः कांहीं भाग रचिलेला आहे, असें म्हणतात. राजाला उद्देशून एक अष्टपदी रचिलेली असून गायनप्रसंगीं ती म्हणतात. असें सांगतात कीं, शहाजी हा उत्कृष्ट ग्रंथकार व परीक्षक असल्यानें त्यास अठराव्या शतकांतील भोज म्हणतात. ( प. ७ पहा. )

विद्वत्समूहाची स्तुति व तंजावराचें अभिनंदन

१७. सन १५५० ते सन १७५० या दोनशें वर्षांच्या काळांत नायक व मराठे यांचें राज्य तंजावरास एका मागून दुसरें असें झालें. या दोनशे वर्षांच्या काळांत वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचा जो उत्कर्ष तंजावरास झाला त्याचें पूर्णपणें आकलन कोणासहि झालें नाहीं, त्यामुळें त्याचें महत्त्वहि फारसें कोणाच्या लक्षांत आलें नाहीं. राजकार्यदृष्ट्या तंजावर स्वतंत्र नसलें तरी तेथील विद्वानांनीं आपल्या अलौकिक बुद्धिसामर्थ्यानें सर्व दक्षिण हिंदुस्थानचें अग्रेसरत्व मिळ-

विले होतें. तंजावरचा इतिहास इतर सर्व बाजूंनीं रूक्ष व नीरस असला तरी तेथील विद्वत्समूहाच्या तेजस्वी बुद्धिसामर्थ्यानें तो सत्यशोधकाचें मनोरंजन करीत असतो व म्हणून एवढा भाग वाळ-वंटांतील सुपीक प्रदेशाप्रमाणें आल्हाददायक आहे यांत संशय नाहीं.

भोंसल्यांचें विरक्त जीवन.

१८. अद्वैतकीर्तन या नांवाचा एक ग्रंथ तामिल भाषेंत लिहिलेला आहे. त्यावरून, शेंवटीं शेंवटी शहाजी हा संसाराला कंटाळून योगी झाला असावा असें वाटतें. जगांत राहून विरक्त असण्याची मनोवृत्ति शिवाजी पासून दृश्यमान् होत असून ती एकोजी व शहाजी याच्यामध्येंहि होती. महाराष्ट्रीयांच्या प्रमाणेंच भोंसले घराण्यांतील व्यक्तींच्या मनावरहि असलेलें साधूंचें नैतिक वजन ( तंजावराकडेस सुद्धां ) भोंसल्यांच्या मनावर कायम असल्याचें दृश्यमान होतें. शहाजीच्या कारकीर्दींत भोंसलवंशावली नांवाचा एक संस्कृत ग्रंथ झालेला आहे; त्यावरून असें दिसतें कीं, शहाजीची एक भगिनी मोठी योगिनी होती. अद्वैत-कीर्तन नांवाचा दुसरा एक ग्रंथ आहे, त्यावरून शहाजी हा परब्रह्मानंदयोगी व त्याचा शिष्य पूर्णब्रह्मानन्दयोगी या साधु पुरुषाचा मोठा भक्त होता असें दिसतें. योगी पूर्णब्रह्मानन्द हा प्रायश्चित्तदीपिका व उपग्रंथदीप या ग्रंथांचा कर्ता पूर्वाश्रमांतील अप्पाशास्त्री होय. हा केदारमाणिकमचा राहणारा होता. कृष्णा-नन्द सरस्वती हा सिद्धान्त-सिद्धांजन या वेदान्त निबंधपर ग्रंथाचा लेखक होय. या ग्रंथांत अद्वैत तत्त्वांचें प्रतिपादन केलेलें आहे. त्रिपुर उपनिषद् भाष्याचा कर्ता रामानन्द हा बहुदा या कृष्णानंदाचा शिष्य असावा; शहाजीच्या कारकीर्दींतील

**भास्कर दीक्षित** हा या **कृष्णानंदाचा** गुरु होता. दीक्षित **गुरूनें कृष्णानंद** शिष्याच्या ग्रंथावर एक टीका लिहिली आहे. यानंतर सुमारें पन्नास वर्षांनीं **सदाशिव ब्रह्मेंद्र** हा एक महात्मा होऊन गेला. **धावडशीकर ब्रह्मेन्द्रस्वामी** तो हा नव्हे. या महात्मा **ब्रह्मेंद्रानें** ब्रह्मतत्त्वप्रकाशिका नांवाच्या ग्रंथांत ब्रह्मसूत्रांचें विशदीकरण केलें आहे. या शिवाय अद्वैततत्त्वज्ञानांत परंपरागत ज्ञान प्राप्त झालेल्या कांहीं यतींचीं नावेंहि आपण ऐकितों. ज्ञानसूर्याच्या प्रकाशानें जगांतील अज्ञानांधकाराचा नाश करण्याचें कार्य परमेश्वरानें **शंकराचार्यांस** सोंपिलें आहे अशी इकडील श्रद्धावन्त लोकांची समजूत आहे. कुंभकोणम् येथील एक आचार्य-पीठ प्रसिद्धच आहे. या पीठावरील शंकराचार्यांना आपल्या धर्मा-संबंधीच्या कर्तव्यांत वर सांगितलेल्या विद्वान् यतींची फार मदत होत असे. **अप्पया** दीक्षितानंतर तत्त्वज्ञानविषयक पूर्वोत्तरपक्षयुक्त तत्त्वज्ञानात्मकअभ्यासाचा पुनरपि पुरस्कार करण्यांत आला. मराठी राजांनां अद्वैत मताचा अभिमान पुष्कळच असल्यानें त्यांनीं त्या मताचा केलेला पुरस्कार दीर्घकालजीवी आहे असें आज तरी वाटतें.

**मराठी राजे व तामिल वाङ्मयाची आबाळ.**

१९. तंजावर येथील मराठ्यांच्या कारकीर्दींत साधारणतः तामिल वाङ्मयाला उत्तेजन मिळालें नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें. संस्कृत व तेलगू वाङ्मयाचें पुनरुज्जीवन झालें, परंतु तामिल वाङ्मयाला हें सद्भाग्य लाभलें नाहीं. नवीन म्हणजे मराठी राज्यकर्त्यांनीं नायक राजांचेंच वाङ्मयासंबंधीचें ब्रीद पुढें चालविलें असेंच म्हटलें पाहिजे. कारण तामिल भाषेकडेस नायक राजानींहि दुर्लक्ष्यच केलें होतें,

परंतु तामिल भाषेला उत्तेजन देण्याचें कार्य मठाधीशांनीं अव्याहतपणें मात्र चालविलें होतें. अशा रीतीनें उत्तेजन मिळालेल्या तामिल वाङ्मयांतील उत्कृष्टपैकीं स्थलपुराणें, शैववैष्णवमतानुयायी पवित्र वाङ्मयाचें सार, त्यावरील टीका व कमी प्रतीची कांहीं नाटकें अशीं वाङ्मयविषयक कित्येक उदाहरणें देतां येतील. बुद्ध व जैन याच्या भरभराटीच्या वेळीं उच्च व अनेकविध तामिळ वाङ्मय अस्तित्वांत आलें. त्याच्या खालोखाल मिशनरींच्या चळवळीनें प्रचलित तामिल भाषेची अभिवृद्धि झपाट्यानें झाली यांत संशय नाहीं.

**कांहीं तामिल ग्रंथ व ग्रंथकार**

२०. अशा या रूक्ष कालखंडांतहि सन १७०० मधील **वेदारण्यमूचें** थायुमनवर व सन १७५० मधील एका कवीचें अरुणाचलकविरापुर हीं काव्यें अपवादरूपानें कां होईना पण निर्माण झालीं हें सत्य आहे. थायुमनवर हें काव्य उत्कट मनोविकार असले व तन्मयता प्राप्त झाली तरच उत्कृष्ट म्हणता येतें. या आपल्या विपुलवाङ्मयकृतानें मद्रासेकडे **शियाली** हा सर्वतोमुखीं झालेला आहे. सन १६८० मधील तिरुवरचा **वैद्यनाथ देसीकर** आणि **स्वामिनाथ देसीकर** यांच्यासारखे विद्वच्छिरोमणी, तिरुवादुथुराईचा अनेक शास्त्रवेत्ता **तंबिरण** सन १७८२ मधील **शिवज्ञानस्वामिगल** इत्यादि विद्वानाची नामावली आपआपल्या तामिल वाङ्मयविषयक कृतीनें मद्रासेकडेस अमर झाली आहे. मिळलै-शतकम् या ग्रंथाचा कर्ता कवि **शर्करपुलवर** हा प्रतापाच्या कारकीर्दीचा उल्लेख करीत असल्यानें दुसऱ्या एका तामिल विद्वान् कुटुंबाचा आपणांस बोध होतो.

**मराठी ग्रंथरचना.**

२१ या कारकीर्दींत कांहीं ग्रंथ मराठी भाषेंत झालेले आज उपलब्ध आहेत. कांहीं भाषांतरें, कांहीं स्तुतिविषयक ग्रंथ व थोडके स्वतंत्र ग्रंथ अशी मराठी भाषेंतील विविध ग्रंथरचनाहि या काळीं झालेली आहे. मुख्यतः दक्षिण महाराष्ट्रांतून मराठी वाङ्मयाची पुरवणी तंजावरास भरपूर होत असे.

**मराठी राजे व ख्रिस्ती लोक**

२२ तंजावरचा राजा ख्रिस्ती लोकांच्या विरुद्ध आहे, त्यानें ख्रिस्ती लोकावर डोईपट्टी बसविली, त्यानें ख्रिस्त्यांना छळिले व त्यांना आपण छळतो तसे शेजारच्या संस्थानिकांनीहि छळावें असा प्रयत्न केला असें **मनुची** म्हणतो. परंतु **मंगम्माल** + ही जवळच्याच मदुरा व त्रिचनापल्लीची राणी फार शांत स्वभावाची होती. पश्चात्कालीन **शार्झ** (Schwartz) प्रमाणेंच पूर्वकालीन **मनुची** हाहि साधारणतः तंजावरच्या कारभाऱ्यांचा धार्मिकपणा व ख्रिस्तीधर्माविषयीं त्रयस्थपणा यांबद्दल त्या दिवाणाना नावे ठेवितो. राजाच्या मंत्रीवर्गांत ब्राह्मणाचाच भरणा असल्यामुळे राजा त्यांच्याच तंत्राने मोठा धर्माभिमानि असे. ख्रिस्ती लोकांना त्रास न देण्याविषयीं **दाउदखान** फौजदाराने **शहाजीला** लिहून कळविलें होतें.

---

+ **चोक्कनाथ** नायक (स १६६०—१६८२) या राजाची ही राणी होय. राजाच्या पश्चात हीच राज्यकारभार पाहूं लागली. सन १६९८ च्या सुमारास तिनें त्रावणकोरावर विजय मिळविला. पुढें सन १७०४ मध्यें **विजयरंग** नायकानें मदुरेचा कारभार हातीं घेतला व या **मंगम्माल** राणीला उपाशीं ठेवून जीवें मारिलें. या **विजयरंगाचीच** एक पत्नी मीनाक्षी राणी होय.

**ख्रिस्ती लोकांचे अपराध.**

२३ वस्तुस्थिति अशी होती कीं, ख्रिस्ती लोकांनीं तंजावरच्या प्रजेंतील जाती व वर्ग यांच्यांत द्वेष उत्पन्न केला होता. पोर्तुगिज मिशनरी हे हिंदु-पद्धतीचा पोषाख करून स्वतःस रोमन ब्राह्मण म्हणवीत व भोळ्या लोकांना बुचकळ्यात पाडीत. पांडिचरी येथें यांनी ब्राह्मण वस्तीमध्यें ख्रिस्ती लोकांना राहण्यासाठीं दोन इमारती बांधिल्या होत्या व हे ख्रिस्ती मिशनरी (धर्मोपदेशक) हिंदूंच्या देवळांत जाऊन धर्मोपदेश करूं लागले होते. ख्रिस्ती लोकांनीं कुडलोर येथें एका नाटकांत हिंदुदेवतांचीं पात्रें घालून अनिर्वचनीय चेष्टा केली होती. हें नाटक तंजावर येथेंहि राजासमोर करण्यांत आलें. असले हे प्रकार तंजावरच्या राज्याच्या बाहेर घडले होते तरी त्या योगानें राजा व प्रजा यांचा चित्तक्षोभ होणें साहजीकच होते. त्याचा परिणाम कदाचित् ख्रिस्ती लोकांवर कांहीं होणें अपरिहार्य झाले असेल. साधारणतः तंजावरचे राजे हे फार शांत व सहनशील होते. त्यांनीं डेन्स आणि डच याच्या धार्मिक बाबतीकडेस आरंभापासून दुर्लक्ष्यच केलें. जेव्हां व्यापारीलोक कर देण्याची चुकवाचुकव करीत तेव्हां मात्र राजाला आपला अधिकार वापरणें भाग पडत असे व कदाचित् इतर गुन्हेगार व्यापाऱ्यांबरोबर ख्रिस्ती गुन्हेगार व्यापाऱ्यांनाहि शासन होत असेल. ख्रिस्तीलोक संख्येनें वाढले, त्यामुळे धार्मिक दृष्ट्याहि पूर्वीच्या प्रमाणानें त्याचें संख्याधिक्यच झालें. त्यांच्या एकीचें बंधनहि भक्कम असें. परदेशाच्या व्यापाऱ्यांना ते राजा किंवा प्रजा याच्याहून अधिक जवळचेच असत. अशा एकंदर कारणामुळें **मनुची** वगैरेनीं तंजावरच्या राजांविरुद्ध एकतर्फी हकीकती ऐकून त्याच सत्य मानून लिहून ठेविलेल्या आज आपणापुढें असाव्यात.

---

# प्रकरण ५ वें

## पहिला सरभोजी ( सन १७१२–१७२८ )

## व

## तुकोजी ( सन १७२८–१७३६ )

### मुद्दे

१ मरवाचा राजा व त्याचे वारस यांच्या भानगडी

२ कावेरीचा धक्का व रामनदाचे वारस.

३ आनंदरायराचा शाप व अंत.

४ सरभोजीच्या राणीचं कपट, तोतया मुलाचा अन्त व क राजा

५ तुकोजीला राज्यप्राप्ति व त्याची विद्वत्ता.

६ तुकोजींचें इतर राजकारण.

७ मीनाक्षी, चंदासाहेब व तंजावरावरील संकट.

८ दिवाणाची असमर्थता व तुकोजीच्या पश्चात् इतर भानगडी.

९ तंजावरांतील भानगडीचा कालखंड.

**मरवाचा राजा व त्याचे वारस यांच्या भानगडी**

१ स्वराज्य व परराज्य अशा दोनाहि राजकारणाचा कित्ता दुसऱ्या **शहाजीनें** जो घालून दिला होता त्याचेंच अनुकरण **सरभोजीनें** व **तुकोजीनेंहि** वारसाईच्या नात्यानें केलें. मरवाचा राजा **किलवन** यानें एक मुलगा दत्तक घेतला होता. त्याचें नांव **रघुनाथ** असें होतें. हा **रघुनाथ** सन १७२० मध्यें निवर्तला. पुढें दुसरा मुलगा **विजयहि** मरण पावला. तेव्हां गादीच्या वारसाईबद्दल यादवी सुरू झाली. त्यामुळें सर्व मरव संस्थान मोठ्या घोंटाळ्यांत पडलें. • किलावनाच्या रखेलीचा मुलगा

**भवानीशंकर** व **तांडदेव** हे दोन वारस पुढें आले होते. तंजावरच्या मराठी राजांनीं **भवानीशंकराचा** पक्ष घेऊन त्याला गादीवर बसविण्यांत विजय संपादिला. या मदतीबद्दल भवानीशंकरानें तंजावराच्या उत्तरेकडील पंबर नदीजवळील प्रांत मराठी राजास देण्याचें वचन प्रथम दिलें होतें. परंतु **भवानीशंकरास** राज्यपद प्राप्त झाल्यावर त्यानें ते पाळिलें नाहीं म्हणून तंजावरकरराजांनी **तांडदेवाला** मदत केली. **भवानीशंकराच्या** सैन्याचा मराठ्यांनी पराजय केला व मरवाच्या राज्याची सुव्यवस्था लावून दिली. ठरल्याप्रमाणें तंजावरच्या उत्तरेकडील प्रांत मराठी राजांना न मिळाल्यामुळे त्यांनी हा खटाटोप केला होता. मरवाच्या राज्याची सुव्यवस्था लाविल्यानंतर त्या औदिच्य प्रांताचे तीन विभाग करून एक तंजावरकरांस देण्यात येऊन बाकीच्या दोहोंचा समावेश प्रस्तुतच्या रामनाद व शिवगंगा-भूमी यांच्या इनामी भागांत विभागून देऊन समाविष्ट केला. याव-रून शिवगंगा संस्थानच्या उत्पत्तीचे मूळकारण तंजावरचे मराठे राजे होत. त्यांनी मदुरेशीं युद्ध करून विजय संपादिला. रामनाद नाम-शेष केलें व मदुरेच्या राज्याचा अपकर्ष प्रकट केला. याप्रमाणें मदु-रेचा अपकर्ष झाल्यामुळेच **सरभोजीनें** रामनादाच्या + राजकारणांत यशस्वी रीतीनें मध्यस्थी केली. दळवई **आनंदरायर** साहेब नावाचा एक मंत्री तंजावरचा कारभार पाहत असे. त्यानें

---

+ ही जहागीर मदुरेच्या पूर्वेकडे व दक्षिणेकडेस आहे. हिच्यांत रामनाद तिरुवादानाई, परमगार्दी, तिरुवल्ली आणि मुदुकुलुत्तर अशा जमीनदारी तहाशेली आहेत. येथील संस्थानिक मरवन जातीचे आहेत, यांस सेतुपति ही पदवी आहे. **रघुनाथ** किलावन हा प्रथमात संस्थानिक झाला. याच्या नंतरच वारसाईचा तंटा होऊन सन १७२५ चे सुमारास त्याचे तीन भाग झाले त्यांचें वर्णन मूळांत दिलेंच आहे

तीनहि भावाची दिवाणगिरी यशस्वीपणें केली. तो मोठा विद्वान् म्हणून प्रसिद्ध आहे. रामनाद येथें वारसाईच्या हक्कासाठीं यादवी चालत असताना वारसापैकीं **भवानीशंकराला** प्रथम तंजवरकरांनी साहाय्य दिलें. पण पुढें तो राज्यावर बसल्यानंतर त्यानें जेव्हां आपलें वचन भंग केलें तेव्हां तंजावरकरांनीं **तांडदेवाला** मदत दिली. त्यावेळीं त्यांच्या प्रतिकारासाठीं **भवानीशंकरानें** मदुरा व पुदुकोट्टाई येथील संस्थानिकांच्या फौजा बोलाविल्या हें पाहून पूर्वोक्त आनंदरायरनेच तंजावरच्या फौजेला **पेशव्यांचे** साहाय्य मिळवून देऊन **भवानीशंकराच्या** व त्याच्या साहाय्यकर्त्यांच्या सैन्यसंघाला सामना दिला. एका संस्कृत नाटकावरून असे म्हणतां येईल की, दुसऱ्या **शहाजीच्या** कारकीर्दीत या **आनंदरायराकडेस** धर्माधिकारी हे पद होतें. **सरभोजीच्या** कारकीर्दीत निराळ्या जागेवर याची नेमणूक होऊन **राघोपंडित** दिवाण हा सुभेदार नेमिला गेला.

**कावेरीचा धक्का व रामनदाचे वारस.**

२ तंजावर येथील पुस्तकालयांत अद्वैत कीर्तन या नावाचा एक तामिल भाषेंतील हस्तलेख आहे. त्यांत असे आहे की, कावेरी नदीच्या धक्क्याला एकदां चीर पडली होती. ती चीर बुजवून धक्का दुरुस्त करण्याची परवानगी मदुरेच्या **नायकराजानें** देणे अवश्य होतें. परंतु परवानगी मागितली असूनहि **नायकराजानें** नाकारिली. यानंतर तिकडेस अवर्षण व दुष्काळ पडले त्यामुळें त्या धक्क्याची दुरुस्ती झाली. कावेरी नदीचा हा धक्का पाडून टाकण्यासाठीं कांहीं दुर्जन आले होते. पण **सरभोजी** राजानें त्यांच्याशीं युद्ध केलें. यासंबंधानें **सरभोजीचरित्र** या संस्कृत ग्रंथांत राजाची

स्तुति केली आहे. या ग्रंथाची हस्तलिखित प्रत तंजावर येथीलच पुस्तकालयांत आहे. रामनादाच्या गादीबद्दल जे युद्ध चालू होतें त्याशी कावेरी नदीच्या या धक्क्याचा संबंध होता. कावेरी नदीचा धक्का कारिकालानें बांधून मोठी कीर्ति संपादन केली होती. व ती तामिल कवींच्या काव्यांतूनहि अवतीर्ण झालेली दिसते. या धक्क्याच्या नाशानें विध्वंसकांच्या कर्तृत्वाचीहि अशीच विस्तृत व निरंतरची पताका उभारली जाईल अशी समजूत होती, या गोष्टीचा उल्लेख करणे आवश्यक वाटते.

आनंदरायराचा शाप व अंत.

३. **सरभोजी** हा मोठा धर्मात्मा व दाता होता अशी प्रसिद्धी आहे. **आनंदरायर** साहेब दलवाय हा **सरभोजीचा** धर्माधिकारी होता, असें पहिल्याच कलमांत सांगितलें आहे. या धर्माधिकाऱ्यानें तिरुवेंकाडुमध्यें भंगमरम् व तिरुकडियारूमध्यें सरभोजीराजापुरम् यासारखे अग्रहार ( मनुष्य वस्तीस योग्य अशी घरें वगैरे बांधणें व त्यांत खाद्यपेय ठेविणें. ) दिले अशी प्रसिद्धी आहे. यानेंच कावेरी नदीचा एक कालवा बांधून त्याला अय्यावय्यामाल्‌ असें स्वतःला अनुलक्षून नांव दिलें आहे. यानंतर तंजावरच्या दरबारांत या **आनंदरायरास** सरखेल ही पदवी मिळाली. **सरभोजी** राजाला पुत्र झाल्यावर या सरखेलानें एक सोन्याचा पाळणा राजास नजर केला. यानंतर कांहीं अप्रसिद्ध कारणांनीं राजानें याला कैदेंत टाकून पोषणासाठीं फक्त मीठभातच देण्याचा हुकुम केला. हें पाहून या ब्राह्मणानें राजाला ' तिरुवेंकाडू येथील मंदिरांतील प्रचंड घंटा तुटून पडेल व राजवाड्याच्या उत्तरेचा कोट पडून जाईल ' असा शाप दिला व नंतर स्वतःची जीभ

ओढून प्राणत्याग केला. आश्चर्य हें कीं, आजहि ती घंटा योग्यस्थळीं टांगलेली नाहीं व राजवाड्याच्या उत्तरेचा बुरुज पडलाच आहे. दुसरी अशीहि एक दंतकथा प्रचलित आहे कीं, राजाने या आनंदरायरवैद्याला बंधमुक्त केलें व तो परत आपल्या गांवीं जात असतांना वाटेनच मृत्यु पावला. मद्रास येथील ताभिल भाषेच्या हस्तलिखित संग्रहांत मॅकेन्झी नामक ग्रंथ आहे. त्यांत अय्यावय्यासंबंधीं असा लेख आहे कीं, त्याने संपत्ति शोधून काढिली, तिरुवेंकलु येथे एक मंदिर सुधारलें आणि त्येक रकमा धर्मदाय देऊन मृतांच्या छत्र्याहि बांधविल्या. परंतु पूर्वोक्त प्रकारें अय्याचा शोकदायक शेवट झाला असे या ग्रंथात लिहिलेले नाहीं. हा ग्रंथ सन १८१८ मध्यें लिहिला असावा. असो. प्रस्तुत ब्राह्मणधर्माधिकारी हा विद्वानांचाहि मोठा आश्रयदाता होता. या आनंदरायराच्या नावावर वेदकवीनें विद्यापरिणय नांवाचे एक नाटक लिहिले असून तें तंजावरास आनंदवल्ली देवीच्या उत्सवांत करण्याचा प्रघातच पडला होता. एका व्यक्तीचें विद्येशीं लग्न लागल्याचा कथाभाग या नाटकांत आहे. एकोजीच्या दिवाणाचा मुलगा जगन्नाथ याने सरभराजविलास व रतिमन्मथ ( हीं नाटकें ) लिहिल्याचे आढळते. शिवभारत हा संस्कृत ग्रंथ असून त्यांत शिवाजी व त्याचे पूर्वज यांची महत्त्वाची माहिती आहे असे म्हणतात. या ग्रंथांत शिवाजीचें चरित्रहि आहे. ( हा ग्रंथ जुना असावा. ) याच कारकीर्दींत या ग्रंथाचे ताभिल भाषांतर झालें असावें. तें ताभिल भाषांतर शिवाजी चरित्रम् या नांवानें प्रसिद्ध आहे. या शिवभारत ग्रंथाची एक नक्कल महाराष्ट्रांत आणून आतां (१९३२) प्रसिद्ध करण्यांत आली असून, त्यांतील एका उल्लेखाच्या आधारानें सन १६२७ मधील

**शिवजन्म** चुकीचा ठरविण्याचा प्रयत्न चालू आहे. बृहदीश्वर शिलालेखांत शिवाजी व व्यंकोजी यांचे जन्म शके १५५१ मध्यें झाल्याचे लिहिलें आहे. त्याच धोरणाने या शिवभारतात दिलेला **शिवजन्म** शके१५५१ हाच खरा असावा असें कित्येक मानितात. शिवभारताची अस्सल प्रत आपणांपुढें नाही. हाती आलेल्या नक्कलेंत शके १५५१ च्या फाल्गुन वद्य ३ तृतीयेस शिवाजीचा जन्म झाल्याचें लिहिलेले आहे. तंजावराच्या शिलालेखात हाच शक व्यंकोजीच्याहि जन्माचा दिलेला आहे. व्यंकोजी लहान भाऊ होता हे सर्वमान्यच असल्याने त्याचा जन्म त्याच शकातील बाकीच्या बारा तेरा दिवसांतच झाला असावा व त्यावरून त्या शकाच्या वैशाख-जेष्ठांत शहाजी हा जिजाबाई व तुकाई या दोनहि पत्न्यांसह राहत असावा असें सिद्ध करणें प्राप्त आहे. तसें सिद्ध होईपर्यंत नवीन शिवजन्ममिति ग्राह्य करण्यात घाई होईल. शिवदिग्विजय नांवाच्या बखरींत शके १५५३ 'कालयुक्ताक्षी' संवत्सर हा व्यंकोजीचा जन्म-शक सांगितला आहे. परंतु शिलालेख हा बखरीपेक्षां अधिक प्रमाणभूत असतो व बखरींतील शक आणि संवत्सर यांचा मेळहि नाहीं, यामुळे बखरींतील काल चुकीचा होय यांत शंका नाही. शिवाजीचा जन्म--शक तंजावराकडेस सरासरी तीन वर्षांनी पुढे ढकलला आहे. त्याच प्रमाणें व्यंकोजीचाहि जन्म शक महाराष्ट्रांत सरासरी दोन वर्षांनीं उशीरा झाल्याचे लिहिलें आहे हेंहि लक्षांत घेण्यासारखें आहे. असो.

**सरभोजीच्या राणीचे कपट, तोतया मुलाचा अंत व कट्टु राजा.**

४ साताऱ्च्या एका कुटुंबांतील मुलीशी **सरभोजिचा** विवाह झाला होता. **सरभोजीस** संतती आली नाहीं. मराठी शिलालेखांत ( प. १ ) असें लिहिलें आहे कीं, **सरभोजीच्या** दुसऱ्या राणीनें गरोदर असल्याचें सोंग केलें होतें. पुढें दहा महिन्यांनीं तिला एक मुलगा झाल्याचें प्रसिद्ध करण्यांत आलें. त्या मुलाचे नांव **सवाई शहाजी** असें सांगण्यात आले होतें. तंजावर किल्ल्यावरील **कुप्पी** अथवा **रूपी** नांवाची एक परीट स्त्री होती. तिचा हा मुलगा होय, परंतु त्याला राजपुत्र बनविण्यांत आलें. कदाचित् राजा **सरभोजीचा** व **रूपी** परटिणीचा कांहीं संबंध असेलहि परंतु तो प्रसिद्ध नव्हता. कांहींहि असलें तरी हा मुलगा खरा राजपुत्र नव्हे अशी शंका **सरभोजीचा** बंधु **तुकोजी** याला आली होती व ती त्याने **सरभोजी** राजाच्या कानावरहि घातली होती. त्यामुळें राजाच्या हुकुमानें त्या मुलाला दूर नेण्यात आलें. कदाचित् ठारहि केले असावें अशी लोकवार्ता आहे. दुसरी एक दंतकथा अशी प्रचलित आहे कीं, राजानेंच त्या अर्भकाला ठार मारिलें व जिने ढोंग केले होतें त्या दुसऱ्या राणीचा त्याग केला. **सुकोजी** हेंहि त्या मुलाचें दुसरें नांव होतें. पुढें **कट्टुराज** या नांवाचा एक **तोतया** उत्पन्न झाला होता व तो आपण ल्हानपणीचा **सुकोजी** अथवा **सवाई** शहाजी असून प्राणांतातून बालपणींच बचावून रानांतच वाढल्याचें सांगत होता.

तुकोजीला राज्यप्राप्ति व त्याची विद्वत्ता.

५ सन १७२८ मध्यें **सरभोजी** निवर्तला. त्याची एक राणी सती गेली, ( **सुलक्षणाबाई** व **राजसबाई** अशा दोघी राण्या सती गेल्या असें शिलालेखांत आहे. ) **सरभोजी** नंतर **तुकोजी** हा राज्यावर बसला. सोबतच्या शिलालेखावरून **तुकोजीनें** आठ वर्षें राज्य केलें असें दिसतें. पण मद्रास येथील एका हस्तलिखित पत्रांत **तुकोजीनें** सहा वर्षें राज्य केलें असा उल्लेख आहे. **तुकोजी** हा मोठा भाषाशास्त्रज्ञ होता. त्याने आपल्य राज्यांत हिंदुस्थानी पद्धतचिें गायन सुरू केलें. **तुकोजीनें** संगीत सारामृत नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे त्यावरून तो गायनकलाभिज्ञहि होता असें दिसतें. त्याचा खाजगी कारभारी **घनश्याम पंडित** यानें भवभूतीच्या उत्तररामचरित्रावर एक टीका लिहिली आहे. याच समयास **मनंभट्ट** नांवाचा एक विद्वान् गृहस्थ होऊन गेला. तो प्रचंड संस्कृतग्रंथलेखक असून उत्कृष्ट पुस्तकांचाहि संग्राहक होता. **घनश्याम** हाहि दुसरा एक मोठा लेखक म्हणून प्रसिद्ध होता. आपण चौसष्ट ग्रंथ लिहिले असें तो म्हणतो. त्याच्या दोन पत्नी **सुंदरी** व **कमला** यांनींहि एका संस्कृत नाटकावर एक टीका लिहिली आहे.

तुकोजीचें इतर राजकारण.

६ रामनादाच्या संस्थानिकावर **सरभोजीनें** एक यशस्वी मोहीम चढविली होती, ती **तुकोजीनें** मागें घेऊन **सरभोजीच्याच** कारकीर्दींत सलोखा घडवून आणिला हें मागें सांगितलेंच आहे. **अद्वैत** कीर्तनांत असें म्हटलें आहे कीं, आपण स्वतः राज्याचा वारस आहोंत असें ठरविण्यासाठीं

**भवानीशंकरानें तुकोजीची** मदत घेतली होती व त्यानें त्याला सहाय्यहि केलें होते.

**मीनाक्षी, चंदासाहेब व तंजावरवरील संकट.**

७ त्रिचनापल्लीची राणी **मीनाक्षी** हिच्या विरुद्ध पाळेगारांनीं बंड उभारिलें. तेव्हा **तुकोजीनें मीनाक्षीस** मदत केली होती असें मद्रास येथील एका हस्तलेखावरून व शिलालेखावरून (प. १) दिसतें. वादनवल्लेवर **तुकोजीचा** एक ग्रंथ आहे. त्यांत 'मदुरेमध्यें मुसल्मानांचा पराजय, व मदुरा हस्तगत करण्याचा पराक्रम **तुकोजीनें** केला होता, असें म्हटलें आहे. परंतु हे असलें काव्यमय उल्लेख तात्पर्यतःच इतिहासक्षेत्रांत येतात. त्यावरून आपणांस असें सांगतां येईल कीं, सन १७३४ मध्यें **चंदासाहेबानें** मदुरेवर पहिलीच स्वारी केली व तीतच त्याचा पराजय व्हावयाचा, कारण **मीनाक्षी** राणीला **तुकोजीनेंहि** सहाय्य दिलें होतें. परंतु **चंदासाहेबानें** उघडपणे समोरासमोर युद्ध करण्याऐवजीं युक्तिप्रयुक्ति व विश्वासघात यांच्या जोरावर सन १७३६ मध्यें त्रिचनापल्लीस आपली सत्ता प्रस्थापित केली. ( मदुरा व त्रिचनापल्ली असें एकच राज्य झालें होतें. ) मदुरेच्या नायकांच्या शेजारचीं संस्थाने नामशेष झाली, त्यामुळे तंजावरच्या मराठी राजांस मोठाच धक्का बसला. दोन मुसलमानी सत्तां-मध्यें तंजावर हें संस्थान सांपडल्यामुळे यावनीसत्तेमध्यें त्याला विलीन होणें भाग पडलें. कोंडीत सांपडल्याप्रमाणें तंजावर हें संस्थान अडकलें गेल्यामुळें मुसलमानी सत्तेत सामील झालेल्या हिंदुसंस्थानांत त्याची आणखी एका भर पडली. कसेंहि असो, तूर्त तरी तंजावरानें मोठ्या कष्टानें आपलें जीवित राखिलें होते. या प्रसंगीं तंजावरास

एका दूरदृष्टी व शूर अशा कर्तृत्ववान् राजाची आवश्यकता होती. परंतु तेथें अंतःकलह असून, अनेक पंथ व कपटपटुता यानीं युक्त अशा ढोंगी लोकांनीं तंजावरचें राज्य या समयास अगदीं व्यापून टाकिलें होतें.

८ या प्रसंगीं तंजावरास एक चेट्टी ( श्रेष्ठी=व्यापारी ) दिवाण-पदावर होता, व त्याचेंच वर्चस्व एकंदर राजकारणावर होतें. त्याचा बुद्धिवाद व उपदेश अगदींच अहित परिणामी असल्या-मुळेंच तंजावरची प्रजा त्यावर अगदीं

**दिवाणाची असमर्थता व तुकोजीच्या पश्चात् इतर भानगडी.**

नाराज झाली होती. हा प्रकार तुकोजीच्या कारकीर्दीच्या शेवटीं घडून आला. राज्याची मालकी कोणी घ्यावी याच प्रश्नानें तुको-जीच्या पश्चात् इतर सर्व प्रश्न मागें पडले. तुकोजी गादीवर बसला तेव्हां त्याचा मुलगा एकोजी ( दुसरा ) हा चाळीस वर्षांचा होता. तुकोजीला सयाजी नावाचा निराळाच एक राज्याधिकारी पुत्र होता, अशी एक समजूत आहे. या दोघांशिवाय एका नायड्र जातीच्या रखेलीच्या पोटीं तुकोजीला मुलगे झाले होते. परंतु यातील दोघे पूर्वींच मरण पावले होते व एकच हयात होता. अन्नपूर्णा नांवाच्या खांडाराणीच्या पोटीं तुकोजीला प्रताप नांवाचा एक पुत्र झाला होता. तंजावरच्या लोकप्रिय व प्रसिद्ध राजाच्या नामावळींत हा प्रतापच शेवटचा राजा होय.

९ तंजावरच्या इतिहासात सन १७३६ तें सन १७३९ पर्यंतचा तीन चार वर्षांचा कालखंड अज्ञानांधकारमय राज्याधिकारासंबंधीं कलहपूर्ण, अराजनिष्ठांना भरभराटीचा व ढोंग्यांच्या अस्तित्वाला पोषक असा होऊन गेला.

**तंजावरांतील भानगडींचा काळखंड.**

# प्रकरण ६ वें.

## अराजकता सन १७३६ ते १७३९.

### मुद्दे.

१ व्यंकोजीचा पराक्रम, संशयी स्वभाव आणि मृत्यु.
२ सय्यदाच्या आधारावर तोतयाचें प्राबल्य.
३ सुजानबाईस कैद.
४ तोतयास पुनः राज्यप्राप्ति, प्रतापाचें राज्यारोहण.
५ इतिहासकारांचा मतभेद.
६ सयाजीची माहिती.
७ तोतयासंबंधीं कांहीं लेख.

एकोजीचा पराक्रम, संशयी स्वभाव आणि मृत्यु.

१ (दुसरा) एकोजी ऊर्फ बाबासाहेब यानें फक्त एकच वर्ष राज्य केलें असें तंजावर येथील शिलालेख व मद्रास येथील हस्तलिखित यांवरून दिसतें. आपल्या विरुद्ध कांहीं कट होत आहे की काय ? या संशयांतच तो नेहमीं असे. वेंकोजीच्या कारकीर्दीपासून तंजावरास सय्यद या नांवाचा एक किल्लेदार होता. तोच या (दुसऱ्या) एकोजीच्या कारकीर्दीत जवळजवळ खरा सत्ताधारी बनला. किंवा अक्षरशः राज्यपददाता (Kingmaker) या पदवीस पोंचला. ही पदवी त्या सय्यदाला चार वर्षेपर्यंत उत्तम प्रकारें शोभते. दुसऱ्या एकोजीच्या कारकीर्दीमध्यें गुप्त कट नुसता वाहत होता व शेवटीं एका गुप्त कटाला तो बळीहि पडला, हें मात्र फार विलक्षण झालें. मरणसमयीं या एकोजीचें वय एकेचाळीस वर्षांचें होतें. सन १७३६ मध्यें

**चंद्रासाहेबानें** त्रिचनापल्लीला जात असतांना मध्येंच तंजावरावर स्वारी केली. यासमयीं **एकोजी** हा फार आजारी होता. तथापि, त्यानें **चंद्रासाहेबाशीं** लढाई करून त्याला पळावयास लाविलें. मद्रास येथील हस्तलिखितावरून दिसते कीं, यावेळीं तंजावरचा खजिना अगदीं रिकामा झाला होता व राज्यव्यवस्था नीट चालविण्यासाठीं एका मंत्रीमंडळाची योजना **एकोजीनें** केली होती. परंतु कांहीं तारक मार्ग या मंत्रीमंडळीलाहि काढितां आला नाहीं.

**सैय्यदाच्या आधारावर तोतयाचें प्राबल्य.**

२ एकोजी ( दुसरा ) नंतर त्याची पत्नी **सुजानबाई** ही राज्याधिकारिणी झाली. पिंगल संवत्सर शके १६५८ मध्यें **एकोजी** मृत्यु पावला. तेव्हांपासून शके १६६० कालयुक्ती संवत्सरापर्यंत दोन वर्षे **सुजानबाईनें** राज्य केलें. कारण ( शके १६६० मध्येंच म्हणजे ) सन १७३८ मध्यें **कट्टु राजानें** किल्ल्यांत प्रवेश करून राज्यव्यवस्था आपल्या हाती घेतली. **सुजानबाईनें** तीन वर्षे राज्य केलें असें मद्रास येथील हस्तलिखितावरून दिसते. त्या हस्तलिखितांत असें लिहिलें आहे कीं, दुष्ट व जुलमी अशा स्त्री-अधिकाराला कंटाळून सन १७३८ मध्यें एक तोतया उत्पन्न झाला व त्याला **सिदोजी, तुलाजी, तुकाजी** व **सुब्बा चेट्टी** या मंत्र्यांचें साहाय्य मिळालें. या मंत्री सहायकांनीं **सुजानबाई** राणीसंबंधीं शक्य तेवढा अधिक तिरस्कार उत्पन्न करून ठेविला होता. सर्व राज्यात किल्लेदार **सय्यद** हा फार मोठा सत्ताधारी अधिकारी असून तो इच्छेप्रमाणें वाटेल तें करीत असे. राज्यांतील सैन्य त्याच्याच ताब्यांत असे. व **शाहूजी** अथवा उपर्युक्त **कट्टुराजा**

या तोतयानें **सय्यदाचाच** फायदा घेऊन **सुजानबाईवर** वर्चस्व मिळविलें. आपण पहिल्या **सरभोजीचे** पुत्र आहोंत असे या तोतयानें जाहीर केलें.

**सुजानबाईस कैद**

३ तोतया **कट्टुराजाला** तंजावरांतून हांकून दिल्यावर तो फ्रेंचाकडेस गेला व त्यानें त्यांना कारिकाल बंदराचा मोबदला देण्याचें वचन देऊन तंजावराचें राज्य मिळवून देण्यास मदत मागितली. याच वेळीं **सय्यदानें सुजानबाईस** कैद करून मंत्रीमंडळांतील एक मंत्री **सिदोजी** याला त्याच्या दोन भावांसह तंजावरच्या दिडी दरवाजासमोर सुळावर चढविलें. हा सिदोजी **सुजानबाईच्या** विशेष कृपेंतील इसम होता.

**तोतयास पुनः राज्यप्राप्ति, प्रतापाचें राज्यारोहण.**

४ तोतया **शाहूजी** सन १७३८ मध्ये तंजावरास परत आला, व त्यानें नंतर एक वर्ष राज्य केलें. फ्रेंचाना कारिकाल बंदर देण्यास सन १७३९ च्या फेब्रुवारीमध्यें तोतया राजाला **चंदासाहेबानें** भाग पाडिलें व पुढें एप्रिलमध्यें राजानें ती देणगी कायम केली. कारिकाल बंदरात फ्रेंचानां उतरण्याला या तोतया राजानें म्हणजे **शाहूजीनें सन १७३८** च्या जुलईमध्यें बंदी केली होती. यावरून हा तोतया सन १७३८ पूर्वीं तंजावरच्या राज्यावर आला असावा असें वाटतें. या बंदीमुळेंच **चंदासाहेबानें** तंजावरावर स्वारी केली असावी. मुसलमान किल्लेदार **सय्यद** हा फार धूर्त होता. तो फ्रेंचांना मिळालाच होता. तोतया राजानें वर प्रमाणें जरी **फ्रेंचानां** कारिकाल **बंदर** दिलें, तरीहि थोडक्याच

दिवसांत त्याला आपला गाशा गुंडाळावा लागला. कारण तो खरोखरीच तोतया होता, खरा राजपुत्र नव्हता. किल्ल्यांतील एका **रूपां** अथवा **कुप्पी** या परटिणीचा तो मुलगा होता. नागापट्टण् येथील डच व फोर्टसेंट जॉर्ज येथील इंग्रज लोकांना त्या तोतयानें मोठमोठ्या देणग्या देण्याचीं वचनें देऊन त्यांची मदत मिळविली होती. असे, तंजावर येथील शिलालेखांत लिहिले आहे. ( परि. १ ) परंतु तो कुप्पीचा मुलगा आहे असे निश्चितपणें बाहेर येतांच त्याला पदच्युत करण्यांत आले. सन १७३९ मध्ये डचांनीं यूरोप येथें पुढील आशयाचे पत्र पाठविलें " शाहूजी हा खरा राजपुत्र नसल्याने चंदासाहेबानें त्याला कैद केले व प्रतापाच्या इच्छेविरुद्ध प्रतापाला राज्यावर बसविण्यांत आले." पुढें प्रताप स्वतः कारागृहात जाऊन तोतया शाहूजीला भेटला, व ' या शाहूजीच्या इच्छेविरुद्ध हें राजपद घेण्याची आपली मुळींच इच्छा नाहीं ' असे शाहूजीला म्हणाला. त्यावर शाहूजी ( तोतयाराजा ) म्हणाला, ' जर तूं राज्यपदाचा स्वीकार केला नाहींस तर आपण दोघेहि ठार मारिले जाऊं. म्हणून तूं राज्याधिकार धारण कर. नंतर आपण दोघेहि जीवंत राहून पुढील कार्यक्रम यथास्थित पार पाडूं.' यामुळे तोतयानंतर प्रतापसिंहानें तंजावरचें राजपद सन १७३९ मध्यें स्वीकारिलें. शिलालेखांतहि प्रतापसिंहाच्या राज्यारोहणाचा शक १६६० सिद्धार्थी हा दिला आहे. त्यावरून प्रतापसिंहाचें राज्यारोहण सन १७३९ च्या पहिल्या दोन तीन महिन्यांत झालें असावें.

इतिहासकारांचा मतभेद.

५ या काळासंबंधाने बराच गोंधळ आहे. ऑर्म म्हणतो की, **प्रताप** व त्याचा माजी **शहाजी** हे **सरभो-जाचे** पुत्र होते. परंतु हे दोघेहि **तुकोजीचेच** पुत्र होत असे डफ म्हणतो. परंतु ऑर्म व डफ हे दोघेहि या बाबतींत चुकीचेच ठरतात. आता निःसंदिग्ध रीतीनें असें सिद्ध झालें आहे कीं, **तुकोजीच्या अन्नपूर्णा** नावाच्या खांडाराणीचा मुलगा **प्रताप** हा होय. **शहाजी** हा **सरभोजीचा** मुलगा होता असे उगीच प्रसिद्ध केलें होतें. आता एकट्या **सयाजीचाच प्रश्न** शिल्लक राहतो. परंतु धर्मशास्त्राप्रमाणे ज्याला **तुकोजीचा** मुलगा म्हणतां येईल असा कोणीहि **सयाजी** मुळीच नव्हता, हें पुढें ओघानें सिद्ध व्हावयाचेंच आहे.

सयाजीची माहिती

६ बृहदीश्वर शिलालेख व मद्रास येथील शिलालेख यांमध्ये **सयाजीचें** नांव नाहीं. परंतु यावरून **सयाजीचे** नास्तित्व सिद्ध होतें. कारण शिलालेख हा दुसऱ्या **सरभोजीच्या** कारकीर्दीमध्यें तंजावरास खोदविलेला आहे. व हा **सरभोजी प्रतापसिंहाचा** नातू होता. अर्थात् **प्रतापसिंहाहून** अधिक जवळचा वारस इतर कोणी होता असें त्या शिलालेखात येणे शक्यच नाहीं, असे म्हणतां येईल. परंतु **तुकोजीला** असा कोणी तरी न्यायदेशीर पुत्र होता, याला काहीं निःसंदिग्ध पुरावाच नाही. तंजावरचे गॅझेटिअर व कांहीं पुस्तकें यांमध्यें या **सयाजीचा** उल्लेख येतो, पण तो सगळा लेखकाच्या कल्पनाशक्तीचा खेळ होय.

७ मागें सांगितलेले डच-लेख व डॉडवेलनें उद्धृत केलेला

**तोतयासंबंधीं काहीं लेख.**

सन १७३९ मधील नेगापट्टमच्या डच गव्हर्नराचा लेख, यांवरून निःसंशयपणें असें सिद्ध होतें कीं, शाहूजीनंतर राज्यावर **प्रतापसिंहच** विराजमान झाला होता. '**सुजानबाईला शाहूजी** या तोतया राजानेंच राज्यावरून काढलें होतें' असें **डच** गव्हर्नरच्या लेखांत स्पष्टच म्हटलें आहे. 'सन १७३८--३९ मध्यें **शाहूजी** हा तोतयाच तंजावरास राज्य करीत होता,' असे आनंदरंगा पिले याची रोजनिशी व 'फ्रेंच पॉवर' हे मॅलिसनचें पुस्तक यांवरून दिसते. मॅलिसनच्या पुस्तकावरून असेंहि सिद्ध होतें कीं, शाहूजीला तंजावरातून बाहेर हाकून दिले होतें, तेव्हां त्यानें कारिकाल बंदर फ्रेंचांना देण्याचे अभिवचन सन १७३८ मध्यें दिलें होतें, व त्यामुळे लवकरच त्याला राज्य प्राप्त झालें. परतु त्यानें फ्रेंचांना कारिकालांत उतरण्याची तत्काळ बंदी केली, हें मागें तिसऱ्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. आनंदरंगम् पिले यानें शाहूजीची हकीकत सन १७३९ पर्यंत पुढें लिहिली आहे. परंतु वर सांगितलेले डच लेख याहून अधिक माहिती देत नाहींत. त्यावरून असें दिसते की, सुजानबाईला बाजूस सारून एका व्यक्तीनें राज्य बळकाविले व तीच व्यक्ती पुढे राज्याधिकारिणी म्हणून कायम झाली. असा राज्यापलाप करणारी व्यक्ती दुसरी तिसरी कोणी नसून **शाहूजी** किंवा **कट्टुराजा** म्हणून प्रसिद्ध असलेली परंतु खरोखर कुप्पी अथवा **रूपी** परटिणीचो औरस पुत्रसंततीच होय. हाच **शाहूराजा** आपणास **सरभोजाचा** पुत्र म्हणवीत होता. हा **कट्टुराजा** खरोखरीच तोतया होता असे सिद्ध होईपर्यंत तंजावरच्या खऱ्या राज्याधिकारी व्यक्तीचा प्रश्न पूर्णपणें घोंटाळ्यांतच पडला

होता. मागें सांगितलेले डच लेख, आनंदरंगम् पिले याचा सन १७४६ मधील फ्रेंच लेख व कट्टुराजाचाच राज्यावर हक्क असल्याचा सन १७४९ मधील इंग्रजी लेख हे सर्व आधार कट्टुराजाच्या तर्फेचे आहेत. **प्रतापसिंह** हा बेकायदेशीर वारस असून **कट्टुराजाच** खरा वारस आहे असें हे सर्व लेख एक मतानें प्रतिपादन करितात. राज्याधिकार धारण करण्याबद्दल **प्रतापानें** दर्शविलेल्या डळमळीत-पणाचा उल्लेख डच लेखामध्यें आहे. आणि मराठी शिलालेख व मद्रासचे हस्तलेख याना म्हणजे यांतील एतद्विषयक उल्लेखाला अधिक महत्त्वाचें कारण म्हणजे तंजावरांत गोंधळलेलें राजकीय वातावरण होय. डच लोकांनीं प्रथमपासून चुकीचा पक्ष घेतला व पत्रामागून पत्रें पाठवून पहिल्या चुकीवर झांकण घालण्याचा प्रयत्न केलेला आहे. आपण **सरभोजीचे** पुत्र असल्याचें **शाहूजीनें** जें स्वतःच्या अधिकाराच्या प्रतिपादनासाठीं जवळपासच्या लोकांस सांगितलें होतें, तेंच एकाद्या नोकरानें जाऊन आनंदरंगापिले यास कथन केलें व तें त्यानें आपल्या रोजनिशीत लिहून ठेविलें. परंतु सन १७४९ मधील इंग्रजांच्या लेखापेक्षां पिले याच्या या लेखाला अधिक महत्त्व देणें योग्य वाटत नाही. कारण फ्रेंच लेखक इंग्रजांना उद्देशून मोठ्या खोचदारपणाने लिहितो कीं, " तुम्हीं ( तंजावराच्या ) मृत राजाकडून कोणी तरी भूत उत्पन्न करून घेऊन स्वतःच्या मतलबा-साठीं त्या राज्यावर स्थापून वर्तमानकालीन राजाला पदच्युत करावे हा तुमचा विचार योग्यच म्हणावयाचा," या विवेचनावरून हें उघड सिद्ध झालें कीं, **प्रताप** हा गादीवर येण्यापूर्वी ज्या **सयाजीनें** एक वर्षपर्यंत राज्य केले तो अगर तसा कोणी **तुकोजीला सयाजी** नांवाचा पुत्र कायदेशीर वारस नव्हता.

**Additional authorities.**

1 Anandaragam Diary 1 Ch 4 13. IV p 350 in by Dodwell.
2 Mallesoh The rise of the French power in India ch 3.



तंजावरचा राजा प्रतापसिंह

( कारकीर्द १७३९--१७६३ )

# प्रकरण ७ वें.

## प्रतापसिंग १७३९ ते १७६३.

### मुद्दे.

१ प्रतापाची योग्यता.
२ प्रतापाची प्रजानुरक्ती
३ तोतयाचें बंड व यवनांचें कारस्थान
४ किल्लेदार सय्यद याचीं कारस्थानें.
५ प्रताप व नबाब यांचा संबंध.
६ सावकारांची मदत.
७ तोतयाचे प्रयत्न.
८ इंग्रजांची यशस्वी मध्यस्थी
९ नबाबीसंबंधीं युद्धें.
१० महंमदअल्लीस प्रतापाची मदत
११ महंमदअल्ली व म्हैसूरकर यांचे संबंध
१२ मानाजीचा पराक्रम.
१३ प्रतापाची स्तुती.
१४ कांहीं प्रादेशिक घालमेली
१५ महंमदअल्लीची तंजावरावर स्वारी.
१६ तंजावरसंस्थान लयास जाण्याचीं कारणें.
१७ प्रतापसिंगाचा मृत्यु व वारस.

**प्रतापाची योग्यता.**

१ तंजावराच्या नामांकित मराठी राजाच्या यादींत प्रताप हा शेवटचा राजा होय. वेंकाजी, शहाजी व सरभोजी यांच्यानंतर प्रतापाचें नांव येतें. इंग्रज, फ्रेंच व या उभयतांचे प्रतिस्पर्धी यांना जोंपर्यंत प्रतापाच्या

साहाय्याची आवश्यकता होती तोपर्यंत प्रतापास जेवढें सुख मिळत होतें तेवढें सुख इंग्रज व महंमदअल्ली यांची सत्ता कर्नाटकांत स्थिर झाल्यावर म्हणजे ( प्रतापाच्या ) वृद्धापकाळांत त्याला मिळालें नाहीं. चंदासाहेबानें तंजावरावर वारंवार स्वाऱ्या केल्यामुळें त्याच्या-विषयींचा प्रतापाचा आपलेपणाचा भाव अगदीं नष्ट झाला. त्रिचनापल्लीच्या वेढ्यानंतर महंमद अल्लीनें प्रतापास असें कळविल्याचें प्रसिद्ध आहे कीं, " तुझ्यामुळेंच मी आज जिवंत आहे. माझ्या पित्याच्या मृत्यूच्या समयी मी जी प्रतिज्ञा केली होती ती पूर्ण कर-ण्यासाठीं चंदासाहेबाला माझ्या स्वाधीन कर. " क्लाइव्ह आणि ईस्ट इंडिया कंपनी आरंभीं आरंभीं प्रतापाला स्वतंत्र राजा समजून ' His majesty ' या पदवीनें संबोधीत असत. परंतु तेंहि पुढें बंद झालें असें दिसते.

**प्रतापाची प्रजानुरक्ती.**

२ राज्याधिकार धारण करण्याला प्रताप अगदीं नाखुष होता. पण राज्यांतील मुख्य मुख्य कर्त्या माणसांनी ' संस्थानाच्या हितासाठीं तरी प्रतापानें राज्याधिकार स्वीकारावा ' अशी त्याला गळ घातली; व अतिशय मनधरणी केल्यामुळे प्रतापानें तंजावरची गादी पतकरली. शिला-लेखांत असे म्हटलें आहे कीं, प्रताप हा भला, बुद्धिमान, रूप-संपन्न व शूर असा राजा होता. प्रजेची भक्ति वृद्धिंगत होण्यासाठीं प्रतापानें प्रजेच्या कुडिवारम् हे अधिक प्रमाणांत करण्याची सवलत दिली. कुडीयारम् म्हणजे जमीन नांगरण्याची मजूरी. ही बहुधा पिकाच्या प्रमाणांत असे. तें मजूरीचें प्रमाण प्रतापानें वाढविल्यामुळें गरीब लोक साहजिकपणेंच अधिक सुखी झाले असावेत. या शिवाय प्रता-

पाने नागोर येथें एक मशीद बांधून त्या मशीदीच्या खर्चासाठीं पंधरा गांवें इनाम दिलीं. यावरून प्रतापाची प्रजानुरक्ता व त्याचा सहनशील स्वभाव यांची चागली जाणीव होते. त्याच्या भोवती जीं माणसे असत त्यांच्या स्वभावाची परीक्षा तो फार तीक्ष्ण दृष्टीने व बारकाईने करीत असे. ज्याची लहर व जुलमी वृत्ती याच्या योगे सगळ्या तंजावराचा नाश होण्याची वेळ आली होती, त्या किल्लेदाराला प्रतापानें प्रथम पुष्कळच धाकांत ठेविलें व नंतर एका प्रसंगीं देहान्ताची शिक्षा केली. देवी कोट्टाइच्या वेढ्यापासून सेनापति मानाजी याची फार प्रख्याती झाली व प्रतापाने त्याच्या युद्धकलाभिज्ञतेचा पुष्कळच उपयोग करून घेतला. मानाजी हा स्वभावानें लहरी व हूड असल्याने कित्येक वेळां तो प्रतापाच्या आज्ञेच्या विरुद्ध वर्तन करीत असे. तो एखाद्या प्रसंगाची चिकित्सा मोठ्या मार्मिकरीतीने परंपरा जुळवून करण्यांत कुशल होता व इंग्रजाविषयीं त्याला आपलेपणा वाटत असे. प्रतापाचा चिटणीस गादीराव व सेनापति सखोजी या उभयतांचे सूत या मानाजीशीं नसे. या उभयतांच्या सल्ल्यावरून प्रतापाने मानजीला आपल्या नोकरांतून दोनदां कमी केले व एकदां तर कैदही केलें. परंतु मुराररावाच्या सत्यनाशी स्वारीपासून किंवा इतर भयंकर संकटांतून तंजावराचें रक्षण करण्यास एकटा मानाजीच समर्थ होता, अशी सर्वांचीच खात्री होती. प्रख्यात डबीरपंडित हा दुसरा एक मोठा इसम होता. जमाबंदीच्या कामांत हा फार निष्णात असे. प्रतापाच्या मुलाचा कारभाराहे त्याने कांहीं दिवस केला, त्यामुळें राज्याला पुष्कळच लाभ झाला. मध्यंतरा थोडेच दिवस हा पंडित

कारभार करीत नव्हता. पूर्वी यांची शहरांत शंकराचार्यांचे पीठ होतें; परंतु तेथें यावनी मताचें प्राबल्य वाढत असलेलें पाहून आचार्यांनी आपलें पीठ उदयारपाल्यम् येथें नेलें. येथील शंकराचार्यांचा मुक्काम कामकोटी येथें असतांना तेथें आचार्यांचा सन्मान करण्यासाठीं राजा प्रताप हा डबीर पंडिताला बरोबर घेऊन गेला होता.

**तोतयाचें बंड व यवनांचें कारस्थान.**

३ तंजावरच्या गादीसाठीं शाहूजी नांवाचा एक तोतया राजा उभा करून सय्यदानें पुनः एकदां क्लेश उत्पन्न केले होते. पण त्यात त्याला यश आलें नाहीं. सय्यद हा चंदासाहेबाशीं कांहीं कारस्थान करीत असल्याचें पुढें उघडकीस येतांच प्रतापानें त्याला देहान्त शिक्षा केली. कोयाजी काटीगाई हा तंजावर येथील एक मोठा सरदार प्रतापाशीं वैर करीत असे. तोतया शाहूजीच्या तर्फेनें या कोयाजीनेंच परदेशी व्यापारी व चंदासाहेब यांच्याशीं कांहीं कारस्थान रचिलें होतें, व अगदीं आरंभीं म्हणजे सन १७४० मध्यें स्वतः तोतया शाहूजी हाहि प्रतापाच्या विरुद्ध कांहीं कारभार करीत होता.

**किल्लेदार सय्यद याचीं कारस्थानें.**

४ किल्लेदार सय्यद हा पहिलीच कारवाई करीत असल्याचें आढळून आलें. आपल्या मुलासाठीं तंजावरचें राज्य लाटावें, असा त्याचा उद्देश असावा असें दिसतें. जर त्याला दीर्घकाळपर्यंत जगूं दिलें तर तंजावरास यावनी सत्तेचें प्राबल्य खास झालें असतें. तो स्वतः क्रूर, लहरी व पराकाष्ठेचा स्वच्छंदी होता. मोठी सत्ता आपणांस असावी अशी त्याला पराकाष्ठेची आवड होती.

त्याच्या ताब्यांत कांहीं फौज असल्याने तिच्या जोरावर स्वतःच्या मर्जीप्रमाणे वाटेल तेव्हा राजाला पदच्युत करण्याचे अथवा वाटेल त्यास राज्याधिकार देण्याचे त्याला सामर्थ्य होतें. चार वर्षेपर्यंत खरा सत्ताधीश तोच होता. तो स्वतः धर्माने यवन असल्याने कर्नाटकाचा नबाब सादतुल्लाखान व त्याचा जावई चंदासाहेब यांच्याकडेस त्याचा विशेष ओढा होता. त्याच्याकडेस राज्याचा कारभार ज्या मुदतींत होता त्या मुदतींत तंजावर येथील देवळें व यज्ञयाग यांच्याकडेस पूर्ण दुर्लक्ष होऊन धर्मादायहि बंद पडला होता. वांचेश्वर उर्फ कुटीकवि याने सन १७४१ मध्ये ‘ महिषा शतक ’ नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत नानाजी, शाहजी, सरभोजी व आनंदराव यांच्या वेळचे सुखाचे दिवस गेले असे मोठ्या दुःखपूर्ण उद्गारांत लिहून ठेविले आहे.

५ सन १७७६ मध्ये कर्नाटकाच्या नबाबाने एक पत्र डायरेक्टरास लिहिले असून त्यांत प्रतापाच्या राज्यारोहणापूर्वीचा तंजावराचा वृत्तान्त नमूद केलेला आहे. या वृत्तांतांत नबावाशीं प्रतापाचा कसा संबंध होता हे दर्शविलें आहे. दोस्तअली हा कर्नाटकाचा सुभेदार असताना प्रताप हा मोठा अवज्ञाशील आहे असें पाहून त्याला एका मुसलमान अंमलदाराने सेवान्त वेतन देऊन नोकरींतून निवृत्त केले होतें. मराठ्यांनीं सन १७४० मध्यें दोस्त अलीचा वध केल्यामुळे प्रतापाला पुनः राज्यप्राप्ति झाली. नंतर तंजावराकडून किती खंडणी घ्यावयाची हें ठरविण्यासाठी निजामाने आपले सैन्य पाठविलें व त्याच्या धाकानें खंडणी वसूल

प्रताप व नबाब यांचा संबंध.

केली. अन्वरुद्दीन यानें तीन स्वाऱ्या केल्याचा दाखला आढळतो व त्यावरून मुख्य सत्तेचें लढाऊ सामर्थ्यहि कसे हीन होतें याची माहिती मिळते.

६ वर दिलेली माहिती अगदी बरोबर आहे. आपलीं राज्यें पूर्णपणें खालसा होऊं नयेत म्हणून दक्षिणेकडील मराठी संस्थानिकांनीं साताऱ्याहून फौजेची मुख्य मदत मागविली. त्याप्रमाणे ती आली व त्या फौजेशीं लढत असतांना कर्नाटकाचा नबाब दोस्तअली हा मारला गेला. ऑर्मे म्हणतो कीं, निजामानें मराठ्यांना नबाबाविरुद्ध चिथविलें होतें. परंतु चंदासाहेबांशीं नबाबाच्या मुलाचे वैर असल्यानें तो मुलगाच या मराठ्यांच्या स्वारीबद्दल जबाबदार आहे. रघूजी व फत्तेसिग यांच्या हाताखाली सुमारे दहा हजार फौज देऊन शाहूनें त्यांना नबाबावर पाठविलें व मराठ्याशीं युद्ध करीत असतानाच नबाब मारिला गेला. मराठ्यांनीं त्रिचनापल्ली काबीज करून ती गुटीचा लुटारू राजा मुरारीराव याला दिली व चंदासाहेबाला कैद करून साताऱ्यास नेलें. साताऱ्याहून आलेल्या रघूजी भोसल्याला सगळा दक्षिण हिंदुस्थान जिंकण्याची महत्त्वाकांक्षा होती. पण तसें घडल्यास आपणाहि सातारच्या छत्रपतीचे मांडलिक होऊं या भीतीनें प्रतापानें रघूजीला मनापासून साहाय्य केलें नाहीं, इतकेंच नव्हें पण त्रिचनापल्लीची देणगीहि त्यानें स्वीकारली नाही. तंजावरचा राजा प्रतापसिंह याची ही अदूरदर्शी राजकारणकुशलता उभयपक्षांना

**साताराकरांची मदत**

अहितकर होती. मुरारीनें पूर्वी तंजावरावर स्वारी केली त्यावेळीं मानाजीनें मोठ्या कुशलतेनें त्याला परत पिटाळून लाविलें. त्यामुळें मुरारी व प्रताप यांच्यामध्यें आता रहस्य राहिलें नव्हतें. यानंतर सन १७४२ मध्यें कर्नाटकाच्या नबाबाचेंच सैन्य आलें. त्यानें मुरारीच्या ताब्यांतील त्रिचनापल्ली सर केली व ती अन्वरुद्दीन यास दिली आणि तंजावरावर कांहीं खंडणीहि लादली; व ती तंजावरकरांस मान्य करणें भाग पाडिलें. गुंतागुंतीच्या परिस्थितिमुळे निजाम व नबाब, आणि मराठे व परदेशीव्यापारी या जोड्यांमध्यें केव्हां काय परिस्थिति उत्पन्न झाली असती तिचा अंदाज काढितां येणें शक्य नसल्यामुळें प्रतापाची कारकीर्द अस्थिर व क्षुद्र ठरते असें फार तर म्हणतां येईल. ही परिस्थिति प्रतापाच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत तशीच राहिली व शेंवटीं शेंवटीं कोणतेहि धाडसी राजकारण करणें अशक्य झालें.

**तोतयाचे प्रयत्न.**

७ तोतया राजा शाहूजी हा सन १७३९ मध्यें तंजावरच्या गादीवरून पदच्युत झाला. त्यानंतर सहा वर्षांनीं म्हणजे सन १७४५ चे सुमारास त्यानें पांडिचेरीला फ्रेंचाकडेस मनुष्य पाठवून आपलें राज्य बळकाविणाऱ्या प्रतापाच्या विरुद्ध मदत मागितली. परंतु ती त्यास फ्रेंचांनीं दिली नाहीं. फ्रेंचाकडून मदत न मिळाल्यामुळें तो सन १७४९ मध्यें फोर्टसेंट जॉर्ज डेव्हिड याजकडेस गेला. यावेळीं कोयाजी कट्टिगाई हा तोतयाच्या बाजूनें पुढारी होता. परंतु सन १७३९ पासून पुढें सात वर्षेपर्यंत मद्रास येथील आंग्लसत्तेने प्रतापाला राजा म्हणून मान्य केलें होतें. सन १७४७ मध्यें प्रताप व इंग्रज यांनीं एकमतानें

कारिकाल घेण्याचें ठरविलें होतें. परंतु तोत्याचा लोंचटपणा, लढाईचा खर्च आणि देवीकोट्टाइ बंदर देण्याचे आमिष हीं प्रलोभनें झिडकारिणें मोठें कठिण होते. देवीकोट्टाई हें बंदर कोलेरून नदीच्या मुखाजवळ असून तें समुद्राकडून व उत्तरेच्या बाजूनें तंजावरावर स्वामित्व गाजविण्याची गुरुकिल्ली असल्यानें कोलेरून नदीकांठची वसाहत मोठी आश्चर्यजनक झाली. त्याकाळीं जहाजांना सुरक्षितपणें किनाऱ्याला लावितां येत असे. तेथें जवळच लांकडे व धान्य यांचा भरपूर पुरवठा असे. इत्यादि कारणांनीं इंग्रजकंपनीला ती देणगी मोठी प्रलोभनीय वाटली.

**इंग्रजांची यशस्वी मध्यस्थी.**

८ हिंदुस्थानच्या राजकारणांतील इंग्रजांची यावेळची मध्यस्थी अगदीं प्रथमचीच होय व ती चांगल्या मुहूर्तावर झाली होती असे त्यांच्या दृष्टीनें म्हणावे लागतें. येथील राजकारणांतील इंग्रजांच्या मध्यस्थीची चळवळ परिणामाच्या दृष्टीने इंग्रजांना मोठी लाभकारक व हिंदी लोकांना तत्कालीन राजकारणाच्या दृष्टीनें अखेरचीच झाली. याच सुमारास प्रतापानें इंग्रजी कंपनीला फ्रेंचांच्या विरुद्ध मदत दिली होती. तथापि इंग्रजी कंपनीने निमकहरामी करून प्रतापावर दोन मोहिमा केल्या. देवीकोट्टाई येथील किल्ल्याचा घेरीव सुमारे एक मैलाचा असून त्याच्या भिंती १८ फूट उंचीच्या होत्या. तंजावरच्या लोकांनीं मोठ्या शौर्यानें त्याचे संरक्षण केलें होतें. तेथील किल्लेदारानें तर मोठ्या हिंमतीने इंग्रजांना कळविलें होतें कीं, "माझें वय ४० वर्षांचें झाले असून आजपर्यंत मला कोणीहि दोष दिलेला नाहीं. म्हणजे इतक्या चोख रीतीनें किल्लेदाराचें

कर्तव्य मी आजपर्यंत बजाविलें आहे. मजजवळ पांच हजार फौज असून या किल्ल्याचें संरक्षण प्राणान्तापर्यंत करण्याचा निश्चय त्या समग्र फौजेनेंहि मजप्रमाणेंच केलेला आहे. हा किल्ला अभेद्य असल्यानें आम्हांपैकीं एकूनएक संरक्षक मरून जाईपर्यंत तो लढवावा असा आमचा दृढ संकल्प आहे." कांहींहि असो. इंग्रजांची पहिली स्वारी अयशस्वी झाली व तो किल्ला त्यांना हस्तगत करितां आला नाहीं. दुसऱ्या स्वारींत मोठ्या शिकस्तीनें देवीकोट्टाई हें बंदर इंग्रजानीं हस्तगत केलें. यावेळीं लॅारेन्स व क्लाइव्ह हे दोन इंग्रज प्रसिद्धीस आले. प्रतापाचा सेनापति मानाजी हा त्यावेळीं फारच शौर्यानें लढला व बंदराचें संरक्षण उत्तम प्रकारें करिता झाला. परंतु कर्नाटकावर जमलेल्या राजकीय वातावरणाच्या ढगानीं उभय पक्षांत त्वरेनें तह घडवून आणिला. या युद्धांत जयश्रीने इंग्रजांना माळ घातली होती तरीहि त्यांनीं आपलाच हेका न चालवितां व ज्या तोतयाची त्यांनीं तरफदारी केली होती त्यालाहि राज्यपदावर न बसवितां प्रतापसिंहाशीं तह केला. तथापि इंग्रजांना देवीकोट्टाई हें बंदर मिळालें व तोतयाच्या पोषणाची व्यवस्था झाली. हिंदुस्थानांतील प्रदेशाची प्राप्ति याच प्रसंगीं इंग्रजांस प्रथम झाली. म्हणजे ही मोहीम अशा दृष्टीनें यशस्वी झाली. इंग्रज व हिंदी यांच्या भावीयुद्धांत इंग्रजांना जें राजकारण सिद्धीस न्यावयाचें होतें त्याचें उपजत पोषण प्रताप–शाहूजी या युद्धानें केलें. त्यांत शाहूजीच्या तर्फेनें इंग्रज लढले हें वर सांगितलेंच आहे. या युद्धानंतर तंजावरच्या राजाला तोतयाची भीति मुळींच राहिली नाहीं. परंतु प्रताप अगर त्याचा मुलगा ( राजपुत्र ) यांना परदेश-

त्यांबद्दल मुळींच प्रेम राहिलें नाहीं. परदेशस्थांनीं तंजावरच्या राज्यांत प्रवेश करितांच एक कर द्यावा असें राजानें ठरविलें.

**नवाबीसंबंधीं युद्धें.**

९ वारसाइसंबंधाचा उपरिनिर्दिष्ट झगडा थंड पडला तोंच महंमदअल्ली व चंदासाहेब यांच्यामध्यें कर्नाटकाच्या नवाबगिरीसंबंधीं एक लढाई उपस्थित झाली. ही लढाई म्हणजेच कर्नाटकाचें युद्ध होय. वस्तुतः भाऊबंदकीच्या युद्धाचा शेवट हा कर्नाटकाच्या लढाईचा सूचक असा श्रीगणेशाच होय. सातारच्या वैदेतून चंदासाहेबाची मुक्तता, सन १७३६ ते १७३९ या वर्षांमधील तंजावरांतील यादवी, फ्रेंच व मुजफरजंग यांच्या बरोबर तंजावरच्या तोतयानें जोडिलेला स्नेह, कर्नाटकाचा नबाब अन्वरुद्दीन याचा सन १७४९ मधील मृत्यु व नबाबीच्या प्राप्तीसंबंधी महंमदअल्ली व चंदासाहेब यांच्यामधील स्पर्धा, अशा कारणांमुळें प्रताप व मानाजी यांना इंग्रजांशीं तह करणे भाग पडलें. तंजावर हें शहर त्रिचनापल्लीच्या जवळच आहे. व त्रिचनापल्लीसच महंमदअल्ली व चंदासाहेब याच्या युद्धाचा वणवा पेटल्यानें तंजावर हें शहर मोठ्या कचाटींत सांपडलें. कारण दोघांनींहि प्रतापाकडेस मदत मागितली व ज्याला मदत मिळणार नाहीं तो आपल्या संस्थानास उपद्रव देईल अशी प्रतापास धास्ती वाटत होती. मराठी शिलालेखांत असें लिहिलें आहे कीं, महंमदअल्ली हा नेगापट्टमहून त्रिचनापल्लीस पळून जात असतांना प्रतापसिंहाचा पाहुणा म्हणून तीन महिने मध्येंच तंजावरास राहिला होता. सन १७४९ च्या डिसेंबरमध्यें चंदासाहेब व मुजफरजंग हे त्रिचना-

पल्लीस जात असताना मध्येंच तंजावरास थांबलें. तंजावराच्या राजा-कडेस मोगलांची बरीच मोठी रक्कम घेणें होती हें या उभयतांस ठाऊक होतें. ती रक्कम वसूल करण्याच्या निमित्तानें त्यांनीं तंजावराच्या किल्ल्यास वेढा दिला, रकमेची मागणी केली व ती रक्कम वसूलहि केली. हे दोघे यवन सरदार फ्रेंचांचें मित्र असल्यानें त्यांनीं कारीकालजवळ ऐशीं खेडींहि स्वतःसाठीं मिळविलीं. तंजावरास दोन किल्ले असल्यानें तंजावराचें संरक्षण उत्तम प्रकारें होत असे. या दोन किल्ल्यांतील एक किल्ला अधिक मजबूत होता. त्यामुळें तंजावराचा एकदम पराजय झाला नाहीं. प्रतापसिंह या धूर्त मराठी राजानें आपल्या मदतीला नासिरजंग येईल या उत्सुकतापूर्ण आशेच्या अन्तस्थ कारणानें, चंदासाहेब व मुजफरजंग या यवन शत्रुद्वयांना तहाच्या निमित्तानें कांहीं दिवस झुलविलें. नासिरजगानें कर्नाटकांत केलेल्या पराक्रमानें चंदासाहेब पळून गेला व त्याचा मुख्य साहाय्यकारी मुज-फरजंग हा प्रतापसिंहाकडून मिळालेल्या खंडणीचा कांहीं हिस्सा घेऊन पांडेचरीला सटकला.

**महंमदअल्लीस प्रतापाची मदत.**

१० सन १७५० मध्यें प्रतापसिंग व इंग्रज यांच्यांत मित्रत्वाच्या नात्यानें झालेला पत्रव्यवहार आज उपलब्ध आहे. परंतु इंग्रजांनीं तंजावरावर नुकतीच स्वारी केली असल्यानें इंग्रजांच्या वर्तनाचा कटु अनुभव आल्यामुळें राजा प्रतापसिंग हा नबाब व फ्रेंच यांच्या मित्रत्वाच्या भानगडींसंबंधीं उदासीन राहिला होता. जेव्हां त्रिचनापल्ली येथें महंमदअल्ली हा शत्रूकडून वेढिला गेला, तेव्हां म्हैसूरचा मुतालिक नंदराजा व गुटीचा मुरारीराव यांनीं महंमदअल्लीला मदत केली; व सन १७५२ मध्यें प्रतापसिंहहि त्या मित्रसैन्यांमध्यें सामील

झाला. प्रतापसिंहाच्या ताब्यांत पांच हजार स्वार व तीस हजार पायदळ असल्यानें कर्नाटकामध्यें हा राजा फार महत्त्वाचा सत्ताधारी असा मानिला जात असे. त्यानें तीन हजार स्वार व दोन हजार पायदळ असें पांच हजार सैन्य मानाजीच्या ताब्यांत देऊन त्याला महंमदअल्लीच्या मदतीसाठीं पाठविलें. यावेळीं अर्काट येथें क्लाइव्हच्या नेतृत्वाखालीं सैन्यानें जो पराक्रम केला त्या योगें नशीबाचें पारडें एकदम फिरलें. अनेक मित्रांच्या साहाय्याने महंमदअल्लीनें त्रिचनापल्ली हस्तगत केली. फ्रेंचांच्या ताब्यांतील किल्ला व कोईलड्डी हस्तगत करण्यास लॉरेन्सच्या नेतृत्वाखालीं मानाजीनें इंग्रजांस मदत दिली. या सगळ्या युद्धांत इंग्रजांनां तंजावराहून सर्व पुरवठा होत होता. चंदासाहेब हा शरण आला होता; पण महंमदअल्लीच्या चिथावणीवरून मानाजीनें विश्वासघातानें त्याचा शिरच्छेद केला. या एकंदर युद्धांत तंजावरच्या राजानें चांगली मदत केल्यामुळें त्याला कोईलाड्डी व एलंगुड ही गांवें व मागील दहा वर्षांच्या खंडणीची माफी देण्यांत आली.

**महंमदअल्ली व म्हैसूरकर यांचे संबंध.**

११ म्हैसूरच्या मुतालिक नंदाराजानें जी मदत केली होती ती बद्दल त्याला महंमदअल्लीनें त्रिचनापल्ली देण्याचें वचन दिलें होतें; परंतु तें वचन पुढें त्यानें पाळिलें नाहीं; म्हणून नंदाराजा व मुरारीराव हे दोघेहि इंग्रजांचे साहाय्यकर्ते फ्रेंचाकडेस गेले. याचप्रमाणें प्रतापानेंहि आपणांस मिळावें या हेतूनें फ्रेंच्यांच्या तर्फे दुप्लेनें प्रतापाला धाक दपटशहा व कांहीं प्रलोभन दाखविलें. त्यामुळें किंचित्काळ दुप्लीचा मनोरथ सिद्धिस गेला. परंतु लवकरच राजा

परत आपल्या संघांत (नंदराजा व मुरारी यांच्याकडेस) आला. संघांतून फुटून गेल्याबद्दल राजाला कडक शासन झालें. मुरारीनें त्याच्या मुलुखावर स्वारी केली व काइलड्डी कालिगुल्ला धुळीस मिळविलें. या युद्धांत राजाचा सेनापति गड्डीराव याचा पराजय झाल्यानें मानाजीला नोकरींत परत ठेवावें लागलें. त्याला फ्रेंचांच्या आग्रहानें नोकरींतून नुकतेंच कमी केलें होतें. मानाजीच्या विजयी पराक्रमानें व नबाबानें कांहीं रोकड रक्कम दिल्यामुळें मुरारीला परत जाणे भाग पडलें. 'या युद्धांत तंजावरचा राजा प्रताप हा पौरस्त्य राजकारणांतील न्यायीपणाच्या धोरणानें वागत असे' असें त्यावेळच्या इंग्रजी बातमीपत्रांत म्हटलें आहे. परंतु असें स्पष्ट दिसतें कीं, त्याला चंदासाहेब किंवा फ्रेंच यांच्याबद्दल आपलेपणा मुळींच नव्हता. हिंदुस्थानांत साम्राज्य स्थापन करण्याच्या इंग्रजांच्या प्रयत्नाला मात्र त्याची मदत झाली.

**मानाजीचा पराक्रम.**

१२ तंजावरच्या गादीसाठीं फ्रेंच हे एका तोतया राजाला पुढें आणण्याच्या प्रयत्नात असल्याबद्दल इंग्रजांनीं सन १७५७ मध्यें प्रतापाला कळविलें. परंतु 'आजपर्यंत पंचवीस तोतये उत्पन्न झाले त्यामुळे आपणांस आतां अधिक एका तोतयाची धास्ती मुळींच वाटत नाहीं.' असें प्रतापानें इंग्रजांस उलट कळविलें. चंदासाहेबाला शेहेचाळीस लक्ष रुपये देण्याचा एक ठराव सन १७४९ मध्यें तंजावरास केला होता, ती रक्कम वसूल करण्यासाठीं सन१७५८ मध्यें लाली हा कारिकालहून तंजावरावर चालून गेला. परंतु त्याला नागोरास मुळीच लूट मिळाली नाहीं. मानाजीच्या पराक्रमापुढें लाली अगदीं फिका पडला.

कारिकाल्जवळच इंग्रजांच्या लढाऊ जहाजांचा काफला दिसूं लागतांच लाली हा तंजावराहून तत्काळ परत फिरला. तंजावरच्या सेनेला इंग्रजांच्या लहानशा फौजेचें साहाय्य मिळाल्यामुळें तिनें कमी झालेल्या व उपासानें अर्धमेल्या झालेल्या फ्रेंच्यांच्या फौजेला हैराण केलें. सन १७६१ मध्यें पांडेचरीच्या वेढ्याच्या सात वर्षांच्या मुदतींत राजा प्रताप यानें सहा हजार स्वार व इतर सर्व पुरवठा इंग्रजी सेनापतीस केला होता. इंग्रजांशीं त्याचें इतकें रहस्य होतें कीं, तंजावर हें इंग्रजांचेंच आहे असे त्यानें एकदां लिहिलेलें आहे.

**प्रतापाची स्तुति.**

१३ प्रतापाला 'तंजावरचा महाराज' असें इंग्रजी कंपनी म्हणतच असे; व सन १७६२ मध्यें कंपनीच्या गव्हर्नरानें प्रताप हा चक्रवर्ती असल्याचे नबाबाला कळविलें होतें. परंतु हा सर्व बाह्य असा शाब्दिक देखावाच ठरला. कारण गेल्या युद्धांत प्रतापानें इंग्रजांस इतकी मदत दिली तरी नबाबानें, मित्रांनीं, शेजाऱ्यांनीं व इंग्रज कंपनीनेंसुद्धां तंजावराला नंतर फारच धिक्कारपूर्वक वागविलें. तंजावरचें राज्य हें नेत्रशल्याप्रमाणें महंमदअल्लीला त्रासदायक वाटत असे, म्हणून ते खालसा करावें असा त्याचा हेतु होता. इंग्रजी कंपनीनें सन १७६२ मध्यें डायरेक्टरांना कळविलें की, तंजावरकराशीं युद्ध पुकारिलें तर इतर संस्थानें, महंमदअल्लीच्या अधिकारीवाणीला विरोध न दर्शवितां तंजावरकरांना मिळतील. पुढें मद्रास सरकारच्या मध्यस्थीनें तंजावरच्या राजानें नबाबास बावीस लक्ष रुपये मागील बाकीबद्दल दिले व चार लक्षांची सालीना ठरीव खंडणी मान्य केली. कोइलाडी व येलंगुडु हीं गांवें नबाबानें राजास परत दिलीं. जो तह ठरला

त्याच्या पूर्ततेसाठीं कंपनीची जामीनगिरी मिळाली. या नंतर दर-साल खंडणीची रक्कम वसूल करण्यांत आली, व आजपर्यंत स्वतंत्र किंवा अर्धवट स्वतंत्र असलेलें तंजावरचें राज्य आपलें स्वातंत्र्य गमावून बसलें. प्रतापानें महंमदअल्लीच्या ऐवजीं फ्रेंच व चंदासाहेब यांना जरी मदत केली असती, तरी याहून अधिक फायदेशीर तह झाला असता असें नाहीं.

**कांहीं प्रादेशिक घालमेली.**

१४ रामनदकरांशीं फार दिवसांपासून चालत आलेलें वैर अरंतांगीं येथें सरहद्दीवर चालूच होतें. तुकोजीच्या कारकीर्दीच्या शेवटीं तंजावरकरांचा काहीं प्रदेश गमावला होता, तो पुदुकोट्टाईच्या तोंडामनांच्या मदतीनें मानाजीनें परत मिळविला. परंतु पुन्हा तो प्रदेश गमावला, व नबाबाच्या मनाई हुकुमामुळें प्रतापानें ह्या प्रदेशाचा वाद सोडून दिला. कारण नबाब हा तंजावरचा खरा अधिपति होता व इंग्रजी कंपनीच्या साह्यानें तो निरंकुश झाल्यामुळें त्याचें आसन स्थिर होऊन रक्षणहि झालें. त्याच्या कारकीर्दीत सरहद्दीवर तोंडामन लोकांशीं कांहीं झगडे होत, पण ते किरकोळ स्वरूपाचे होते.

**महंमदअल्लीची तंजावरावर स्वारी.**

१५ आपला गेलेला प्रांत परत मिळविण्याच्या हेतूनें प्रतापसिंहाच्या गादीवर आलेल्या वारस राजानें रामनदावर स्वारी केली. त्या राजाचें तें कृत्य नबाबास अपमानकारक वाटून त्यानें प्रथम तंजावरावरच चाल केली. हें श्रीमंत संस्थान खालसा करावें असाच महंमदअल्लीचा हेतु होता. म्हणून प्रथम त्याचा पाडाव

करून तें आपल्या ताब्यांत घेण्याचा त्याचा हेतु होता. तंजावराची संपन्नता कावेरी नदीच्या आविकूट कालव्यावर अवलंबून असल्यानें तो कालवा दुरुस्त करण्यासहि महंमदअल्लीनें परवानगी दिली नाहीं, असें त्याच्या सन १७६३ व १७६५ च्या पत्रव्यवहारावरून दिसतें.

**तंजावर संस्थान लयास जाण्याचीं कारणें.**

१६ तंजावरच्या राज्यास उतरती कळा लागण्याला प्रतापसिंहाच्या वंशजाचा कमकुवतपणा मुख्य कारण होता हें तर खरेंच आहे. तथापि इंग्रजी कंपनीस महंमदअल्लीचा भक्कम पाठिंबा असल्यानें तंजावरचे संस्थान सत्वर लयास गेलें. सन १७६१ मधील पानिपतच्या युद्धात पूर्णपणें पराभव झाल्यानें हिंदुस्थानांतील मराठ्यांची सत्ता फार दुर्बळ झाली व मराठी साम्राज्याची एकीहि नामशेष झाली. तथापि स्वतःची प्रांतिक सत्ता स्थापण्याची महत्वाकांक्षा बाळगणाऱ्या इंग्रजी कंपनीला त्यावेळी हिंदुस्थानांत सर्वांत अधिक बलिष्ठ मराठेच वाटत होते. मराठी सत्ताधाऱ्यात असलेला राजकारणकौशलाचा अभाव व तंजावर हें संस्थान अगदींच दूर बाजूस राहिलें, अशा उभयविध कारणानीं तंजावर संस्थानाला उतरती कळा प्राप्त झाली.

**प्रतापसिंहाचा मृत्यु व वारस.**

१७ सन १७६३ तारीख १६ डिसेंबर रोजीं तंजावरचा राजा प्रतापसिंह हा मृत्यु पावला. तिसरी व पांचवी अशा त्याच्या दोन राण्या सती गेल्या. त्याचा राज्याधिकारी पुत्र तुळजाजी हा होय.

## Additional Authorities.

1 ORME:–A history of the military transactions of the British in Hindustan 2 vols.

2 WILKS:-Sketches of south India 2 vols.

3 DODWELL:–Duplex and Clive.

4 AITCHISON:–Treaties and engagements vols. (10)

5 Papers relative to the Restoration of the Raja of Tanjore vol. III.

# प्रकरण ८ वें.

## तुळजाजी ( सन १७६३-१७८७ )

### मुद्दे

१ विद्याप्रीति
२ धर्मप्रियता
३ भोळेपणा
४ अन्याय्य वर्तन
५ मरवाशीं युद्ध व नबाबाशीं बेबनाव
६ आरोपांची अयथार्थता
७ नबाबाची स्वारी
८ राजपदावर तुळजाजीची पुनः स्थापना
९ नवीन तह
१० हैदराची स्वारी व प्रजेची दुर्दशा
११ मृत्यु व दत्तविधान
१२ वंशवृक्ष

**विद्याप्रीति.**

१ वडील प्रतापसिंह याच्या देखरेखीखालीं प्रस्तुत तुळजाजीला योग्य आणि आवश्यक शिक्षण प्राप्त झालें होतें. तो मोठा भाषाशास्त्रज्ञ होता व संस्कृतकाव्य-रचनाहि करीत असे. तेलगू व मराठी लेखकांना त्यानें आश्रय दिला होता. त्रिचनापल्ली येथें कस्तुरीरंगायन् या नांवाचा एक विद्वान् गृहस्थ फौजेंत नोकर असून कांहीं शिपायांचा जमादार होता. त्यानें आपल्या मुख्यासंबंधानें कांहीं काव्य लिहिलेलें आहे. अल्लूरी

कुप्पान हा या जमादाराचा शिष्य म्हणून प्रसिद्ध होता. तुळजाजीनें या शिष्याला आन्ध्रकालिदास या योग्य पदवीनें भूषविलें होतें. त्यानें आनंदगिरीच्या शंकरविजय या ग्रंथाचें भाषांतर केलें असून तें आचार्यविजयम् या नांवानें प्रसिद्ध आहे. याशिवाय कुप्पान यानें अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत पंचनद स्थलपुराण, रामायणाचे यक्षगण, भागवतकथा, परमभागवतचरित्र, इंदुमतीपरिणय, कर्मविपाक हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. तंजावरच्या राजांच्या आश्रयाखालीं तेलगू वाङ्मय फार भरभराटीस आलें. किंबहुना विजयानगरच्या राज्याच्या पश्चात् हें तेलगू वाङ्मय कावेरी तीरावर पराकाष्ठेच्या उन्नतीस पोंचलें होतें; इतकेंच नव्हे पण तुळजाराजानंतर ही उन्नति थाबली व तें वाङ्मय परत आपल्या मूळ प्रदेशांत गेलें. सत्यच कथन करावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, एकुणीसाव्या शतकाच्या आरंभापासून हिंदी भाषाचें जीवन नष्ट झाल्यासारखेंच झालें असून त्यांची चळवळ आणि कर्तृत्वशक्ति दृग्गोचर होण्यापूर्वीं पाश्चात्य कल्पनांचें जन्तु त्यांच्यांत प्रविष्ट करावे लागले होते. साधे व सरळ उद्गार, ऐतिहासिक व तौलनिक गुणदोषविवेचन, या वाङ्मयीन पद्धति वस्तुतः आधुनिक आहेत. कारण हे प्रकार प्राचीन हिंदी वाङ्मयांत नाहींत.

**धर्मप्रियता.**

२ आपल्या पूर्वजांप्रमाणें राजा तुळजाजी हा धार्मिक मतांत मोठा सहनशील असे. मिशनरी शार्झ यावर त्याचा इतका विश्वास असे कीं, हा राजा लवकरच ख्रिस्ती धर्म स्वीकारील असें तत्रस्थ हिंदीजनतेला तर काय, पण शार्झलासुद्धां वाटूं लागलें होतें. शहाजीच्या वेळेपासून तंजावरचे मराठे हे अद्वैत मताच्या संन्याशांचे भक्त होते. हें इतिहास-

प्रसिद्धच आहे. व तिरुविसनालूर हें ठिकाण त्यावेळीं वेदान्तविद्येंत पारंगत असलेल्या यतींचें निवासस्थान असल्या-बद्दल प्रसिद्ध होतें. या यतींना तंजावरचे मराठी राजे मदत करीत असत. रघुनाथ व सुधींद्र यांच्या वेळेपासून राजा तुळजाजी व सद्गुरु स्वामिगल याच्यापर्यंत तत्वज्ञान व सुसंस्कार याचा अखंड झरा वाहत होता, तो मात्र त्यापुढें अर्वाचीन काळाच्या रूक्ष वाळवंटांत कोरडा ठणठणीत झाला.

**भोळेपणा.** ३ लांच स्वीकारण्याच्या अपराधामुळें लॉर्ड पिगाट याला तेथील नोकरींतून तुळजाजीनें कमी केलें होतें व लांच खाण्याचा आरोप राजा तुळजाजीनें पिगाटवर उघडपणें करावा असें अध्यक्ष स्टॅटन यानेसुद्धां सुचविलें होतें. परंतु राजा तुळजाजी हा मित्र व शत्रू या दोघांहि विषयीं उदार वृत्तीचा असल्याने त्यानें आरोप केला नाहीं. शार्झ याने तुळजाजीच्या दरबारचें या समयींचें 'चैनी व उधळ्या' असें जें वर्णन केले आहे तें अतिशयोक्तीचे मानिलें तरी तुळजाजी हा राजा स्वतःच्या राज्य-कारभाराविषयीं उदासीन असल्याचे दर्शक आहे. तुळजाजीची मद्यपानासक्ति व डबीरपंतासारख्या योग्य माणसाला नोकरींतून कमी करणें, असले उद्वेगजनक प्रकार यावेळच्या मद्रासच्या हस्त-लिखितावरून दिसतात.

**अन्याय्य वर्तन.** ४ आपल्या वडिलांच्या वेळच्या कर्तृत्वशाली कारभारी मंडळाला नोकरींतून कमी करणें अथवा कैदेंत घालणें हें पहिलें कृत्य राज्यारोहण होतांच तुळजाजीनें केलें. त्यानें राज्याधिकार धारण करितांच जमाबंदीचा मुख्य कारभारी डबीरपंत याची संपत्ति हरण करणें हें पहिलें कृत्य केलें.

कर्नाटकाचा नवाब महंमदअल्ली याचा तंजावरच्या प्रधानमंडळावर मित्रत्वाचा लोभ, त्यामुळें तुळजाजीच्या जुलमी वर्तनानें त्याचें तुळजाजीसंबंधीचें प्रेम कमी झालें. वैयक्तिक अधिकाराच्या मदांधतेनें केलेल्या कृत्यानें तुळजाजी हा इतराच्या मनांतून अगदीं उतरला व निःस्पृहपणें हितपरिणामी सल्ला देणारा असा एकहि उपदेशक त्याजवळ राहिला नाहीं. चाकरीवरून दूर केलेल्या डबीरपंताला राज्याच्या हितासाठीं पुनः चाकरीवर घेण्यांत आलें. राज्यामध्यें योग्य व निग्रहपूर्वक वागणारीं माणसें कामावर ठेविणें, त्यांच्या अधिकाराचीं कर्तव्यें मुकर करून नेमून देणें व त्यास ठरीव वेतन देणें हाच मार्ग सर्वोत्तम आहे अशी सर्वांची खातरी झाली. ज्या काळांतील राजव्यवस्थेची चर्चा आपण करीत आहोंत, त्या काळांत नालायक माणसे अधिकारारूढ असल्याचे दिसत नाहीं. कारण असे अधिकारी नेमणें म्हणजे चौकोनी ठोकळा एकाद्या नळींत कोंबून ठोकळा व नळी अशा दोनहि वस्तु निरुपयोगी करण्यासारखेंच आहे. व हाच प्रकार तुळजाजीनंतर अमरसिंगाच्या कारकीर्दीत झालेला दिसतो. कारण त्याचा मंत्री सरखेल शिवराव याची नेमणूक त्याची योग्यता नसतांना झाली होती. माजी (नोकर) दिवाण सखोजी याला दुप्लीनें लांच देऊन सहज वश करून घेतलें होतें, पण तसा नोकर आतां कोणीहि नव्हता. पहिल्या सरभोजीसारख्या चांगल्या मराठी राजाच्या कारकीर्दीतहि तंजावरच्या दरबारांत कारस्थानें सुरू असतच, व त्या कारस्थानांचा परिणाम सरभोजीला एक बनावट अपत्य तयार करून देण्यात झाला. शेवटीं प्रतापसिंहाच्या दरबारांत मानाजी व गड्डीराव यांचें वैयक्तिक वैर भयंकर रीतीनें परिणत झालें. परंतु

असल्या अपवादाशिवाय प्रतापसिंहाची बाकीची कारकीर्द नांवाजण्यासारखीच झाली.

**मरवांशी युद्ध व नबाबाशी बेबनाव.**

५ पूर्वी सन १७६३ मध्यें रामनदाच्या पाळेगारांनीं तंजावरकरांचे हनुमंतगुंडी व इतर प्रांत हस्तगत केले ते परत मिळविण्यासाठीं तुळजा राजानें सन १७७१ मध्यें रामनदकरावर स्वारी करण्याची सिद्धता केली. दुसरें एक भांडण वारसाईबद्दल होतें, त्यांतहि तुळजाजीनें एक पक्ष घेतला होता. तुळजाजीनें आपले प्रांत मिळविले व लहान मोठ्या मरवाच्याकडून द्रव्यहि प्राप्त करून घेतलें. मरव हे कर्नाटकाच्या नबाबाचे संस्थानिक होते, व त्यांचें आणि तुळजाजीचें रहस्य नव्हतेंच. त्यांत आतांच सांगितलेला तुळजाजीच्या मध्यस्थीचा व स्वारीचा प्रकार नबाबास अपमानकारक वाटला व त्यानें राजाला शिक्षा करण्याचा बेत केला; आणि सन १७७१ मध्यें इंग्रजी कंपनीनेहि नबाबाला मदत पाठविली. याप्रमाणें सैन्याची मदत मिळतांच नबाबानें किल्ल्याला वेढा घातला, तटाला खिंडार पाडिले व नबाबाच्या फौजेने किल्ल्यावर हल्ला चढविण्याची सिद्धता केली. इतक्यांत राजानें नबाबाच्या मुलास मोठी रक्कम देण्याचें ठरविलें व त्या मुलानें इंग्रजांच्या मान्यतेशिवाय स्वतंत्रपणें तहहि केला. राजास मदत करण्याचें त्रिंबकरावानें कबूल केलें. याच समयास पांच लक्ष रुपये घेऊन आनंदराव हा म्हैसूरकरांशीं विरोध करण्यांत गुंतला होता. परंतु नबाबानें चार लक्ष रुपये देण्याचें कबूल करितांच आनंदरावाने आपलें वचन मागें घेतलें. अशा भानगडी झाल्यामुळें तुळजाजी राजाला त्यावर

स्वारी करणाऱ्या नबाबाशीं अपमानास्पद तह करणें भाग पडलें. मागील बाकी म्हणून आठ लक्ष रुपये देण्याचे ठरलें व लढाईचा खर्च म्हणून सुमारें बत्तीस लक्ष रुपये नबाबास देण्याचे तुळाजीनें मान्य केलें. या बत्तीस लक्ष रुपयांच्या ऐवजी दोन प्रांत ( सुभे ) नबाबाकडेस दोन वर्षेपर्यंत राहावेत; ( इंग्रजी ) कंपनीचे व्यापारी व विणकरी यांचें संरक्षण राजाने करण्याचें मुक्रर झालें व नबाबाला ज्या परकीय लोकांनीं युद्धसंबंधीं मदत दिली होती त्यांच्याशीं वागण्याची नबाबाची जी राजनीति ठरेल त्याप्रमाणें राजानेंही आपली राजनीति ठरवावी असें ठरले. तंजावरच्या ताब्यांत अरणी ही बरींच वर्षें होती; ती व हनुमंतगडी असे दोनहि प्रांत राजापासून परत घेतले. या प्रकारें झालेल्या गुप्त करारांत ईस्टइंडिया कंपनीचा फायदाच झालेला होता, तरीहि हा प्रकार मद्रास येथील इंग्रजांच्या मुख्याला ग्राह्य वाटला नाहीं.

**आरोपांची अयथार्थता.**

६ वर सांगित्याप्रमाणें तह झाला, परंतु तुळजाजीनें तो पाळिला नाहीं. सातारवर छत्रपति व हैदरअली यांच्याशीं तो कांहीं कारस्थान करीत असावा अशी समजूत होती. परंतु वस्तुस्थिति अशी होती कीं, कर्नाटकचा सुलतान व तंजावरास नुकताच आलेला म्हैसूरचा राजा या दोघांनांहि लांचेच्या स्वरूपाची कांही देणगी देण्याच्या विचारात तुळजाजी हा होता. अशी देणगी जर न दिली तर म्हैसूरचा राजा तंजावर लुटून खैदान मैदान करील अशी त्याला धास्ती वाटत होती. सातारा दरबार व तंजावरचा दरबार यांच्यामध्ये कांही पत्रव्यवहारहि होता. सातारकराशीं व असा पत्रव्यवहार असणें आपल्या इभ्रतीस फार

हानिकारक आहे अशी नबाबाची समजूत झाली होती. परंतु तंजावरच्या प्रतापसिंहापासून म्हणजे तुळजाजीच्या तीर्थरूपापासून सातारकर छत्रपतीशीं त्यांचा मित्रत्वाचा पत्रव्यवहार होताच. युद्धप्रसंगीं डच व डेन्स लोकांनी तुळजाजीराजाला कांहीं लष्करी साहाय्य केलें होतें. त्यामुळें तुळजाजीनें डच व डेन्स लोकांना काहीं खेडीं विकत दिलीं होतीं. या कारणानें तुळजाजी हा कांही दंग करण्याच्या विचारांत असल्याचा संशय अधिक दृढ झाला होता. अशा एकंदर कारणांमुळे इंग्रज कंपनीच्या मदतीनें ( अर्काटच्या नबाबानें ) सन १७७३ मध्ये पुनः एकदां तंजावर सर करून तुळजाजीला कैद केले. याच सुमारच्या तुळजाजीच्या विनंतीवरून फौजेसह राघोबा पेशव्याने दक्षिणेवर चालून जाऊन ' तंजावरचें राज्य हें अर्काटच्या नबाबाचें मांडलिक नसून साताराच्या शाहू छत्रपतीचें मांडलिक आहे, म्हणून तंजावरच्या राजाला आम्हांस सोंपावें ' अशी नबाबाजवळ मागणी केली होती. परंतु इतर पुष्कळशा कारस्थानांमुळे ही मागणी तशीच टाकून राघोबाला परत पुण्यास जाणें भाग पडले. हा प्रसंग सन १७७१--७२ मधील होय. त्या वेळीं पुण्यासहि पेशवाईबद्दल भानगडी सुरूच होत्या. व राघोबाला पुण्यास परत येण्यास तेंहि कारण असूं शकेल.

**नबाबाची स्वारी.**

७ आठ हजार कर्नाटकी सैन्याचें ठाणें नबाबानें तंजावरास ठेविलें. तंजावरचे राज्य सन १७७३ पासून सन १७७६ पर्यंत म्हणजे सरासरी तीन वर्षें पर्यंत मुसलमानांच्या ताब्यांत होतें. तंजावरच्या हिंदुराजांच्या दीर्घकालीन इतिहासामध्ये हे तीन वर्षांचें यावनीवर्चस्व अपवादरूप होय. तंजावरची परिस्थिति मोठी बिपदग्रस्त होती. नबाबानें तंजा-

वरचे उत्पन्न आपल्या धनकोला लावून दिलें होतें. व ते धनकोहि फॉल बॉनफील्डसारखे कठोर हृदयाचे होते. त्यांनीं अन्नान्न झालेल्या व कोणतीहि तक्रार करण्यास अशक्य असलेल्या असाहाय्य शेतकऱ्यांपासून कवडीन्‌कवडी हिसकाऊन घेतली. तंजावरांतील बरेच लोक बेकार व उपाशी राहिल्यामुळें त्यांनीं देशत्याग केला असें शाझनें लिहून ठेविलें आहे. सन १७७५ मध्ये एक्यैंशी लक्ष रुपये वसूल केले होते. वस्तुतः ही रक्कम फारच मोठी होती. कारण तोंपर्यंत जास्तींत जास्त वसूल सन १७६१ मध्ये फक्त साडेसत्तावन लक्षाचाच झाला होता. सन १७७४ ते १७७६ पर्यंतच्या काळात नबाबानें साडेसत्त्याण्णव लक्ष चक्रम् तंजावरातून वसूल केले होते. असें पिगॉट म्हणतो.

**तुळजाजीची राजपदावर पुनः स्थापना.**

८ कोर्ट ऑफ डायरेक्टरांनी कर्नाटकाच्या नबाबाची तंजावरवरील ही दुसरी स्वारी दूषणीय ठरवून तुळजाजीला सोडून देण्याचा नबाबाला हुकूम केला. त्याकाळीं स्वातंत्र्यासाठीं प्रयत्न करणें हें तुळजाजीच्या आवांक्याबाहेरचें होते; व त्याला परिणामकारक मदत देण्यास मराठे व हैदरच समर्थ होते; परंतु एकाच्याहि दरबारात निष्णात राजकारणी पुरुष नसल्यामुळें दोघेहि असमर्थच होते, असें म्हटलें तरी चालण्यासारखें आहे. त्यामुळे, तुळजाराजानें बंड करण्याचा प्रयत्न केला होता, या म्हणण्यांत मुळींच तथ्य दिसत नाहीं. संकटप्रसंगीं इंग्रजांच्या अधिकारी वर्गाची मालिका स्वतःच्या व कंपनीच्या हिताच्या संरक्षणार्थ नेहमी सज्ज असे. इंग्रजी पद्धति आजहि ( स. १९३३°) अस्तित्वांत आहे. या पद्ध-

तिमुळें संकटग्रस्त व्यक्ति तेव्हांहि वरिष्टाकडेस मदतीची याचना करी, व त्या वरिष्टाला आपल्या चुकीची दुरुस्ती करण्याला अवसर मिळे. तो वरिष्ठ या अशा तक्रारीच्या निमित्तानें हाताखालच्या कामगारांच्या कामाची तपासणी करी व त्यांजकडून झालेल्या चुकांवर मोठ्या औदार्याने सारवासारव करी. किंबहुना सारवासारव करण्याची अशी संधि तो व्यर्थ गमावीत नसे. राज्यारूढ झाल्यावर तुळजाजीराजाने स्वतःचें दैन्य बाजूस ठेवून इंग्रजी कंपनीस अतिशयोक्तिपूर्ण असे एक नमुनेदार पत्र लिहिलेलें आहे. त्यांत तो म्हणतो, " इंग्रजी कंपनीचे उपकार इतके आहेत की, मला एक हजार जिव्हां असत्या तरीहि त्या त्याचें वर्णन करूं शकल्या नसत्या. हा देश कंपनीचाच आहे.......".

**नवीन तह.**

९ तुळजाजी राजा पुनः तंजावरच्या राज्यावर अधिष्ठित होताच कंपनीकडून त्याच्याशीं नवीन तह घडविण्यांत आला; व जें कांही ल्हानसें सैन्य त्याच्या ताब्यांत होते, तेंहि त्याच्याकडून या तहाच्या आधारानें कमी करण्यात आलें. सन १७६८ मध्यें सहा हजार स्वार व दोन हजार पायदळ एवढें सैन्य तुळजाराजाजवळ होतें असें शाझ म्हणतो. परंतु आतां तेंहि कमी झाले. फक्त राजाच्या संरक्षणाचेंच लहानसें सैन्य असावें असें ठरलें. फिरंगी वगैरे इतर युरोपियन लोकांचा त्रास पोहोचूं नये म्हणून राजाने इंग्रजी फौजेची एक तुकडी आपल्या पदरीं ठेवावी. अर्थात् या तुकडीचा खर्च कंपनीस द्यावा व खंडणी वेळच्यावेळीं नबाबास द्यावी. याशिवाय तंजावरच्या संरक्षणार्थ कंपनीला एक फौज बाळगावी लागेल, तिच्या खर्चासाठीं चार लक्ष रुपये कंपनीस

द्यावे. पाळेगार किंवा कालार यांनीं जर तंजावरच्या राज्यांत लुटालुटीस प्रारंभ केला तर त्याचा बंदोबस्त करून त्यांना हाकलून देण्यासाठी राजानें कंपनीची पायधरणी करावी.' अशा प्रकारचीं कलमें तहांत होतीं. आपलें राज्य आपणच सांभाळावें हें राजयंत्राचें मुख्य लक्षण. पण तेंच तुळजाजीला पुनः राज्यपद मिळवून देण्याच्या निमित्तानेंच याप्रकारें हिरावून घेतलें गेलें. या तहांत आणखी एक कलम असें होतें कीं, तुळजाजीनें स्वतःचे असें कोणतेंहि राजकारण परदेशाशीं स्वतंत्रपणें करूं नये. परंतु हें कलम व्यर्थच होतें. मात्र यायोगें कंपनीचा फाजिल सावधपणा दिसतो. कारण, त्यावेळीं हिंदुस्थानांतलि इतर यूरोपीय सत्ता मरणाच्या पंथाला लागलेल्या होत्या. सन १७६९ मध्ये हैदराशीं जो तह झाला त्यात तंजावरच्या या तुळजाजी राजाला 'कर्नाटकाचा मित्र व साहाय्यकर्ता ' असें म्हटलें आहे. साराश, या वेळेला तंजावरच्या राजाला निबल, परंतु थोडें अधिक उत्पन्न असलेला, असा एक जहागीरदारच बनवून ठेविला होता. सारांश त्याचे राज्य लयास जाऊन त्याची म्हणून म्हणविणारी रयत कफल्लक होऊन राहिली होती. म्हणजे छत्रपती शिवाजीच्या प्रसिद्ध कर्नाटकच्या स्वारीनंतर सुमारें शंभरच वर्षांनीं तंजावरच्या राज्याची याप्रमाणे इतिश्री झाली. सन १७६३ सालीं पॅरिस येथें जो तह झाला, त्यायोगें कर्नाटकचा स्वतंत्र नबाब हा असाहाय्य राजा होऊन इंग्रज कंपनीच्या हातांतील बाहुले व सावकाराच्या हातांतील एक खेळणें बनला. कर्नाटकची एक मुख्य सत्ताधारी संस्था कंपनी ही बनली होती व तिचा दरज्जा संरक्षण करण्यासाठीं तिच्या पदरीं पुरेशी फौज व भरपूर दारूगोळ्यांची युद्ध सामग्रीहि नेहमीं जय्यत असे. कारोमांडळच्या किनाऱ्यावर यावेळीं फक्त कंपनीचीच

फौज राहत होती व तिचें पोषण नबाब आणि तंजावरकर राजे याच्या उत्पन्नांतून होत असें. म्हणजे कंपनी हीच कर्नाटकची खरी राज्याधिकारिणी सत्ता बनली. तिने नबाबाला पुष्कळ चढविलें व तो वेडगळपणाने स्वतःच्या हितसंबंधीं अंध झाला. कंपनीनेंहि त्याला द्रव्य व दारूगोळा देतो देतो म्हणून नुसत्या थापावर झुलविलें. प्रजेला तोडून दिलेलीं उत्पन्ने, देवळाचीं इनामें, मठ, धर्मशाळा व भटभिक्षुक यांना अर्पिलेल्या धर्मादाय देणग्या, यांखेरीज करून २७७ खेड्याचा नागोर जिल्हा कंपनीस तोडून दिला. दक्षिणेकडील सुपीक प्रदेशांत कंपनीचा पाय रोंवण्यास हे दुसरें साधन झाले. पुढें भविष्यकाळीं मोठमोठे बलाढ्य राजेहि कुमकेचा स्नेह जोडण्याच्या कंपनीच्या जाळ्यांत सहज सापडले. त्यांतून दुर्बळ तुळजाजी निसटणें मुळींच शक्य नव्हतें. तुळजाजी हा इंग्रजांचा मित्र व संरक्षित राजा झाला. या तहानंतर लवकरच तंजावरचें राज्य खालसा झालें; त्यामुळें हा तह म्हणजे भटाला मिळालेल्या ओसरीसारखाच झाला. याचा अर्थ असा कीं, पुनः राज्यपद मिळविण्यासाठीं तुळजाजीला फार भारी किंमत द्यावी लागली; व त्यानंतर एका मागून एक जे तह झाले, त्याच्यायोगें राजाची परिस्थिति फार बिकट होऊन तो खर्चाखाली चेपून गेला.

**हैदराची स्वारी व प्रजेची दुर्दशा.**

१० म्हैसूरच्या दुसऱ्या युद्धप्रसंगीं ( सन १७८१ मध्यें ) हैदरानें तंजावरावर जी स्वारी केली, त्या स्वारीमुळें लोकाचे जे हाल झाले ते फक्त लेखांच्या स्वरूपांत आज दिसतात. ब्रेटविट हा टिपूस तंजावर येथें शरण गेल्यानें तुळजाजीराजाची परिस्थिति मोठी बिकट झाली. कारण त्यायोगें तुळजाजीचा एकुलता एक संरक्षकहि

क्रमी झाला. राजधानीच्या मुख्य ( म्हणजे तंजावर ) शहरा-
शिवाय बाकी सर्व प्रदेशांत सहा महिनेपर्यंत शत्रूंनींच
मुक्काम ठोकिला होता. तेथलि प्रजेला लुटण्यांत येऊन
कांहीं व्यक्तींना पळवून नेण्यांतहि आलें. अगदीं नंतर म्हणजे
सन १७८४ मध्यें टिप्पूनेंच बारा हजार मुले पळवून नेलीं असें
शार्झ म्हणतो. ( अर्थात्च या अर्भकांना मुसलमानी धर्माची दीक्षा
दिली असावी. असो. ) प्रजेची जनावरे नेलीं व कालवे बुजवून
टाकण्यांत आले. आणि चोऱ्यामाऱ्या करण्यास नेहमी तत्पर अस-
ल्या कालार लोकांनीं रिकामी झालेलीं धान्यागारें ( कोठारे )
अगदीं स्वच्छ करून ठेविली. नबाबानें सतत तीन वर्षे व नंतर
तुळजाराजानें पिळून काढिल्यामुळें प्रजा अगदीं वैतागून जन्माला
आल्याबद्दलच शोक करूं लागली. तिने, अन्नान्न स्थितिमुळे दीन-
वाणीनें, परमेश्वराच्या प्रार्थनेस प्रारंभ केला. पुष्कळ जमीन नापिक
झाली. बेकारी माजली व अन्नाची भयंकर टंचाई झाली. पोटासाठीं
पासष्ट हजार लोकांनीं देशत्याग केला. तंजावरामध्यें
आजूबाजूला प्रेतांचे ढीगच्या ढीग पडले होते, असे शार्झ म्हणतो.
पीकपाणी व उत्पन्न यांचा विचार केला असतां पुढें पंचवीस वर्षे-
पर्यंत म्हणजे सन १८०० पर्यंत तंजावरची आर्थिकस्थिति सुधारली
नव्हती असें स्पष्ट दिसतें. या भीतिग्रस्त काळांत जी भीति व जें
दुःख तेथील प्रजेनें अनुभविलें ते अपूर्व होतें. म्हणजे तशी भीति व
तसें दुःख त्या प्रजेनें पूर्वीं कधींहि अनुभविलें नव्हतें. संस्थानच्या
जमीनमहसुलाचें उत्पन्न अनिश्चित झाल्यामुळें तें वसूल करणेंहि
मोठें घोंटाळ्याचें झालें. शेतीचें काम अव्यवस्थित झालें व
कोणत्या साधनांनीं शेती करावी ह्या संबंधींहि शेतकरी घोंटा-

ळ्यांत पडले. म्हणून अगदीं नवी, भयंकर परिणामी व जुल्मी अशी एक पद्धति, शेती करण्यास अस्तित्वांत आणिली. या पद्धतीला शेती सुधारणारी पुट्टकदारी पद्धति असें म्हणत. कांहीं कर माफ करण्यांत आले व अधिक स्वास्थ्य देण्याचींहि वचनें देण्यांत आलीं.

मृत्यु व दत्तविधान.

११ वयाच्या एकुणपन्नासाव्या वर्षीं तुळजाजी हा मृत्यु पावला. त्याच्या राण्यांपैकीं दोघी राण्या सती गेल्या. त्यांची संतती त्याच्या हयातींतच निर्वतली होती. तुळजाजीनें आपला एक गोत्रज मुलगा मांडीवर घेतला व तो वयांत येईपर्यंत आपल्या एका भावानें राज्यकारभार पहावा असें निश्चित केलें होतें. हा भाऊ म्हणजे प्रतापसिंहाचा दासीपुत्र अमरसिंह होय. मांडीवर घेतलेल्या या मुलाचें नांव सरभोजी असें प्रसिद्ध करण्यांत आलें. तुळजाजीचा मित्र मिशनरी शार्झ यानें या सरभोजीची काळजी घ्यावी, असे तुळजाजीनें मरणसमयीं ठरवून सरभोजीला शार्झच्या स्वाधीन केलें होतें.

वंशवृक्ष.

१२ तुळजाजी हा मालोजीच्या वंशांतील सहावा पुरुष असून सरभोजी हा मालोजीचा भाऊ जो विठोजी त्याच्या वंशांतील आठवा पुरुष होय, हें वंशावळीवरून लक्षांत येईल. या दत्तविधानानें नातू हा आजोबाच्या मांडीवर बसून आपल्या पित्याचा भाऊ झाला.

**बाबाजी.**

१ मालोजी
|
२ शहाजी
|
३ व्यंकोजी
|
४ तुकोजी
|
५ प्रतापसिंह
|
६ तुळजाजी
|
याला संतति नसल्यानें यानें सरभोजीस दत्तक घेतलें.

१ विठोजी
|
२ त्रिंबकजी
हा तंजावरासच राहिला.
|
३ गंगाजी
|
४ उवाजी
|
५ गंगाजी
|
६ सुभानजी
|
७ शहाजी
|
८ सरभोजी

या सरभोजीच्या वंशांतलिच लक्ष्मीअम्मा ही कन्या बडोद्याच्या श्रीमंत सयाजीराव महाराजांचे पौत्र प्रतापसिंह यांची पितामही होय.

## Additional authorities.

1 Copies of papers relative to the restoration of the Raja of Tanjore vols 1–3.

2 Wilks: Historical Sketches of South India 2 Vols.

3 Aitchison: Treaties, engagemets and Sanads vol. X

4 Schwartz, his remains consisting of letters journals &c.

5 Pearson: Memoirs of Schwartz 2 Vols.

6 Original papers relative to Tanjore.

7 The Restoration of the Raja of Tanjore Considered 1777.

---

# प्रकरण ९ वें.

## अमरसिंग सन १७८७ ते १७९८

### मुद्दे.

१ नवीन तह.
२ अमरसिंगाच्या अडचणी.
३ टिपूच्या युद्धानंतरचा तह.
४ वारंवार तह करण्याचे हेतु व परिणाम.
५ अमरसिंगाच्या वारसाईची सशास्त्रता.
६ शास्त्र्यांचे प्रयत्न व सरभोजीस राजपदप्राप्ति.
७ अमरसिंगाची पदच्युति.
८ अमरसिंगाची योग्यता.

**नवीन तह.**

१ अमरसिंग ऊर्फ रामस्वामी हा प्रतापसिहाचा दासीपुत्र म्हणजे प्रतापाच्या एका उपपत्नीचा मुलगा होय. या अमरसिंगाने तंजावरचे राज्य बळकाविल्यामुळें दुसऱ्या सरभोजीच्या कारकीर्दीत कोरल्या गेलेल्या शिलालेखात याच्यासंबंधीं निंदाव्यंजक मजकूर आलेला आहे. सरभोजीच्या बालवयांत राज्यकारभार अमरसिंगानें पहावा अशी तुळजाजीच्या अन्तकाळची इच्छा होती. बालसरभोजी वयांत येऊन राज्यावर बसला, तेव्हां इंग्रजी कंपनीने वस्तुतः बळजबरीनें निष्कारण एक तह त्याच्याकडून करून घेतलाच. तंजावरच्या राज्याची सुरक्षितता कायम राहण्यासाठी कांहीं फौज ठेविणें अपरिहार्य होतें. त्या

फौजेच्या खर्चासाठीं तंजावरच्या उत्पन्नाचा दोन पंचमांश खर्च करणें अवश्य असल्याकारणाने तेवढें उत्पन्न कंपनीला तोडून देण्याचें ठरवून, कांहीं प्रदेश कंपनीच्या ताब्यांत देऊन, त्या उत्पन्नाची जामीनगिरी मुक्रर करण्यांत आली. प्रत्यक्ष युद्धप्रसंगीं फौजेच्या खर्चाचीहि रक्कम दुप्पट द्यावी असें ठरलें होतें. नबाबाला कर्जाचें तीन लक्ष पॅगोडा व नबाबानें खंडणी दाखल देण्याचें सालिना चार लक्ष पॅगोडा मिळून होणारी सर्व रक्कम इंग्रजी नाण्यामध्ये कंपनीस तंजावरच्या राजानें देण्याचें ठरलें. उभय पक्षांच्या मित्रशत्रूसंबंधीं सर्वसाधारण कलम तहात घातले होतेच.

**अमरसिंगाच्या अडचणी.**

२ पूर्वोक्त तहाने तंजावरच्या उत्पन्नावर इतकें ओझें लादलें होतें कीं, तें वेळच्या वेळीं देणें राजाला अशक्य झाले. प्रजेची दैना, संस्थानीं नोकरांचा लांचखाऊपणा, वसूलाच्या अडचणी, खंडणी व इतर देणं कंपनीस देण्याचा अनियमितपणा, यासंबंधीं मद्रास येथील हस्तलिखितांत उल्लेख आहे. आपली लोकप्रियता वाढविण्यासाठीं अमरसिंगाने कुडिवरम् ( जमीन लावणीच्या मजुरीचें वेतन ) वाढविले व आपल्या कृपेंतील इसमांस आणि विद्वान् लोकांस जमिनीच्या जहागिरी दिल्या. राज्यांतील नियमित प्रदेशाच्या उत्पन्नाची जबाबदारी कांहीं इसमांस सोंपणें याला तंजावराकडे पुट्टकदारी ( म्हणजे एक प्रकारची देशमुखी ) पद्धति म्हणतात. जमाबंदीचा हिशेब व्यवस्थित ठेविणें व जमिनीच्या पिकाची वृद्धि करणें यासाठीं ही पुट्टकदारी पद्धति अस्तित्वांत

आली होती. परंतु ती यशस्वी झाली नाही; म्हणून जमाबंदीचे उत्पन्न वसूल करण्याची सर्व व्यवस्था सन १७९०–९१ मध्ये आपल्या हातीं घेणे इंग्रजीकंपनीस भाग पडलें. परंतु कंपनीचे दुभाषी म्हणजे मध्यस्थी कांहीं पहिल्या कामगाराहून अधिक थोर मनाचे आणि उदार वृत्तीचे नव्हते. त्यामुळें थोडक्याच अवधींत त्यांनीं शक्य तेवढे अधिक द्रव्य संपादन केले. रेव्हरंड शार्झ म्हणतो की, दहा पंधरा वर्षांच्या अवधीत एक एका दुभाषाने दोन दोन चार चार लक्ष रुपयांची प्राप्ति करून घेतली होती.

**टिपूच्या युद्धानंतरचा तह.**

३ टिपूशी युद्ध झाल्यावर सन १७९२ मध्ये कर्नाटकाच्या नबाबाशीं ज्या अटीवर तह झाला होता त्या, किंवा तशाच अटीवर अमरसिंगाशीं नवीन तह करण्यांत आला. कंपनीनें लष्करी व्यवस्था पतकरली व अमिरासिंगाने त्या प्रीत्यर्थ कांही रक्कम देण्याचें मान्य केले. सैन्याची व्यवस्था कंपनीकडेस असून तंजावरच्या राज्यांतील किल्ल्यांवर मात्र राज्यांतल्या फौजेचीं ठाणीं होती. कंपनीची पूर्ण सत्ता राज्यावर व राज्याच्या उत्पन्नावर युद्धप्रसंगीं असे. उत्पन्नांतून फक्त एक लक्ष पॅगोडा व जमाबंदीच्या उत्पन्नाचा एक पंचमांश राजाला त्याच्या खाजगी खर्चासाठीं मिळण्याचे ठरले होते. मदतीची ठरलेली रक्कम व खंडणी मात्र वेळच्यावेळी देण्याचें मुक्रर झालें होते. मात्र यांत कसूर होतांच कंपनीनें स्वतंत्रपणें आपली रक्कम राज्यांतून स्वतंत्रपणें वसूल करून घेण्याचें मुक्रर झालें होतें. अगदी आरंभीं परदेशीं राजकारण व सैन्यावरील सत्ता राजाकडून काढून घेऊन, मग राज्यांतील जमा-

बंदी वसूल करण्याचें कामहि कंपनीनेंच घेण्याचा प्रयत्न केला. तरवारीच्या म्हणजे सैन्याच्या बळावर प्रतिष्ठा असते व गमावलेली सत्ता खजिन्याच्या पूर्णतेवर परत मिळविणें शक्य असते. सैन्य व खजीना यांच्या अभावीं प्रतिष्ठा व सत्ता टिकणे किंवा परत मिळणें मुळीच शक्य नाहीं.

**वारंवार तह करण्याचे हेतु व परिणाम.**

४ वर सांगितल्याप्रमाणे जे तहामागून तह झाले, त्यावरून राजकारणीं लाभकारक अशा ठरीव धोरणाची प्रगति करण्याची इंग्रजांची आवड व्यक्त होते. याप्रमाणें प्रगति करून इंग्रजांनीं हळू हळू आपला शिरकाव राज्यव्यवस्थेंत करून घेतला व शेवटीं तंजावरचें राज्य खालसा केलें. मागाहून ठरविलेल्या प्रत्येक तहामुळे पूर्वींच्या तहापेक्षा काहीं विशेष अधिकार कंपनीस मिळत गेले व त्यामुळे देशांतील लोकांची आर्थिकस्थिति व यथार्थ मनोदशा याचा विशेष अभ्यास करण्यास व प्रजेशी परिचित होण्यास कंपनीस पुष्कळ सवड मिळत गेली. असें करण्यांत कंपनीचा एकच हेतु होता; व तो असा कीं, कालानुसार तंजावरचें राज्य खालसा करण्याचा प्रसंग आलाच, तर प्रजेस त्याबद्दल वाईट वाटूं नये. कदाचित् शोकवर्धक कांही मनोविकार उत्पन्न झालेच, तर वाईटाच्या जागीं चांगली राजवट प्राप्त झाली असें अनुकूलतेचेच विचार तिच्या मनांत यावेत. यावरून कंपनीस तंजावरचें राज्य यापूर्वींच खालसा करितां आलें असते, पण त्यायोगें प्रजेमध्यें अप्रीति उत्पन्न झाली असती असें वाटतें. तसा प्रसंग न यावा म्हणून एक सत्ताविहीन नामधारी राजा तंजावरच्या राज्यावर कंपनीनें आजपर्यंत ठेविला होता.

शिवाय एकाद्या नामधारी राजामार्फत जे हित कंपनीस साधता आलें तें राजाशिवाय तिला कसे साधतां आले असते? हाहि एक प्रश्न विचार करण्यासारखाच आहे. सत्तेची अगदी बदल होण्या-सारखी वेळ अद्यापि आली नव्हती. कारण कर्नाटकचा नबाब हा अद्यापि नामधारी कां होईना, पण मुख्य सत्ताधारी नबाब होता. मागें सांगितल्याप्रमाणे मित्रत्वासंबंधी एकामागून एक असे झालेले अनेक तह बाजूस ठेवून कंपनीने जर तंजावरचें राज्य खालसा केलें असतें, तर तिचें महत्त्व मुळीच राहिलें नसतें. दक्षिण हिंदुस्थानच्या राज्यकारणांत अद्यापपर्यंत म्हैसूरचा सुलतान हा एक प्रमुख म्हणून प्रसिद्ध होता. तंजावरकरांशी जर शत्रुत्व पतकरिलें असते, तर कंपनीच्या मार्गांतील सहज दूर होणाऱ्या अडचणी मात्र दूर होण्याच्या ऐवजी अधिक वाढल्या असत्या.

**अमरसिंगाच्या वारसाची सशास्त्रता.**

५ तुळजाजीने मरणसमयीं सरभोजीला दत्तक घेतले होतें हें मागील आठव्या प्रकरणाच्या शेवटीं सांगित-लेंच आहे. अर्थात् तंजावरच्या राज्याचा खरा वारस तोच होता. पण त्याचा हक्क बाजूस सारण्याच्या अमरसिंगाच्या प्रयत्नामुळे सन १७९३ मध्यें मद्रा-सच्या गव्हर्नरास तंजावराच्या पंडिताशी वाटाघाट करून सरभोजी हा खरा वारस नसून अमरसिंगच कायदेशीर वारस आहे, असें जाहीर करणें भाग पडलें. या प्रकारावरून उघड दिसतें कीं, आरंभापासूनच अमरसिंगाला मद्रासच्या गव्हर्नराची मदत होती, व त्या मदतीच्या जोरावरच तो आपला हक्क प्रस्थापित करूं पाहात होता.

**शार्झचे प्रयत्न व सरभोजीस राजपद प्राप्ति.**

६ रेवरंड शार्झ यानें अमरसिंगाला राज्यावरून काढून टाकण्याचें महत्वाचें कार्य ख्रिस्तीधर्माच्या उन्नतीच्या आशेने केलें. अगदीं आरंभीं म्हणजे सन १७९० मध्ये त्यानें असें लिहिलें आहे कीं, कंपनीच्या संरक्षणासाठीं अमरसिंगानें राज्यांतील मुख्य लोकांना बोलावून सभा केली होती; परंतु कर्ज-फेडीसाठी प्रांतचे प्रांत ज्याना मक्त्यानें दिले होते, अशा एक लक्ष सावकारांचें समाधान कांही करण्यांत आले नाहीं. अज्ञानी सरभोजीला दूर लोटल्यामुळे अमरसिंगाबद्दल शार्झ याला कांहीं प्रेम वाटत नव्हते. शिवाय सरभोजी हा शार्झचा पाल्य असल्याने तो राजा झाल्यावर आपल्या ( ख्रिस्ती ) लोकांचा बराच फायदा होईल अशी त्याची भावना होती. तुळजाराजा हा ख्रिस्ती धर्म स्वीकारील अशी ज्याप्रमाणे शार्झला आशा वाटत होती त्याचप्रमाणें सरभोजीबद्दलहि वाटत होती. कारण, एकादा संस्थानिक ख्रिस्ती होणें हा मिशनरीचा व ख्रिस्तीधर्माचा मोठाच विजय होय. शार्झनें मरतां मरतां सुद्धां ख्रिस्ती होण्याचाच सरभोजीला उपदेश केला. अशा कारणांमुळें अमरसिंगाचें दोष प्रसिद्धीस आणण्यांत शार्झनें मुळींच आळस केला नाहीं. ‘ अशिक्षित राजा ’ अशा प्रकारानें अमरसिंगाचा उल्लेख शार्झ हा करितो. या अमरसिंगाच्या कारभा-रांत दोष पुष्कळ होते. परंतु पर्वतप्राय अडचणींतून त्यानें राज्यकार-भार चालविला होता हे खरें आहे. तुळजाराजाची विधवा राणी व सरभोजी यांनीं आपणांस हा अमरसिंग वाईट रीतीनें वागवीत असल्याबद्दल लॉर्ड कॉर्नवालिस याजकडेस तक्रारी करून दाद

तली होती. व इंग्रजी राज्यव्यवस्थेचे आपण फार आभारी असून अझूनहि जगणार इत्यादि अतिशयोक्तिपूर्ण उद्गार सरभोजींनें काढिलेले आहेत.

अमरसिंगाची पदच्युति.

७ सरभोजीच्या दत्तविधानासंबंधानें शॉर्झची व्यक्त झालेली हार्दिक कळकळ आणि सरभोजीचा इंग्रज कंपनीशीं झालेला थोरपणाचा पत्रव्यवहार, या मानानें मद्रास सरकारचें या प्रसंगीचें वर्तन फारच कठोर व विदारक दिसतें. सरभोजी हा आपल्या जन्मदात्या पित्याचा एकुलता एकच पुत्र असल्यानें सन १७९३ मध्यें त्याचें दत्तविधान अयोग्य असल्याचें ठरविण्यांत आले होतें. त्यावेळीं तो स्वतः चांगला वयांत आलेला होता व त्याला दत्तक घेणारा तुळजाजी हा अत्यंत दुर्बळ झालेला होता. या समयास कांहीं गुह्य कारणांनीं मद्रास सरकारने त्यास अनुमति दिली. आपणांस मान्य असलेल्या ठरावाखालीं इंग्रजांनीं कांहीं लोभी व भित्र्या पंडितांना सही करावयास लावून अमरसिंगाला त्या लेखानें सन १७९६ मध्यें पदच्युत केलें व सरभोजीला राज्यावर बसविलें. राज्यारोहण आणि पदच्युति तत्काळ झाली तरीहि आनंद किंवा शोक या योगे प्रजा व्याप्त झाल्याचें चिन्ह जें अश्रुसंचन तें झाल्याचे दिसत नाहीं. कारण राजांची अदलाबदल झाल्यामुळे प्रजेला कधींहि कांहींच वाटत नसे. फक्त करवाढ झाली तरच तिची जाणीव प्रजेस होई. लॉर्ड व्हॅलेशियाच्या प्रवासवृत्तावरून असे दिसते कीं, यानंतर दोनच वर्षांनीं म्हणजे सन १७९८ मध्यें सरभोजीनें जसा खर्चासाठीं सालीना ठरीव रक्कम घेऊन राज्याचा राजीनामा दिला,

तसा राजीनामा रेसीडेंटाच्या इच्छेप्रमाणे अमरसिंगानें सन १७९६ मध्यें देण्याचें नाकारिल्यामुळें त्याची पदच्युति झाली. दत्तकाचा शास्त्रार्थ व अमरसिंगाची पदच्युति यांना संभवनीय मुख्य कारण काय होते हें यावरून लक्षांत येतें. सारांश, सरभोजी हा तुळजाजीचा दत्तक पुत्र असल्याबद्दलची योग्य पदवी त्यास प्राप्त झाली.

अमरसिंगाची योग्यता.

८ मेजर बसू यानीं The rise of the Christion power in India, vol 2 P.405 " या पुस्तकांत The life of General Sir Devid Baird " या ग्रंथांतील एक उतारा दिला आहे. त्यावरून अमरसिंग हा भला व मोठा कृपाळू होता असें दिसते. इंग्रज कंपनीशीं तो मोठा स्वामिनिष्ठ असे. कंपनीनें अनेक तहांच्या योगें तंजावरच्या राजांच्या मानेवरील जोखड जरी जड करून ठेविलें होते, तरीहि तें त्यानें उचललेच होतें. भल्या लठ्ठ वार्षिक नेमणुकी घेऊन राज्याचा त्याग करणे व ते राज्य इंग्रजी कंपनीस सोपणे ही कल्पना त्याला पटली नाही. यावरून तो मोठा तत्त्वनिष्ठ होता असें दिसते. वारंवार बदलणारी कंपनीचीं धोरणें व राज्याच्या जमाबंदीचें ओझें, यायोगें कोणीहि इतर अधिक कर्तृत्ववान् व्यक्ति राजपदावर आली असती तरी, तिनेहि अमरसिंगापेक्षां अधिक यशस्वी रीतीनें तंजावरचा राज्यकारभार चालविला असता असें वाटत नाहीं. सरकारी खजीन्यांतील शिल्लक राजाच्या खर्चापुरतीहि नसे, अशा परिस्थितींत दुसरा राजा तरी प्रजेसाठीं काय करूं शकला असता ? सरकारी कर वसूल करणाऱ्या अमंलदाराला पौरस्त्य प्रजा फार भीत असते. त्या भीतीपासून फक्त त्यानें प्रजेचें

संरक्षण केलें असते. प्रजेवर जुलूम करण्याचे--दडपशाही व अन्याय असे-दोन प्रकार असतात. आणि राजानें मुख्यतः याच प्रकारा-पासून प्रजेचें संरक्षण करावयाचें असतें. तंजावरच्या राजाचे सावकार व कंपनीचे दुभाषे यांचे जुलूम प्रजेवर होत होते. त्यावरून दडपशा-हीचा मुद्दा तंजावरच्या राजाच्या विरुद्ध जातो. परंतु शॉर्डीच्या संमतीनें केलेली न्यायदानाच्या पद्धतीची यथायोग्य योजना ही पदच्युत केलेल्या अमरसिंगाच्या शहाणपणाची उत्तम रीतीने पटणारी साक्ष होय. मजुरांच्या ओझ्यावरील कर निम्मे करणें व शेतें प्रत्यक्ष नांगर-णाराची मजुरी वाढविणें ( म्हणजे कुडीवरम् ) या परोपकारी वृत्ती-मुळे अमरसिंगाला लोकप्रियतेची आवड होती; व राज्याची कामधेनु जी प्रजा, ती चांगली व दुधाळ राहावी अशी त्याची कृति होती हे उघड दिसते.

# प्रकरण १० वें

## ( दुसरा ) सरभोजी सन १७९८ ते १८३३.
## आणि
## शिवाजी सन १८३३ ते १८५५.

### मुद्दे

१ इंग्रजी कंपनीचे तह व सरभोजीची राज्यनिवृत्ति.

२ इंग्रजी कंपनीचें दूरदर्शित्व व त्याची नैतिक योग्यता.

३ सरभोजीची संस्कृति.

४ सरभोजीनें केलेल्या सुधारणा.

५ सरभोजीचे गुण.

६ सरभोजीचा पुत्र शिवाजी.

७ तंजावरचें राज्य खालसा झाल्यावर तेथील राज्यव्यवस्था.

८ सभेचें अधिष्ठान.

**इंग्रजी कंपनीचे तह व सरभोजीची राज्य-निवृत्ति.**

१ तंजावरच्या राज्याची व्यवस्था आपण सुधारूं अशा अर्थाचें वचन, राज्यावर येण्यापूर्वीं सरभोजीनें दिलें असावें, असे सन १७९९ च्या तहाच्या प्राथमिक हकीकतीवरून दिसतें. तंजावर राज्यांत नोकरलोक लांच वगैरे स्वीकारीत असत. त्या कर्तव्यभ्रष्टतेची चौकशी करण्यासाठीं सन १७९८-९९ मध्यें इंग्रजीकंपनीनें एक समिति नेमिली होती. राज्यांत जुलूम-जबरदस्ती मात्र नव्हती. तथापि, राज्याची उत्कृष्ट व्यवस्था लागावी

या हेतूनें सालीना एक लक्ष पॅगोडा व जमाबंदीपैकीं एकपंचमांश इतकें उत्पन्न स्वीकारून सरभोजीनें तंजावरचें राज्य कंपनीच्या स्वाधीन केलें व तो स्वतः राज्याच्या दगदगींतून निवृत्त झाला. सन १७९२ मध्यें जो तह झाला होता त्यानें तंजावरच्या राजाची बहुतेक सत्ता व त्याचें उत्पन्न संपुष्टांतच आलें होतें. पण सरभोजीने वरप्रमाणें राज्यनिवृत्ति पतकरून त्या तहापुढें एक पाऊल टाकिलें. तो कायदेशिर वारस राजा ठरला असला तरी खरे सांगावयाचें म्हणजे तो नामधारीच राजा होता. त्याच ( ह्मणजे सन १७९२ ) सालांत झालेल्या दुसऱ्या एका तहानें तंजावरांतील किल्ला व जवळपासचा प्रदेश यांशिवाय बाकीच्या सर्व प्रदेशावरील स्वामित्व सरभोजी राजाने गमाविलें होतें. कायम जमाबंदी व न्यायदानपद्धति कंपनीनें स्थापन करावयाची होती. कंपनी जी जमाबंदी मुक्रर करील ती कधींहि फिरवूं नये असे ठरलें होते.

**इंग्रजी कंपनीचें दूरदर्शित्व व त्याची नैतिक योग्यता.**

२ सर्व गव्हर्नरजनरलामध्यें श्रेष्ठ जो लॉर्ड वेल्स्ली, तो यावेळीं कंपनीच्या राज्यव्यवस्थेचा मुख्य सूत्रधार होता; व अशा करड्या सत्ताधाऱ्याकडून वर सांगितल्यापेक्षा अधिक नरम व्यवस्थेच्या अटी ठरल्या असत्या असा तर्कसुद्धा करिता येत नाही. सारांश, अमरसिंगापासून तंजावरचें राज्य काढून तें सरभोजीला देण्यांत कांही विशेष कारण किंवा विशेष हेतु होता, असें स्पष्ट दिसते. याप्रकारें योजिलेल्या दीर्घकालीन शहाणपणाबद्दल कोणालाच संशय वाटत नाहीं. फक्त या शहाणपणाच्या नैतिक योग्यतेबद्दल प्रश्न उपस्थित होतो; परंतु स्वर्गप्राप्ति व राज्यप्राप्ति यांत खरें-

खरी जमीन अस्मानाचें अंतर शब्दश. असल्यानें त्यांच्या प्राप्तीचीं साधनेंहि तशींच भिन्न भिन्न व क्वचित परस्पर विरोधीहि असणारच. हिंदी लोकांचे लक्ष राज्यप्राप्तीपेक्षां स्वर्गप्राप्तीकडेच विशेष होते व आहेहि हे प्रसिद्धच आहे. परंतु परिणामाच्या योग्यतेवरून साधनांची नीतिमत्ता ठरविण्याच्या अनेक बाबतींपैकीं ही राज्यप्राप्तीची बाबत आहे असेच म्हणावे लागते. सरभोजीच्या प्रजेने अर्वाचीन काळ व अधिक कुशल राज्यकारभार अनुभविला यात संशय नाही. सैन्य अथवा पुरेसे द्रव्यबळ याच्या अभावीं सरभोजी राजा आपल्या राज्याचे संरक्षण करण्यास अथवा समान दर्जाच्या इतर संस्थानिकांकडून व मित्रांकडून मानमान्यता मिळविण्यास असमर्थ झाला होता. याचे तात्पर्य असे की, पदरी सैन्य नसल्यामुळे त्याला प्रजेचे संरक्षण करिता येईना, व खजान्यात पुरेशी संपत्ति नसल्यामुळें इतर संस्थानिक व मित्र त्याला मानसन्मान देईनात. प्रजेच्या सुस्थितीच्या वृद्धीसाठीहि सरभोजीला काही करिता आले नाही. खजीन्याची मत्ता व फौजेवरील सत्ता ही ज्याच्या आधीन असतात, तोच राज्य कारभाराबद्दल व प्रजेच्या सुस्थितीबद्दल जबाबदार असतो, हे उघड आहे. एकाकी झालेल्या तंजावरच्या राज्याला एकुणीसाव्या शतकात काहीं जीवितहेतु किंवा इतिकर्तव्यता राहिली नव्हती. तेथील राजे दुर्बळ व असहाय असे होते. त्यामुळें ते कर्नाटकाच्या नबाबाच्या राजकारणाला व इंग्रजीकंपनीच्या शक्तिमत्तेला सहज बळी पडले.

**सरभोजीची संस्कृति.**

३ सरभोजीनें आपले सर्व आयुष्य सुसंस्कृतीला वाहून आपला दरबार विद्वत्तेचें माहेरघर बनविला. सरभोजीचा शिक्षक एक मिशनरी शॉर्झ हा

होता, हें प्रसिद्धच आहे. या शार्झच्या सान्निध्यानें सरभोजीला पाश्चात्य शिक्षणाची गोडी लागली व हिंदी पंडितांच्या सान्निध्यामुळें पौरस्त्य शिक्षणाची आवड त्याला होतीच. शॉर्झचें एक संगमरवरी स्मारक या सरभोजीनें तंजावरामध्यें खिस्तीदेवळा-जवळच उभारिलेले आहे. तो इंग्रजी भाषा उत्तम प्रकारें बोलत व लिहीत असे. त्यानेंच तंजावरात एक उत्तम पुस्तकालय स्थापन केले असून त्यांत छापील व हस्तलिखित अशा विविध भाषांतील ग्रंथाचा संग्रह उत्कृष्ट आहे. डॉ. बार्नेल याने येथील पुस्तकांची एक सूचि लिहिली आहे. तीवरून असें दिसतें कीं, हे पुस्तकालय अनेक नामांकित व विस्तीर्ण पुस्तकालयापैकी एक असून यांत बावीस हजार ग्रंथाचा संग्रह आहे. त्यांतील संख्याधिक्य संस्कृत ग्रंथांचेच आहे. तेथें वेदान्त, व्याकरण, काव्य, गायन, नृत्य, शिल्पकला, औषधी, खगोल इत्यादि अनेक विषयांवरील ग्रंथांचा संग्रह आहे. या पुस्तका-लयात ताडपत्रावरील ग्रंथाचाहि संग्रह चांगलाच आहे. हे ग्रंथ नायक-राजांच्याहि पूर्वीचे आहेत. परंतु त्यातील बरेच ग्रंथ नायक व मराटे राजे यांच्याहि काळचे असावेत असें दिसतें. औषधोपचारांसंबंधींची माहिती जमा करून ती सरभोजीच्या आज्ञेने पुढील पिढीच्या हिता-साठीं व्यवस्थित रीतीनें लिहून जतन करून ठेविली आहे.

**सरभोजीनें केलेल्या सुधारणा.**

४ सरभोजीने एक लहानसे संग्रहस्थानहि स्थापिले, जुनी नाणी जमविलीं व त्याकाळी आश्चर्यकारक वाटत असलेला छापखानाहि सुरू केला. या छापखान्यांत देवनागरी खिळे जुळविता येत असल्यानें त्या प्रकाराचा तो पहिलाच छापखाना होय. जेते या

नात्यानें मराठ्यांनीं दक्षिण हिंदुस्थानांत प्रवेश केल्यावर स्वतःबरोबर देवनागरी लिपी नेली असावी. पुढें या देवनागरी लिपीनें तिकडील ग्रंथलिपीहि काबीज केली. तंजावर येथील पुस्तकालयांत अलीकडेस सांपडलेल्या शिवभारत या पोथीच्या नकलेसंबंधीं असा तर्क वाहतो कीं, ती सन १७९८ नंतर केव्हां तरी झाली असावी. परंतु ही पोथी नक्कल नसून अस्सलच असली तर ती सन १७९८ नंतरच केव्हां तरी रचिली असावी. या पोथीच्याच आधारावर प्रचलित शिवजन्म मिति बदलण्याचे प्रयत्न सुरू आहेत. परंतु अस्सल पोथी प्राप्त होईपर्यंत हे प्रयत्न सिद्धिस जातील असे दिसत नाही. बाकी कांहींहि असलें तरी सदर पोथीचा कवि शिवाजीच्या दरबारांत असून त्यानें आपला ग्रंथ शिवाजीच्या सांगण्यावरूनच लिहिला आहे, हें पोथींतील वर्णन काव्यमय असल्याने अनैतिहासिक होय. कारण मराठी दरबारांत व पेशवाईमध्येंहि दरबारांत विद्वान् ठेविण्याचा प्रघात दिसत नाहीं. असो. पवनचक्की, विद्युत्‌यंत्र, मनुष्याचा हस्तीदंती सांगाडा, राजमहालांत उघडलेली वेधशाळा, अशा नवीन नवीन कृतीच्या योगे सरभोजीची संशोधकबुद्धि प्रत्ययास येते. त्याला शिल्पकलेचेंहि थोडेसे ज्ञान होतें, व रंगरोगणाच्या कलेचाहि तो ज्ञाता होता. तंजावरच्या मराठी राजांच्या राजमहालांतील दिवाणखाना उत्कृष्ट तैलचित्रांनीं शृंगारिलेला आहे. याशिवाय तेथील राजमहालांत व मद्रास येथील संग्रहालयांतील भिंतीवरून कांहीं मराठी राजाराणींची व त्यांच्या प्रधानांचीं तैलचित्रें काढिलेलीं आहेत. त्यायोगे तीं तीं स्थानें फारच शोभायमान दिसतात व चित्रकलेचा उत्कृष्ट नमुना म्हणूनहि दृग्गोचर होतो. तेथील पुस्तकालयांत व इतर इमारतींत कांहीं अनर्घ्य असे रंगी छाप-

कामाचे नमुने आजहि दिसतात. सालुवनायकनूपट्टनम् येथील आठ मजली इमारतीचा मनोरा आजसुद्धां सरभोजीच्या शिल्पकलेच्या आवडीचें प्रत्यंतर दर्शवितो. इंग्रजांनीं सन १८१५ मध्यें नेपोलियनवर विजय संपादन केला, त्या आनंदप्रदर्शनार्थ स्मृतिचिन्ह म्हणून सरभोजीनें वरील मनोरा उभारिलेला आहे. सरभोजीला राजपदप्राप्ति इंग्रजांच्या कृपेनें झाली म्हणून इंग्रजांचे आभारप्रदर्शनार्थ त्यानें सेतुभवसत्रम् व पदुकोट्टाई येथें चुनाविटांचे दोन स्तंभ उभारिण्यास सुरवात केली होती, परंतु हीं कामें पूर्ण होण्यापूर्वींच त्याला राज्याचा त्याग करावा लागला.

**सरभोजीचे गुण.**

५ सरभोजी हा चागला देखणा होता. यथाप्रमाण अशी त्याची शरीरयष्टी होती व संस्कृतीची आवड त्याला फार होती. या व अशाच इतर कारणांमुळें तो प्रजेला फार प्रिय असे. त्याला उत्कृष्ट घोड्यांचा फार नाद असे. त्याच्या संग्रहींहि अनेक उत्तमोत्तम अश्व होते. सरभोजी हा अचुक नेम मारणारा होता असें बिशप हेबर म्हणतो. खिस्ती लोकाना तंजावरच्या दरबारांत चागल्या नोकऱ्या मिळत असल्यामुळें हा बिशप सरभोजीची स्तुति करितो. सरभोजीचा उत्तम स्वभाव व सभ्य वर्तनक्रम यासंबंधीं लॉर्ड व्हॅलेन्शिया हा त्याची प्रशंसा करितो. वाद्यें व इतर नाजूक कला यांना उत्तेजन देण्यांत सरभोजी हा आदर्श असा पौरस्त्य राजा होऊन गेला. याशिवाय त्याचा धर्मादाय मोठा औदार्यपूर्ण होता व गरीबांना अन्नदान करण्यांत तो तत्पर असे. ओरात्तनाद येथील शिलालेखांत असलेल्या (दोन) संस्कृत श्लोकांवरून त्याचें औदार्य असें दिसतें कीं, त्यानें प्रत्येक वैदिक

यज्ञाच्या सांगतेला साहाय्य केले होतें. त्यांनें केलेल्या दानधर्माची माहिती परिशिष्ट ८ मध्ये दिली आहे.

**सरभोजीचा पुत्र शिवाजी.**

६ सरभोजीच्या मृत्युसमयी शिवाजी नावाचा त्याचा एकच पुत्र जीवंत होता. हा शिवाजी नेहमी आजारी असल्याने क्षणिप्रकृतीचा झाला होता, असे हेबर म्हणतो. शारीरिक किंवा बौद्धिक उन्नति अशी त्याची कधीच झाली नाही. या शिवाजीच्या कारकीर्दीत तयार झालेली कांहीं नाटके व काही स्तुतिविषयक काव्ये मात्र अस्तित्वात आहेत. याने वीस बायका केल्या होत्या. तो सन १८५५ मध्यें निवर्तला तेव्हा त्याला फक्त दोनच कन्या होत्या. तंजावरचा हल्लींचा राजा हा या शिवाजीच्या दत्तक पुत्राचा वंशज होय. ( स. १९३३ )

**तंजावरचें राज्य खालसा झाल्यावर तेथील स्वस्थता.**

७ राजा ही नामधारी पदवी सरभोच्या मृत्युनंतर लोप पावली. सरभोजीला शिवाजीशिवाय वारस पुत्र नव्हता. हिंदुस्थानांतील संस्थाने नामशेष करण्याच्या डलहौसीच्या कठोर राजकारणाने राजाविषयक मानसन्मान व तसेंच इतर सर्व प्रकार एकदम लुप्त केले. प्रीव्हीकौन्सिलचा एक ठराव होऊन त्यायोगें खालसा संस्थानांतील सर्व धनदौलत जप्त करण्यांत आली. परंतु हा ठराव स्पष्ट व उघडपणें अन्याय्य होता. या ठरावानें इंग्रजांनी तंजावरच्या राजाशी अन्याय्य वर्तन केल्याचें किंचित् दुःखकारक स्मरण राहिलें आहे. या ठरावामागून राजाची खाजगी मालमत्ता राजाच्याच पण योग्य अशा निकटच्या

वारसास देण्यांत आली. याप्रमाणें ज्या तंजावरच्या राजाला ' राजा व मित्र ' म्हणून लॉर्ड क्लाइव्ह हा संबोधीत असे, तो तंजावरचा राजा आतां ईस्टइंडिया कंपनीच्या प्रजाजनांपैकी एक प्रजा झाला. तेथील त्यावेळच्या रेसीडेंटानें असें म्हटले आहे कीं, ' तंजावरचें राज्य खालसा केल्याचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला तेव्हा; त्यासंबंधीं सार्वजनिक मतप्रदर्शन असें मुळींच झालें नाहीं; त्यामुळे सार्वजनिक शांततेच्या संरक्षणासाठीं साधारण पोलिसाच्या मदतीचीसुद्धा मला आवश्यकता भासली नाही. ' पदच्युत झालेल्या राजाबद्दल प्रजेच्या मनांत मुळींच प्रेम नव्हते काय ? अथवा त्या प्रजेला आपली नापसंती व्यक्त करण्याचे यत्किंचित्‌हि धैर्य नाही काय ? संस्थानांतील प्रजेची राजनिष्ठा व शांत मनोवृत्ति यांचे यथातथ्य वर्णन कोणीहि खरा मानसशास्त्रवेत्ताच करूं शकेल. परंतु शांततेचें संरक्षण करण्यास शांततावाद्यालाहि सामर्थ्याची आवश्यकताच असते. तंजावरची प्रजा पन्नासाहून कांही अधिक वर्षे इंग्रजांकडेस, ते राज्यकर्तेच असावेत या भावनेने पाहत होती, व इंग्रजांनी त्या प्रजेला आधुनिक पद्धतीनेंच वागविले होते.

**सत्तेचें अधिष्ठान.**

८ तंजावरावर राज्य करीत असलेली मराठीसत्ता याप्रमाणे नष्ट झाली. नायक व चोल या राज्यकर्त्यांच्या मार्गालाच हे मराठी राजेहि लागले. या राजघराण्यानें आपलें सामर्थ्य गमावतांच आपापल्या सत्तेसहि ते मुकले. ज्या संस्थानाचें लष्करीसामर्थ्य बलवत्तर असते, त्याच्याच सत्तेचें अधिष्ठानहि मजबूत असतें, हें तत्त्व कितीहि विरुद्ध युक्तिवाद केला तरी अमान्य करणें शक्य नाहीं. कारण नुसत्या गोडीगुला-

बीनें किंवा बा-बेटा करून प्रजेवर कोणीहि राज्य करण्यास समर्थ होत नाहीं; व गवतांचें तट रचून शत्रूंच्या माऱ्यापासून आपल्या राजधानीचें संरक्षण करूं शकत नाहीं. तंजावरचें संस्थान आज जर अस्तित्वांत असते तर राष्ट्रैक्याच्या चालत्या गाड्यांत त्याची आणखी एक खीळ अधिक बसली असती, इतकेंच.

Additional authorities.

1 Hickey's Tanjore Maratha Principality 1894
2 Bishop Hiber: Travels III P 456.
3 Lord Valentia Travels 1 Ch. 7.
4 M. E. R 1924 P 119-122.

---



श्री. महाराणी कामाक्षीबाईसाहेब

( तंजावरचे शेवटचे राजे शिवाजीमहाराज यांच्या पत्नी. )

प्रकरण ११ वें

## राज्यव्यवस्था.

### मुद्दे.

१ राजाचे अधिकार.
२ कारभारी मंडळ.
३ उत्पन्न व अधिकारी मंडळ.
४ खोदीव लेख.
५ प्रांतांची वांटणी.
६ कामांची सर्वसाधारण वांटणी.
७ गांवचे लोकनियुक्त कामगार.
८ जमाबंदीची वसूली.
९ दवाखान्यांची अव्यवस्था.
१० न्यायदान.
११ दिवाणी न्यायाची विशिष्ट पद्धति
१२ पंचांचे अधिकार.
१३ न्यायदानांत दिव्याचा उपयोग.
१४ फौजदारी न्याय.

राजाचे अधिकार.

१ संस्थानांत राजा हा सर्वाधिकारी असे. सर्व संस्थान व त्याचीं सर्व मूलस्थानें यावर राजाचीच सत्ता असे. प्रधान हे त्याचे नोकर समजले जात. शॉर्ट लिहितो कीं, " अज्ञान जनसमुदायाच्या मतानें तंजावरचा राजा हा स्वतःच्या अनियंत्रित सत्तेने राज्य चालविणारा आहे, परंतु खरें

पाहतां तो राजा या पदापेक्षां गुलाम याच पदाचा अधिकारी आहे." त्याचीं खाजगी कृत्यें व त्याच्या शारीरिक आणि बौद्धिक करमणुकी यामुळें राज्यविषयक कामें करण्यास त्यास फारच थोडा वेळ मिळतो. धर्मगुरु व मिशनरी यांच्या धर्मभोळेपणामुळे त्याला राजवाड्यांतून बाहेर पडतांच येत नसे. कर्तृत्ववान् राजाच्या कारकीर्दीमध्येंसुद्धा संस्थानविषयक पुष्कळसे काम त्याच्या प्रधानावर व स्थानिक अंमलदारावरच पडत असे.

कारभारी मंडळ.

२ राज्याच्या कारभारीमंडळांत सुशिक्षित उच्च जातीच्या प्रधानाचाच भरणा असे. कित्येक प्रसंगीं एकादा राजपुत्र, राजबंधु किंवा राजाचा एकादा आप्त यास कारभारीमंडळांत बसावयास बोलावित असत. प्रधानाच्या नेमणुकी पिढीजात होत असत, अशी अनेक उदाहरणे आहेत. तंजावरच्या मराठी राज्यात आरंभापासून तुकोजीच्या कारकीर्दीपर्यंत राजाच्या सल्लागाराचे काम गंगाधर मखीच्या वंशजांनीच केलेले आहे. असे राज्यविषय काम एकाद्या कुटुंबाचे वंशपरंपरागत वतनी ठरल्याने त्याच्या लायकीचा प्रश्नच उत्पन्न होणें शक्य नाही. मंत्री या पदाचे काम कित्येक वेळा दळवी या पदांतहि मिळविले जात असें. पट्टुकोट्टाईच्या शिलालेखांतील गंगाधराचा पुत्र बावाजी किंवा लोकमताचा बोलेजी, हा मंत्री व दळवी या दोनहि पदांचा अधिकारी होता. दळवी हाच सेनापति असे. आनंदराय दळवीस एकवेळीं पेशवा हें पद प्राप्त झालें होतें. हा दळवी या पदावर होता व यानेंच रामनदच्या युद्धांत पराक्रम गाजविला होता. आरंभी हा धर्माधिकारी होता व नंतर दळवी झाला. याचा बाप व आजा हे

प्रधान पदावर होते, त्यामुळे त्या पदाची पिढीजात मालकी त्याचीच होती. त्याचा काका त्र्यंबक मरवी याच्या पश्चात् हा आनंदराय मरवी मंत्री या पदाचा अधिकारी झाला; व त्याने शहाजी, सरभोजी व तुकोजी; अशा तीन राजांच्या कारकीर्दीत आपल्या पदाची कामे केली.

उत्पन्न व अधिकारी-मंडळ.

३ राज्याच्या उत्पन्नाची मुख्य बाब जमाबंदी ही असल्याने प्रधान किंवा दिवाण हा दळवी पदाच्या खालचाच म्हणजे दुसरा अंमलदार असे. मद्रास येथील शिलालेखासंबंधींच्या सन १९११ च्या अहवालावरून असे दिसते की, सुभेदार राघो पंडित हा सरभोजीचा दिवाण असून, आनंदराय हा दळवी व मंत्री पदाधिष्ठित होता. पुढच्या काळात डबीर पंडितांची नेमणूक दिवाण या पदावर झाली व त्यांनी जमाबंदीचे काम फारच उत्कृष्ट रीतीनें केले. याशिवाय राजाच्या खाजगीमध्यें कोपाधिकारी, संप्रति, ( समीपवर्ती ? ) धर्माधिकारी व सरखेल या हुद्यांचे कामगाराहे होते. कोपाधिकाऱ्याच्या हाताखाली हिशेब ठेविण्याच्या कामावर अनेक मदतनीस (मुत्सद्दी) व नत्तुल्लनक्कु या हुद्याचे नोकर असत. धर्मादायाच्या कामाकडेस तंजावरच्या संस्थानाने पुष्कळ व्यवस्था केल्याने त्या कामासाठी एक स्वतंत्र दिवाणाच्या नेमणुकीची आवश्यकता होती. सुभेदार अय्यावय्यन हा धर्माधिकारी, सरखेल व दिवाण अशा पदावर लागोपाठ चढत गेला होता. सन १७९८ मध्यें जें एक चौकशी मंडळ नेमिले होते, त्याच्या सूचनेप्रमाणें प्रतापानें सरखेल हें नवीन पद उत्पन्न केलें. तथापि, हे पद सरभोजीच्या कारकीर्दीमध्यें अस्तित्वांत आलें,

अशी समजूत प्रचलित आहे, व ती फार दृढ आहे. याशिवाय घनश्याम पंडित हा स्वतःस तुकोजीचा गृहामात्य म्हणवीत असून खाजगी कारभाऱ्याला सरखेल ही निराळी पदवी आहेच. पुढच्या काळांत सरखेल शिवराव हाच अमरसिंगाचा मुख्य मंत्रसचिव होता. चोलांच्या कारकीर्दींत तिरुपंथिरावलाई असे एक महत्वाचें अधिकारपद होतें. त्याला समानार्थक असे रायासम हें पद निर्माण केलें. परन्तु हें पद स्वतंत्र होतें कीं सरखेलांतच समाविष्ट झालें होतें, हें मात्र समजत नाही. अष्टप्रधान या संस्थेत पुरोहित हे एक पद होते. या प्रकारच्या मुख्य कारभारी मंडळाशिवाय एक मुख्य न्यायाधीश व अमील्दार हीं दोन पदे राजधानीमध्ये होती. किल्ला हा किल्लेदाराच्या ताब्यांत असून तो किल्लेदारहि एक महत्त्वाचा अंमलदारच होता. ठिकठिकाणच्या बातम्या राजास कळविण्यासाठीं वार्ताहरहि होते. यावरून वाचकांच्या हें लक्षांत येईल कीं, तंजावरास राज्य व खाजगी, असे दोन भाग असून, दोहींकडेस पृथक् पृथक् कामगार होते. १ मंत्री, १ पेशवा, १ धर्माधिकारी, १ दळ्वी, १ सेनापति, १ ते ८ अष्टप्रधान, १ प्रधान, १ दिवाण, १ धर्माधिकारी दिवाण, १ सुभेदार, १ सरखेल किंवा रायासम्, १ सुभेदार, १ धर्माधिकारी, १ किल्लेदार, १ वार्ताहर, असे बावीस अंमलदार राज्यांत असून १ गृहामात्य, १ संप्रति, १ धर्माधिकारी, १ सरखेल, ३ कोणाधिकारी व दोन फडतनीस. असे सात अंमलदार खाजगींत होते. कित्येकवेळां अनेक पदावर एकच इसम नेमिलेला असे.

खोदीव लेख

४ प्राचीन राजकारणी व्यवस्थांचा निर्देश कोरीव लेखांतून होऊं लागला. सन १९२०-२१ च्या क्रमांक १४ च्या ताम्रपत्रांत राजेंद्रसोल्वलनादूच्या पंबाक्लनादूचा उल्लेख आहे. सन १७६९ च्या एका ताम्रपत्रांत जयकोंडानाडु प्रांतांतील पोटमुरकुर्रम् परगण्यांतील पप्पाकुडीबाडु तालुक्यांतील सोळा महालांपैकीं ४५ राजगोपालम्चक्रम्च्या देणगीचा उल्लेख आहे. सन १९२०-२१ च्या क्रमांक १५ च्या ताम्रपत्रांत प्रातांची विभागणी हांच दिलेली आहे. तोडामन् येथील शके १६४७ ( सन १७२५ ) च्या ताम्रपत्रांत गांव, मगनम्, नाडु, कुर्रम्, पत्तैया म्हणजे पट्टु असाच क्रम दिलेला आहे.

प्रांतांची वांटणी.

५ परंतु राजकीय व्यवस्थेत प्रांतांचा वगैरे जुनाच क्रम स्वीकारिलेला दिसत नाहीं. सर्व राज्य अनेक सुभ्याच्या मर्यादेत विभागिले असून प्रत्येक सुभ्यावर एक सुभेदार नेमिलेला असे. पट्टुकोट्टाई, मन्नारगुडी, मायावरम्, कुंभकोणम् व तिरुवाडी अशा प्रत्येक ठिकाणी एक एक सुभा असे. तंजावरचे संस्थान व ( अंतर्गीच्या सरहद्दीवरील व्यवस्थेशिवायचा ) अर्वाचीन तंजावरप्रांत यांच्या सरहद्दीवरील व्यवस्थेत कांहींच फरक नाहीं. सुभ्यापेक्षां लहान प्रांताला सिमाई ( तालुका ) असें म्हणत. सन १९१८ मध्ये सांपडलेल्या क्रमांक ४२० च्या ताम्रपत्रांत शके १६९२ ( स. १७७० ) त्या श्रीगालीसिमाईचा मुख्याधिकारी ( मामलतदार ) काडेरिआर असल्याचा उल्लेख आहे. सन १९११ मध्यें सांपडलेल्या क्रमांक २७३ च्या ताम्रपत्रांत चकडूच्या सीमाईमध्यें

कावेरीपट्टणम् मधील मगनमचा समावेश झाला असल्याचा उल्लेख आहे. सारांश, तंजावर येथें मराठी राजांच्या कारकीर्दीमध्यें गाव, मगनम् ( महाल ), सिमाई ( तालुका ) व सुभा असे संस्थानाचे प्रादेशिक विभाग होते असें दिसतें. एकाद्या गांवच्या लोकांनीं जमाबंदी न दिली तर त्यांना कारागारांत घालण्याचा अधिकार अमीनाला असे. त्या अमीनाच्या साहाय्यानें सुभेदार हा प्रांतांतील जमाबंदी वसूल करी. या सुभेदाराला जमाबंदी वसूल करण्याचा अधिकार असून दिवाणी व फौजदारी सत्ताहि असत. संबानकोंइलचा सुभेदार अय्यावय्यान याचा उल्लेख हवालदार थंडवरय मुदाली याच्यासह सेबानकोंइल येथलि कोरीव लेखांत आला आहे. त्यावरून दिसण्याला तरी मराठी सत्ता फौजेच्या जोरावर अधिष्ठित होती, असा सारांश काढिता येतो.

**कामांची सर्वसाधारण वटांणी.**

६ अमलदारांची सर्वसाधारण सत्ता प्रत्येक खेड्यावर असे व मध्यवर्ती सत्तेशी आपला कांहीं संबंध नाहीं अशा बेपरवाईनें ते खेडें आपल्या मुख्याच्या तंत्रानें वागत असे. अमल्दारांना कांहीं एक कर भरल्याशिवाय नोकरीच्या निमित्तानें जमिनी मिळत. प्रत्येक गांवांत नोकरांचा भरणा नेमिलेला असे. त्यांत कर्नम्, पाहरेकरी, पाणीवाला, घरकाम करणारा, सुतार, न्हावी, परीट, ( जमिनीचा भोगवटा अनुभविणारा किंवा पीकांत ठरीव हिस्सा घेणारा ) शेतकरी इत्यादि इतर लोकांचा समावेश असे. प्रत्येक गांवच्या उत्पन्नातून गरीब लोकांना व मंदिरांना धर्मादाय देण्याचा सांप्रदाय असे. गांवांतील सार्वजनिक दुरुस्ती व उत्सव हे गांवच्या उत्पन्नांतूनच होत असत.

**गांवचे लोकनियुक्त कामगार.**

७ सर्व हक्कदारांचे हक्क व भाग यांचा दाखला त्या गांवचा अंमलदार लिहून ठेवीत असे व त्याला नत्तुक्क-नक्कु असें म्हणत. गांवाचे नत्तुवर म्हणजे जमिनीवरचा मालकीहक्क सांगणारे लोक. त्याना खोदीव लेखांतून महाजन म्हटलेलें दिसतें. आजसुद्धां तंजावर प्रांतांत लग्नप्रसंगीं संभावनेच्या रूपानें त्यास कांहीं तरी मिळण्याचा त्याचा हक्क आहे. जमिनीच्या उत्पन्नाच्या मिरासदारीची वाटणी ठरविणें व अशाच प्रकारचा इतर अधिकार मुक्रर करणे, ही सत्ता या लोकांची असून ते पंचायतीसाठीं एकत्र जमा होतात. नत्तुक्कर्नम् या समुदायावर उपर्युक्त मिरासदाराचा पूर्ण ताबा असे. यासंबंधीचा हिशेब व त्याची नक्कल अशा दोन प्रती गांवचा सरकारी अंमलदार महालकरी ( मगनम् ) अथवा सुभा ठेवीत असे.

**जमाबंदीची वसूली.**

८ गांवची जमाबंदी वसूल करण्याचा अधिकार प्रस्तुतकाळीं मुनसफास आहे. परंतु हा अधिकार सन १८३६ सालीं मुनसफास दिला. सन १८१६ पासून गांवच्या मुनसफाच्या ताब्यांत कांहीं पोलिस असत व त्यास बारीकसारीक बाबतींत न्याय देण्याचेंहि अधिकार असत. जेव्हां इंग्रजानीं तंजावर हस्तगत केलें तेव्हां मात्र गांवड्यांतून सरकारी हित पाहणारा कोणीहि अंमलदार नव्हता. सन १७९८ मध्यें जें एक चौकशीमंडळ नेमिलें होतें त्याचीहि अशीच तक्रार आहे. प्रत्येक खेड्यांत मध्यवर्ती सत्ता कोणासच नसे.

**दप्तरांची अव्यवस्था.**

९ प्रतापसिंगाच्यापूर्वी ( म्हणजे सन १७३९ पूर्वी ) न्यायदानाची काय पद्धति असे ? या संबंधी खात्रीलायक माहिती अशी कांहींच नाहीं· कर्नाटकाच्या नबाबानें तंजावरचा कबजा घेतला तेव्हां किल्ल्यांतील सर्व दप्तरखाना तेथून दुसरीकडेस नेऊन त्यापैकी कांहीं दप्तरांचा नाशहि केला.

**न्यायदान.**

१० बार्थालोम्यू म्हणतो की, 'तंजावर व त्रिचनापल्ली येथील न्यायदानाची पद्धति न्यायाधीशांच्या मुक्कामावर अवलंबून असे; परंतु यासंबंधी प्रमाण असे कांहीं उपलब्ध नाही. पूर्वकालीन न्यायदान स्थानिकच असावें. मागाहून फक्त फेरचौकशीचा अधिकार ( प्रजेस ) देण्यांत आला असावा असें वाटते.

**दिवाणी न्यायाची विशिष्ट पद्धति.**

११ दिवाणी न्यायाधीशाची नेमणूक प्रथम प्रतापसिंहाने केली. त्याला दरमहा तीस पागोडा पगार असे. त्याच्या हाताखाली ल्हानशी कचेरी असे, व त्या कचेरींतील कारकुनानी पैसे वसूल करण्याचे हुकुम नोंधावयाचे असत. या न्यायाधीशांवर फेर तपासणीअर्ज ( Appeal ) फक्त राजाकडेसच होत असत. व राजाहि ते काम सरखेलाकडेस सोपीत असे. न्यायाची विक्री निर्लज्जपणाने होत असे; असे शोर्भ म्हणतो व त्याच्याच सूचनेवरून त्या पद्धतींत सुधारणा करण्यात आली. अमरसिंगाने एक लहानसे मंडळ स्थापन केलें. त्या मंडळांत एक अध्यक्ष व चार न्यायाधीश असत. प्रत्येक जातीचे कांहीं पंचहि असत. परंतु जर पक्षकार पंचाकडे न जातां

परभारें सरकारकडेसच आले, तर अशा कामाचा विचार करण्यासाठीं न्यायाची कचेरी दररोज भरत असे. न्यायाधीश अथवा मध्यस्थपंच यांना दिल्या जाणाऱ्या कोणत्याहि देणगीची लेखी प्रसिद्धी अगदीं जाहीर रीतीनें होऊन त्या लेखाखालीं सह्या होत असत अशा न्यायाधीशांनीं केलेला कोणताहि न्याय नाकारण्याचा अधिकार राजास असे. पैशासंबंधीच्या दाव्यांत सरकारी कर शेंकडा पांच टक्के असे. ज्या मालमत्तेबद्दल दावा असे तीबद्दल १२० चक्रमूपर्यंत दंड वसूल केला जात असे. परंतु मोठ्या दुःखानें नमूद करणें भाग पडते की, व्यवस्थित रीतीनें न्याय करण्याच्या पद्धतीतहि राजाच्या मेहेरबानींतील व्यक्ती अथवा सावकार एकाद्या खटल्यांत पक्षकार असल्यास त्यासच अनुकूल असा न्याय होत असे.

**पंचांचे अधिकार.**

१२ तंजावर या राजधानीपासून दूर अंतरावर असलेल्या खेडे गांवापर्यंत न्यायाचे खटले पंचांच्या मध्यस्थीनें निकाली लागत असत. जर तो निकाल पक्षकार मान्य करीत नसले तर पंचांची नेमणूक सुभेदार करी. पंचाइतीनें केलेल्या निकालावरहि दाद मागावयाची असल्यास ती राजाकडेसच मागता येत असे. महिन्याच्या कामाचें टाचण राजाकडेस पाठवीत असत व प्रसंगविशेषीं एकादा निकाल राजा फिरवीत असे. पंचांनीं न्याय करण्याची पद्धति एकंदरीनें पाहतां कमी खर्चाची व सत्वर निकाल होण्याची असे. इंग्रजी कायदा व न्याय यांमध्यें पुष्कळ गुण असले तरी त्या

पद्धतीमुळें मनस्वी खर्च व पुष्कळसा कालक्षेप होऊन प्रत्येक प्रसं
काळजीचे डोंगर पक्षकारावर निष्कारण येऊन पडतात.

न्यायदानांत दिव्या-
चा उपयोग.

१३ जमिनीच्या खटल्यांत दारुण दिव्य करण्याची पद्धति अग
अलीकडे अलीकडे म्हणजे दुसऱ्या सरभो
पर्यंतहि ( सन १७९८ ते १८३३ ) प्रच
रांत असल्याचे दिसतें. आरोपी इसमाने उकळत्या तुपात हाता
पंजा घातला असतांहि तो न भाजला तरच त्या आरोप्याचे विधा
सत्य मानीत. आता मात्र अशा तऱ्हेने सृष्टिनियमाजवळ न्या
मागण्याची पद्धति नामशेष झाली आहे.

फौजदारी न्याय.

१४ फौजदारी खटल्याच्या न्यायपद्धतीबद्दल मात्र सन १७९
मध्यें नेमिलेल्या चौकशी समितीनें स्तु
केली आहे. प्राणान्ताची शिक्षा क्वचित
फर्माविण्यात येई. फौजदारी कामांतील मुख्य व अंतिम सत्ता प्रत्य
राजाचीच असे. व शास्त्रीमंडळाने केलेला न्याय विशेष चौकशीनंत
राजा फिरवीतहि असे. खेडेगावांतील नान्य गृहस्थ किरकोळ कामांच
निकाल करून आपल्याच स्वाधीन कायदा असल्याचें दर्शवीत,
याप्रकारें जरब बसवीत. त्यावेळच्या ओबडधोबड व झटपट न्याय
दानाच्या पद्धतीशिवाय बाकी स्थानिक न्यायदानाच्या पद्धतीं
अनुकरण इंग्रजांनीहि करावें. खेड्यांतील कवलकर अथवा जागल
हा आजच्या पोलिसाचे कर्तव्य करीत असे. मध्यवर्ती सत्ता दुर्ब
होतांच हे जागले वगैरे लोक त्या त्या खेड्यांना अरिष्टरूप झाले
लोकांकडून धाकदपटशहाने द्रव्य उकळूं लागले. कवलकरांच
पद्धति इंग्रजसरकारनें सन १८१४ मध्यें बंद केली.

# प्रकरण १२ वें.

## भूतदया व धर्मसहिष्णुता.

---

### मुद्दे.

१ राजाची कर्तव्ये व विद्वत्परामर्ष.
२ तंजावर येथील सरकारी व खाजगी पुस्तकालयें.
३ धार्मिक सहनशीलता व मिशनरीचे वर्चस्व.
४ शॉर्झ याचें कर्तृत्व.
५ ब्राह्मणांविषयीं शॉर्झचा अभिप्राय.
६ सरभोजीची पूज्यबुद्धि.
७ शॉर्झची रोजनिशी व त्याचे लेख.
८ धर्मांतर केल्यावरहि मूळच्या भावना कायम.

**राजाचीं कर्तव्यें व विद्वत्परामर्ष.**

१ राज्यात शांतता ठेविणे हे राजाचे आद्यकर्तव्य होय. त्यानंतरचे म्हणजे दुसरे कर्तव्य दानधर्म सुरू ठेविणें व वृद्धिंगत करणे हे होय. जुनी मंदिरें दुरुस्त करणे व नवीन बांधणे, तळी खोदणे, धर्मशाळा उभारणें ही कृत्यें परोपकाराची समजतात. फ्रेंचांनी कारिकाल व इंग्रजांना नागोर याप्रमाणे पृथक् पृथक् बंदरे दिली; तेव्हां तंजावरच्या राजांनी मुद्दाम त्यास कळविले होते की, मंदिरें, ब्राह्मण, धर्मशाळा व तळी यांस मुक्रर करून दिलेल्या देणग्यामध्ये त्या त्या परदेशस्थ अधिपतींनी हात घालूं नये. तत्कालीन एका पत्रावरून दिसतें कीं, ब्राह्मणांच्या खेड्यांत सरकारनें एकहि इमारत बांधूं नये

व मंदिर अथवा अग्रहार यांच्या जवळ युरोपियनानें राहूं नये असें ठरलें होतें. ब्राह्मणांना त्याच्या विद्वत्तेबद्दल, वादननैपुण्याबद्दल, ज्योतिषज्ञानाबद्दल, अश्विनीकुमारांच्या विद्येतील पारंगततेबद्दल किंवा इतर कलाभिज्ञतेबद्दल तंजावरच्या जुन्या मराठी राजांनी कित्येक अग्रहार दिलेले आहेत. गरीब लोकांच्या भोजनासाठीं अनेक धर्मशाळा किंवा वाड्या बांधिल्या असून त्यांच्या खर्चासाठी कांहीं जमिनी लावून दिल्या होत्या. मृत राण्यांच्या स्मरणार्थ कित्येक छत्र्या उभारिल्या होत्या. मानमेलकुडी आणि निदमंगलम् ह्या छत्र्या प्रतापानें बांधिल्या होत्या. मिनपेसांड येथें तुळजाजीने देरासरम् अय्याछत्रम् व राजमाताम् या छत्र्या स्थापिल्या आहेत. ओरात्तनद येथें सरभोजीनें छत्र्यांच्या खर्चासाठीं सालीना तेहतीस हजार उत्पन्न नेमून दिलें होते, आणि तंजावरप्रांतांतील गरीबांसाठीं कांहीं दीनगृहे शिवाजीनें तंजावरांत सुरू केली होतीं. छत्रीमध्ये बसून खाणे याला 'इन्फ्राडिक' असें समजत असल्यामुळें खरोखरीचेंच तें दीनगृहच होय. मद्रासकडील उष्ण प्रदेशांतील विश्रांतिगृहांतसुद्धां विहीर व लहानसा बगीचा असतो. पादचारी लोकांना व गाड्यांतून प्रवास करणारांना या छत्र्या म्हणजे अमूल्य विश्रांतिस्थानेंच होत. मंदिराची दुरुस्ती करणें व तळीं खोदणें हीं पुण्यप्रद कामें करून इहपरलोकीं कीर्ति मिळविण्याची तळमळ राजा व राणी या उभयतांनाहि लागलेली असे व त्यामुळें गरीब लोकांना रगड काम मिळत असे. कित्येक छत्र्यांना पाठशाळा जोडून दिलेल्या असत. तंजावर येथील सरभोजीच्या धर्मशाळेस एक पौरस्त्य व एक पाश्चात्य अशीं रुग्णालयें जोडून दिलीं होतीं. आजसुद्धां (१९३३) अशा सर्वमान्य संस्था तंजावरांत प्रचलित आहेत;

त्यांचा उपयोग श्रौती, ज्योतिषी, वादनवेत्ते व गुरू घेत असून त्या संस्थांची व्यवस्था त्या त्या वेळच्या राजांनीं केली आहे. तंजावर येथील बृहदीश्वरास दिलेल्या देणगीची यादी नि॥ ९ च्या परिशिष्टांत दिली आहे. ( ते परिशिष्ट सोबत पाहणें. )

**तंजावर येथील सरकारी व खाजगी पुस्तकालयें.**

२ तंजावरांत सरकारी पुस्तकालयाशिवाय मानम्भट्टासारख्यांचीं सुंदर अशीं खाजगी पुस्तकालयेंहि प्रसिद्ध असत. या पुस्तकालयावरून राजधानीच्या तत्कालीन संस्कृतीची ओळख पटते. अलीकडे अलीकडेपर्यंत तंजावर येथील वाद्यकलेची बरोबरी कोणीहि करूं शकत नसे. सध्यांसुद्धां सर्वत्र अशी भावना आहे कीं, प्रत्येक तंजावरकर हा उत्तम गवय्या असून मोठा बुद्धिशाली असतो. एकुणीसाव्या शतकांत तंजावर हें वाद्यवादनाचें प्रख्यात पीठ असल्याची प्रसिद्धी करण्याचें श्रेय थिआगिअर या तेलगू ब्राह्मणाकडेस आहे. तुकोजी, प्रताप व अमरसिंग हे राजे वाद्यवादनांत फार प्रवीण असत. तंजावर हें राजधानीचें शहर असताना तेथील राजे, राण्या, उपपत्न्या, सरदार व इतर वृद्धजन हे विनोद, वाङ्मय, वाद्य, नृत्य, रंगकाम, धातु व लाकूड यावरील नकसकाम, शोलाकाम ( Pithwork ), रेशीम विणण्याची कला इत्यादि कुशलतेला आश्रय देत असत. परंतु अठराव्या शतकाच्या शेवटीं, म्हणजे तंजावरचें राज्य खालसा झाल्यापासून, तें उत्तेजन एकदम बंद पडलें. हें बंद पडणें तात्पुरतेंच आहे असें आपण मानूं.

३ तंजावरच्या राजांचा स्वभाव शांत व सहनशील असल्याबद्दल ख्रिस्ती मिशन हें त्यांची फार प्रशंसा करितें. नेगापट्टम हें पोर्च्युगीजांनीं सन १६१२ मध्यें व डचलोकांनी सन १६६० मध्यें व्यापिलें.

धार्मिकसहनशीलता व मिशनरीचें वर्चस्व.

डॅनिशलोकांची वसति झाल्यापासून ८६ वर्षांनीं म्हणजे सन १७०६ मध्ये डॅनिशमिशन तेथे गेले होतें तेव्हां राज्यामध्यें ख्रिश्चन लोकांची वसति होतीच. हिंदुस्थानांत प्रॉटेस्टंट मताची स्थापना करणारे प्ल्यूटश व झिबान्बाग यांना डेनमार्कच्या चवथ्या फ्रेडरिक राजानें हिंदुस्थानांत पाठविले होते. झिबान्बाग याने तामिल भाषेचा अभ्यास केला, न्यू टेस्टामेंटचे ( तामिल भाषेंत ) भाषांतर करून तेंहि छापिलें व आवश्यकतेप्रमाणें ख्रिस्ती लोकांनी आपला पोषाखहि बदलावा असा उपदेश केला. सन १७२१ मध्ये ग्रंड्लर हा या मिशनचा मुख्य असतांना तंजावरच्या राजानें मिशनशी मैत्री केली. तिकडील कट्टे धर्माचरणी जुने लोकहि राजासारखेच परधर्मसहिष्णु असल्यानें मिशनरी लोकांना आपलें कार्य निर्वेधपणे करितां आलें. सतराव्या शतकापासून ख्रिस्ती मिशनरींना आपण ज्या दिलदार-पणाने वागविलें त्याच्या निम्मे औदार्यानें आजचा कोणताहि युरोपियन देश परकीय धर्म प्रचारकांना वागवील अशी कल्पनासुद्धा करितां येत नाही.

४ तंजावरचा इतिहास व तंजावरच्या राजांचा अस्त याशी जर्मन मिशनरी शॉर्झ याचा निकट संबंध सन १७२६ पासून आला, तो पुढें सन १७९८ पर्यंत म्हणजे त्याचा मृत्यु होईपर्यंत कायमच होता. मद्रास

शॉर्झ याचें कर्तृत्व.

येथील आंग्लसत्तेने आपल्यातर्फे वकील म्हणून त्याला एकदा हैदराकडेस पाठविलें होते व त्याच्या कामगिरीबद्दल त्याचा एक पुतळाहि फोर्ट सेट जॉर्ज येथे उभा करण्यांत आला आहे. हा शॉर्झ मिशनरी सन १७७९ पासून अखेरपर्यंत तंजावर येथेंच राहिला. तंजावरच्या राज्यात इमारती बांधण्यास व मंदिरांची सुव्यवस्था ठेविण्यास त्याच्या मध्यस्थीनेच लोकास जमिनी देण्यात आल्या. त्याला अनेक भाषा अवगत होत्या. त्याची राहणी फार साधी होती व गरीबांना मदत करणे हा त्याचा स्वभाव बनला होता. इतर कारणांबरोबर मिशनरीच्या वागणुकीने हिंदूंच्या सामाजिक व धार्मिक वर्तनात फरक होऊन बौद्धिक व सामाजिक समानता प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न सुरू झाला.

**ब्राह्मणांविषयीं शॉर्झचा अभिप्राय.**

५ तुळजीराजाचा उत्कृष्ट सल्लागार शॉर्झ हा होता व सरभोजीची सर्वप्रकारे व्यवस्था पाहण्याचे कामहि तोच करीत असे. त्याला निश्चयपूर्वक वाटत होतें कीं, ईस्ट इंडिया कंपनीने कर्नाटकच्या नबाबाला मदत करून जर तुळजाजीला राज्यच्युत केले नसते तर तो खात्रीने ख्रिस्ती झाला असता. परंतु तंजावरच्या राज्यांत ब्राह्मण-धर्माचे इतकें वर्चस्व होते की, धर्मांतराचा प्रकार तेथे घडणे फार कठिण झाले होते असे शॉर्झलाहि वाटत असे. मिशनरी लोकांच्या विरुद्ध ब्राह्मण असल्याने शॉर्झ हा ब्राह्मणांना कळागती लाविणारे असे संबोधून शिव्याशाप देत असे. ब्राह्मणावर तोंडसुख घेण्यास तो कमी करीत नसे. राज्यांतील मोठमोठ्या हुद्याच्या जागा ब्राह्मणच पटकावीत असत असा ब्राह्मणवर्गावर त्याचा आरोप असे. सर्व दुःखाचें उत्पत्तिस्थान ब्राह्मणच होत असे तो समजत असल्यामुळें

जातीनें हलक्या म्हणून मानिल्या गेलेल्या लोकांस तेच अशिक्षित व तुच्छ मानीत, असें तो म्हणतो. सारांश, ब्राह्मण हे त्याच्या डोळ्यांत कुसळाप्रमाणे सलत असत. लेंकमन याचा ओढा मिशनरी लोकांकडेस विशेष असल्यामुळें तो सन १७०२ च्या सुमारास ब्राह्मणांविषयीं असेच तुच्छतादर्शक उद्गार लिहून ठेवितो. तो म्हणतो कीं, " ब्राह्मणांचें मतांतर करणें हें फार कठिण काम आहे व तंजावरचा प्रधान बालोजी ( बावाजी ) हा खिस्ती लोकांच्या अगदीं विरुद्ध आहे. "

सरभोजीची पूज्यबुद्धि.

६ सरभोजीनें तंजावरास एक मंदिर बांधिलें असून त्या मंदिरांत शॉर्झ याचा संगमरवरी पुतळा ठेविला आहे. यायोगें शॉर्झसंबंधीं सरभोजीची किती पराकाष्टेची भक्ति होती हें उघड होऊन, सरभोजीचा मित्र, संरक्षक व लहानपणचा मार्गदर्शक अशा तीनहि नात्याचें मूर्तिमंत स्मारक झालें आहे. शेवटीं शेवटीं सरभोजीला शॉर्झनें जो उपदेश केला, त्यांतील सार असें होतें कीं, ' साधी राहणी असावी, खिस्ती लोकांविषयीं दयार्द्रबुद्धि ठेवावी, न्यायमंदिरें स्थापन करावींत व ( सरभोजीने ) खिस्ती धर्म स्वीकारावा. शॉर्झसारख्या मिशनरीचा निकट संबंध असतांना सरभोजीनें खिस्तीधर्म स्वीकारण्याचें कसें टाळिलें हें गूढ मोठें आश्चर्योत्पादक आहे.

शॉर्झची रोजनिशी व त्याचे लेख.

७ इतिहासाच्या अभ्यासूला शॉर्झची रोजनिशी फार उपयोगी असून प्रस्तुत इतिहासांत आतांपर्यंत तिचाच उपयोग केला आहे. सन १७६८ मध्यें त्याने लिहिलेल्या पत्रांत असें आहे कीं, " युरोपियन लोक परत स्वदेशीं जातांना अपार संपत्ति बरोबर

नेतात व त्यांचा दुष्टपणा व त्यांची द्रव्यतृष्णा हीं खिस्तीधर्मवृद्धीच्या आड येतात." याशिवाय हिंदुसमाजास आर्यधर्मांतच ओढून ठेविणारी सामाजिक व धार्मिक बंधनें, त्या काळची रूढिप्रियता, खिस्ती धर्म हा सामाजिक समानदर्जा स्थापन करणारा असल्यानें त्या धर्माची नावड, या कारणसमुच्चयामुळे प्रत्येक हिंदूला त्या धर्माविषयीं वाटणारा दूरीभाव; यांशिवाय खिस्ती होणें म्हणजे गोमांस भक्षण करणे, मद्यपान करणे व हिंदूंनी नीच मानिलेल्या वर्गाशीं संबंध ठेविणे, अशी हिंदूंची सर्वसाधारण परंतु निष्कारण झालेली समजूत इत्यादि अनेक कारणांमुळें खिस्तीधर्माच्या प्रगतीला फार मोठे अडथळे आले."

**धर्मांतर केल्यावरहि मूळच्या भावना कायम.**

८ सारांश, शॉर्झ व इतर मिशनरी याच्या अपेक्षेप्रमाणे त्यावेळी मिशनला यशःप्राप्ति झाली नाही. शिवाय कांही हिंदु, खिस्ती धर्मांत गेल्यावरहि, त्याच्या मूळच्या जातिविशिष्ट अलिप्तपणाच्या भावना कायमच राहिल्या होत्या. हिंदी खिस्त्यांच्या ठिकाणीं दृग्गोचर होणाऱ्या जातिविशिष्ट सोवळेपणाच्या भावनांबद्दल हेबर हा खेद प्रकट करितो. कारण त्या भावना फार तीव्र असत. तुळजाजी व सरभोजी यांसारखे राजे धार्मिक बाबतींत मोठे सहनशील असून खिस्ती धर्माला इतर प्रकारच्या सहाय्याबरोबर द्रव्यसाहाय्यहि पुष्कळ करीत होते. अशी विशेष अनुकूल परिस्थिति असताना फार थोड्याच लोकांनी खिस्तीधर्म स्वीकारावा याचे फार मोठे आश्चर्य लॉर्ड व्हॅलेन्शिया याला वाटलें.

# प्रकरण १३ वें.

## आर्थिक परिस्थिति.

### मुद्दे.

१ परदेशीलोकांशीं व्यापार.
२ शेतसारा व गांवांचे प्रकार.
३ शेतां मक्त्यानें देत असत.
४ पिकांची वाटणी.
५ गांवचे इतर खर्च.
६ शेतकऱ्यांना भागाची वांटणी देणें.
७ पुट्टाक पद्धतीची सुरुवात.
८ प्रांतांत होणारे धान्य व कापड.

**परदेशी लोक व त्यांच्याशी व्यापार.**

१ या देशाचा परदेशाशी चालणारा व्यापार परदेशी लोकांच्याच हातीं असे. परदेशी व्यापारी येथील मालाची किंमत रोकडीनें देत असत, त्यामुळें त्याना सावकारी मान्यता विशेष असे, असें फक्त नसून युद्धविषयक साहाय्याबद्दलहि त्यांची किंमत अधिक वाढली होती. विशेषतः त्याच्या तोफखान्यापुढे एतद्देशीय हत्यारें निरुपयोगी ठरल्याने त्या तोफखान्याच्या मदतीमुळे ते लोक एतद्देशीयांना अनर्घ्य वाटूं लागले. नेगापट्टम्, कारिकल व ट्रांकेबार हीं बंदरे परदेशीयांच्या हातीं असून ते बंदरांसंबंधचा कर तंजावरच्या राजाला वेळच्या वेळीं भरीत असत. यांशिवाय इतरहि अनेक लहान लहान बंदरे होतीं, व त्यांच्यां द्वारानें मालाच्या होणाऱ्या

आयातनिर्गतीवरील कर चांगलाच वसूल होत असे. देशांतील मालावरील जकातीचें उत्पन्न थोडेच असे. १७९५-९६ मध्ये जकातीचा मक्ता पांचजणांनीं रक्कम २,५५,२६७ रुपयांस ठेविला होता. आयात मालावरील जकातीच्या बाबती अनेक असून त्या मोठ्या त्रासदायक होत्या. तथापि, त्या जकाती देणे प्रजेला भाग पडत असे. दुकान, माग, ताडी, मच्छी मारणे, तेल, वसती, खजीना इत्यादि अनेक बाबतीवर कर द्यावा लागे. कवलकर व गांवांतील उत्सव यावरहि कर भरावा लागे. राज्याच्या उत्पन्नाचें मुख्य साधन म्हणजे पिकावरील साराच होय. हा सारा पिकाच्या प्रमाणावर वसूल केला जात असे.

**शेतसारा व गांवांचे प्रकार.**

२ सरकारी हिस्सा दिला म्हणजे शेतकऱ्यांना जमिनदारीबद्दल व मालकीहक्काबद्दल खात्री दिली जात असे. गावांचा प्रकार पुढे दिल्याप्रमाणें असे.

| | | | |
|---|---|---|---|
| १८०७ | गावे | एकभोगम् | संज्ञेची |
| २२०२ | ,, | पलभोगम् | ,, |
| १७७४ | ,, | समुदायम् | ,, |
| ५७८३ | | एकुण ग्रामसंख्या. | |

अशा तीन प्रकारचीं गांवे असत. समुदायम् या तिसऱ्या प्रकारच्या गांवांत गांवांतील प्रत्येक कुटुंबाचा पृथक् पृथक् हिस्सा असे. यास पंगु असे म्हणतात. बाकीच्या प्रकारांत जमिनींची मुदतबंदी वांटणी नेहमी होत असे. अशी वारंवार वांटणी करण्यांत जमीन कायमची मिळावी हा मुख्य हेतु असे. जमिनीचा दोनतृतीयांश भाग रयतवारीमध्यें विभागलेला असे. मराठी राजांच्या पूर्वीपासून सुमारें दहा

बारा जमनिदार असे होते की, त्यांच्या जमिनी पाणथळीच्या नव्हत्या. तंजावरच्या राज्यांत २३,९३,०३४ एकर जमीन होती. तिची वांटणी पुढीलप्रमाणें झालेली होती असें दिसतें.

१५,९१,९२५ एकर जमीन रयतवारीची होती.
६, १२, ०८५ एकर जमीन इनामी होती.
१, ८९, ०२४ एकर जमीन जमीनदारी पद्धतींत विभागलेली होती.

२३, ९३, ०३४. एकूण एकंदर एकर जमीन.

या विभागणीचा अर्थ असा की, कलावन्त व विद्वान् या लोकांमध्येंच एकंदर जमिनीचा एकचतुर्थांशापेक्षांहि अधिक भाग इनाम या नात्यानें कायमचा गुंतला होता. सन १८०५ मध्यें वॅलेस याने ( खानेसुमारीच्या स्वरूपाचा ) एक अहवाल लिहिला आहे त्यावरून असें दिसते की, तंजावरच्या राज्यांत त्याप्रसंगीं पुढील मिरासदार होते.

१७,१४९ ब्राह्मण.
४२,४४२ क्षत्रिय किंवा योद्धे.
१४,५७ मुसलमान.

६१,०४८ ही मिरासदाराची संख्या होय.

शेती मक्त्यानें देत असत.

३ जमाबंदीची कांहीं रक्कम पिकांत भाग घेऊन, कांहीं धान्याच्या रूपाने किंवा रोकड घेऊन आणि कांहीं नेहमींच रोकडीने वसूल करीत असत. जमिनीचा सारा व्यक्तिविशेषावर ठरविला जात नसून सबंद गांवचा ठरवीत असत. शॉर्झनें

असें लिहून ठेविलें आहे की, सन १७६८ मध्यें प्रांतातील शेती मक्त्यानें देत असत. अर्थात्, अधिक रक्कम भरण्याचें मान्य करणारासच, ठरीव मुदतीकरितां लागवड करण्यासाठीं शेती मिळत असे. ही हानिकारक पद्धति शेंवटपर्यंत अस्तित्वांत होती. म्हणजे दरवर्षी तिच्या उत्पन्नासाठीं लीलाव होत असे. या पद्धतीमुळेंच तंजावरचा राजा, कर्नाटकाचा नबाब व इंग्रजीकंपनीचे दुभाषी हे कर वसूल करणारे शेतकरी झाले.

**पिकाची वांटणी.**

४ सन १७६८ च्या एका पत्रांत शार्झ म्हणतो की, एकंदर पिकाचा शेंकडा ६०–७० टक्के हिस्सा आपला म्हणून सरकार घेत असे. कर्नाटकाच्या नबाबाच्या किंचित्‌काळ हंगामी सत्तेच्या कारकीर्दींत नबाब ५९ टक्के उत्पन्न घेत असे व तें फार असे असें समजत. जमीन महसुलाचा प्रख्यात तज्ज्ञ जो नारोपंडित किंवा डबीरपंडित यानें सन १७७३ मध्यें उत्पन्नाचा जो अंदाज केला आहे, त्यावरून असें दिसतें कीं, प्रत्येक ‘ नांजाच्या (= पाणथळ) वेली (सात एकर) ’ जमिनींत १४८–४४ कलम्स धान्य उत्पन्न होत असें.

**गांवचे इतर खर्च.**

५ सारांश, याप्रमाणें धारेबंदी झाली. गांवच्या एकंदर उत्पन्नांतून मंदिरें, ब्राह्मण व गांवनोकर यांच्या सबंधचीं वेतनें प्रथम वजा होऊन नंतर बाकीच्या उत्पन्नावर धारेबंदी केली जात असे. बाकी जें राहील त्यांतून ४० पासून ६० टक्केपर्यंत उत्पन्न शेतकऱ्याची मजूरी म्हणून दिलें जात असें; व यानंतर जें बाकी राहील तें सरकार घेत असें. भातखाचराचा शेतसारा भाताच्या रूपांतच्च घ्यावयाचा ठराव असे. मात्र

पीक तयार झाल्यावर बाजारभावाप्रमाणें साऱ्याची ठरीव रक्कम रोकड घेत असत. किरकोळ नाणें सोडून मुख्य नाणें पुढील प्रमाणें असें:—

१ एक पॅगोडा कल्दार साडेतीन रुपये किंमतीचा असे. म्हणजे सरासरी एक जर्मन डॉलरच होय.

१ एक चक्रम् म्हणजे अर्धा पॅगोडा.

१ एक मोठा फनाम एक रुपयाच्या $\frac{1}{6}$ भागाचा होय. म्हणजे सरासरी पावणे तीन आणे होत.

१ एक लहान फनाम म्हणजे अर्धा मोठा फनाम होय.

नाण्यांची व्यवस्था याप्रमाणें असे.

शेतकऱ्याच्या घेण्याची वांटणी.

६ प्रतापसिंह, तुळजाजी व अमरसिंग यांनी कुडीवरम्चा दर वाढविला. सन १७९९–१८०० मध्यें एकंदर कोरड्या पीकाचें उत्पन्न पन्नासापासून साठ टक्क्यापर्यंत शेतकऱ्यास देत असत. इतर कोरड्या पीकावर मात्र शेतसारा रोकडीनें वसूल करीत असत. ओहोटीच्या प्रसंगीं कोरड्या होणाऱ्या नदीकांठच्या जमीनीस भाटें म्हणतात. अशा भाट्यांतील पिकाचा ४० टक्के भाग पसानम् म्हणून व ४५ टक्के भाग कार म्हणून शेतकरी घेई. फक्त पावसानेंच उत्पन्न होणाऱ्या पीकाचा ५० पासून ६० टक्केपर्यंतचा भाग शेतकरी घेत असे. दुष्काळाच्या प्रसंगीं, शेतकऱ्याना सरकारांतून कर्ज देऊन त्यांतून शेतसारा वसूल करणें ही प्राचीन पद्धति असे. (अशा कर्जाला तगावी म्हणतात. कारण या रकमेच्या साहाय्यानें शेतकरी कसातरी तग धरून राहूं शकतो) सन १७७६

च्या आगष्टमधील तंजावरच्या रेसीडेंटाशीं राजाचा विचारविनिमय झाल्याचा एक लेख उपलब्ध आहे. त्यावरून असें दिसतें कीं, महापुरानें ज्यांचीं शेती वाहून गेलीं होती त्या शेतकऱ्यांस आपआपल्या शेतांतून पेरण्यास उपयोगी पडणारे बीं विकत घेण्यास ( तगावी देण्यासाठीं ) कर्ज म्हणून राजानें एक लक्ष पॅगोडांची मागणी केली होती. कर्नाटकाच्या नबाबाच्या ताब्यांत कांहीं अल्पकाळच तंजावर होतें. पण त्या अल्पकाळातहि त्यानें बैल, बीं वगैरे खरेदी करण्याला तेथील शेतकऱ्यांना तगावी दिलीं होती; व नादुरुस्त कालवे स्वतःच्या खर्चानें दुरुस्त करून दिले. कांहीं धान्यहि उसनवार दिलें होतें. पण त्या उसनवारीचें व्याज मात्र फारच भारी होतें.

७ सन १७८१ मध्यें हैदरानें तंजावरावर स्वारी केली. त्यानंतर तुळजाजीचा कुशल प्रधान बाबापंडित यानें भाटयाची जमीन वाढविण्याच्या स्तुत्य उद्देशानें पुट्टाक पद्धति सुरू केली. या पद्धतीमध्ये प्रत्येक पुट्टाकदार हा मोठा जमीनदार असे. त्याची निवड गावकऱ्यांनींच केलेली असे. मात्र अशा पुट्टाकदाराच्या ताब्यांत १२८ खेडीं असत. उत्तम व कनिष्ट अशा दोन प्रकारचीं शेतें सर्वत्रच असतात. उत्तम जमिनींत उपयोगास येणारीं शेतीचीं अवजारे कनिष्ट जमिनींतहि उपयोगास आणण्याचा अधिकार या पुट्टाकदारांना असे. साराश, या प्रकारानें पिकाची जबाबदारी पुट्टाकदारावरच असे. त्यानंतर त्याच्या ताब्यांतील गावांची सारावसूली करून देण्याची कामगिरीहि त्याच्यावरच आली; इतकेंच नव्हे

पुट्टाक पद्धतीची सुरुवात.

पण या वसूलीचें उत्तरदायित्वहि त्याच्यांकडेसच आलें. सारांश, महाराष्ट्रांतील देशमुख म्हणजेच हे पुट्टाकदार होत असे दिसतें. सारा वसूल करणारे अनेक सरकारी नोकर जेव्हां कमी करण्यांत आले तेव्हा, पुट्टाकदारांना अधिक सत्ता साहजिकपणेंच प्राप्त झाली. सन १७९९ मध्ये पुट्टाकदारांची संख्या २२५ होती. पुढे पुटें हें कामहि वंशपरंपरागत चालविण्याची प्रवृत्ति झाली. खेड्यापाड्यातून शेतीसंबंधीच्या उपयुक्त कामांत तात्पुरती त्वरा करण्याच्या हेतूने सुरू केलेली पुट्टाकदारीची पद्धति पुढें कायम झाली व तिचा परिणाम हे जमीनदारशेतकरी आपआपल्या खेड्यापुरतें नेतेच होण्यांत झाला. सन १७९८ च्या चौकशीमंडळानें असें लिहून ठेविले आहे की, " सर्वसाधारणपणें असें दिसतें कीं, शेतकऱ्यावर जुलूम जबरदस्ती नसे. विशेषतः तंजावरचे लोक अधिक मेहेरबानीतले असत. " कसेंहि असलें तरी, इंग्रजी राज्यांत ही पुट्टाकदारीची पद्धति अगदीं बंद करण्यांत आली हें फार उत्तम झालें.

**प्रांतांत होणारें धान्य व कापड.**

८ सन १६१२ मध्यें पोर्च्युगीजांनीं नेगापट्टम् घतले; व तंजावरच्या राजाला सालीना पांच हजार चक्रम् देण्याचे मान्य करून तेंच नेगापट्टम् डच लोकांनी सन १६६० मध्यें मिळविलें. तंजावरच्या राजाला मात्र आपलें घेणें वसूल करण्यासाठी वारंवार स्वाऱ्या कराव्या लागत. सन १७८१ मध्यें हेंच नेगापट्टम् इंग्रजांच्या कबजांत गेलें. नागोरचे कापड व तंजावरचा मुबलक भात यांची प्रशंसा बार्थोलोम्यूहि करितो. नेगापट्टमहून रगड भात परदेशीं जातो, असें न्यूहॉफहि प्रशंसापूर्वक नमूद करून ठेवितो. सन १७३६ मध्यें कारिकल बंदर फ्रेंचांस दिले. सन १७४९ पासून सन १७६५ पर्यंत त्या बंदरांतून

काहीं महसूल उत्पन्न झाला. यानंतर त्या बंदराचा सालीना महसूल साडेसात हजार रुपये ठरला. सन १७४१ मधील एका डच लेखावरून असें दिसतें कीं, हें कारिकल बंदर चांदीच्या व्यापाराबद्दल फार प्रसिद्ध असे. सन १६२० मध्यें डेन्स लोकांनी ट्रांकेबार बंदर व्यापिले व सन १८४५ मध्यें इंग्रजांनीं तें त्यांच्यापासून विकत घेऊन तंजावरच्या राजाला सालीना दोन हजार पॅगोडा देण्याचे मान्य केले. हॅमिल्टनच्या लेखावरून असे दिसतें कीं, तें बंदर सफेत व रंगी कापडाची मोठीच पेठ असावी. परदेशस्थांनीं याप्रमाणें येथील पीक खरेदी करून या देशाचा व्यापार सुधारला. या लोकांनी आपल्या राज्यांत व्यापारी म्हणून राहावें अशी तंजावरच्या राजांची इच्छा होती. इंग्रजीफॅक्टरीच्या सन १६२२ मधील एका पत्रावरून असे दिसते की, तंजावरच्या नायकराजांनीं इंग्रजांशी व्यापार करण्याची इच्छा प्रदर्शित केली होती. जस्त, शिसें, लोखंड व रक्तवस्त्र या वस्तु इंग्रजांस विकाव्यात व त्यांच्यापासून मिरें, कापड इत्यादि जिनसा विकत घ्याव्यात असा विचार नायकराजाचा होता. सन १६२३ मध्यें नायकराजांनीं काही हक्क इंग्रजांस दिले असें म्हणतात. सुंदर पण स्वस्त कापड आणि मिरे यांचा भरपूर पुरवठा तंजावरास असल्यानें हे जिन्नस तेथें पाहिजे तेवढे मिळत असत.

---

# प्रकरण १४ वें.

---:o:---

## उपसंहार.

---

### मुद्दे.

१ इंग्रजास तंजावरसंस्थान बिनखर्चानें मिळालें.
२ मुख्यतः कारस्थानपटुता पाहिजे.
३ प्रजेची बेपरवाई.
४ कल्पनांचें परिवर्तन.
५ प्राचीन संस्कृतीचें रक्षण.
६ प्रस्तुतचें दृश्य.
७ राजांची योग्यता.
८ स्वधर्मच्युति हेंच नाशाचें कारण.

**इंग्रजांस तंजावर संस्थान बिनखर्चानें मिळालें.**

१ आतांपर्यंतच्या प्रकरणांत तंजावरच्या मराठेराजांचा संक्षिप्त वृत्तांत दिलेला आहे. मराठ्यांच्या पूर्वीच्या नायकराजांनी आपल्या अस्तकाली ज्याप्रमाणें कांहीं तेलगू जातीची वसती मागें ठेविली होती, त्याचप्रमाणें या मराठी राजानींहि तंजावरांत आपले पश्चाताधिकारी म्हणून कांहीं मराठे लोक मागें ठेविले होते. परंतु खरें पाहतां या मराठी राजघराण्याच्या इतिहासाची गोडीहि येथील कोणत्याहि राजघराण्याच्या गोडी-इतकीच आहे. कारण या इतिहासाच्या आधारानेंच आपणांस एका शतकापेक्षां कांही अधिक कालपर्यंत उन्नति होऊन, नंतर अवनत झालेल्या घराण्याचा लहानसा पण स्पष्ट व परिणामदर्शक वृत्तांत

आणि इंग्रजीकंपनीचें एतद्देशीयांशीं चाललेलें चंचल राजकारण व कावेबाज कारस्थान यांची सांगोपांग माहिती होते. कोणत्याहि प्रकारचा खर्च न येता, हिंदुस्थानातील जीं संस्थानें इंग्रजी कंपनीस प्राप्त झालीं त्यांपैकीं तंजावरचें संस्थान हें एक आहे.

मुख्यतः कारस्थान-पटुता पाहिजे.

२ या लहानशा इतिहासावरून एक गोष्ट स्पष्ट होते कीं, सैन्याच्या मदतीला कारस्थान हें असलें म्हणजे स्वातंत्र्याचें संरक्षण व वर्धनहि निश्चितपणें होतें. एकुणीसाव्या शतकाच्या प्रारंभी विशेषतः अधिक बलवत्तर शस्त्रांच्या, कुशल राजकारणाच्या व मनस्वी धूर्ततेच्या आधारावर जें राज्य वृद्धि पावत होते, त्याच्या वर्धामान स्थितींत एकादें लहानसे संस्थान द्रव्य व मनुष्य यांच्या दरिद्री साधनांच्या आधारावर स्वतःचें अस्तित्व संभाळणें अशक्य होते. या भिकार संस्थानाचे तर्फे युरोपियन लढाऊ जहाजांची बरोबरी करणें मुळींच संभवनीय सुद्धां नव्हतें. शिकवून शिकवून तरबेज बनविलेले त्या संस्थानचे किल्लेदार युद्धकलानिपुण अशा युरोपियन शिपायांची बरोबरी करणें कल्पनेंतसुद्धां अदृश्य होतें. मोठ्या मेहनतीने उभारलेले व दुरुस्त होत असलेले त्या लहानशा संस्थानांचें किल्ले इतिहासाच्या अभ्यासूंनाच फक्त उपयोगी होते. तंजावर संस्थानचे प्रतापानंतरचे राजे विलक्षण अडचणीच्या भोंवऱ्यात येऊन कर्नाटकाचा नबाब व प्रत्यक्ष बलवत्तर इंग्रजकंपनी यांच्यामध्यें अडकित्त्यांतील सुपारीप्रमाणें सांपडून उत्साह व साधनें यांच्या नाशास मात्र कारणीभूत झाले. तंजावरच्या राजांनीं साताऱ्च्या छत्रपतींचें अंकितत्त्व कायम ठेविलें असतें तर त्या संस्थानाचा असा अपमानकारक शेंवट तरी खात्रीनें झाला नसता. परंतु

सातारा व तंजावर यांच्यामधील शेंकडों मैलांचें अंतर व शिवछत्र-पतीनंतर झालेल्या छत्रपतींच्या राज्यविषक अडचणी व राजकारण-पंगुता अशा अनेक हरकतीमुळें या दोन राज्याच्या एकीकरणास व परस्पर साहय्यास विरोध उत्पन्न झाले. सारांश, ' एकीमध्यें बळ असतें ' ही जुनी म्हणच शेंवटीं सत्य ठरली.

**प्रजेची बेपरवाई.**

३ नुसत्या मानवी सत्तेच्या ऐवजी कायद्यांच्या सत्तेने आपलें प्राबल्य स्थापन केलें ही हितपरिणामी गोष्ट झाली हें खरें आहे. इतर खालसा मुलुखांतील जनतेप्रमाणेंच तंजावर संस्थानातील प्रजाहि न्याय, द्रव्य व सैन्य यांच्या बलाढ्य सत्तेचें सुख अनुभविती झाली. प्रजेलाहि हळूं हळूं कळूं लागलें कीं, कांहीं कर्तृत्व करण्यासाठीं या राज्याचा आपण उपयोग करून घेतला पाहिजे. असें आपलेपणाचें शिक्षण मिळाल्या-मुळें तिच्या ठिकाणी ' रामाचे कीं रावणाचे कोणाचे का राज्य असेना !' ही बेपरवाईची वृत्ति राहिली नाही.

**कल्पनांचें परिवर्तन.**

४ बऱ्याकरितां कीं वाईटाकरितां कशाहि करितां असो, पण राज्याच्या कर्तव्याची कल्पना पार बदलून गेली. मंदिरें आणि छत्र्या उभारणें अथवा पंडि-तांना आणि वादकांना शाली देणें हीं धार्मिक म्हणून समजलीं जाणारीं कृत्यें आतां राजाच्या कर्तव्यांत राहिलीं नाहींत. राजाच्या कर्तव्याचा असा कोणीहि देव नसून तें कर्तव्यहि एका विशिष्ट जाती पुरतेंच असें आतां राहिले नाहीं. जुन्या पद्धतीमध्यें कांहीं गुणहि होते. उदा-हरणार्थ, बेकारी नाहींशीं झाली होती व तीमुळें जनता संतुष्ट असे. पूर्वीच्या सामाजिक चालीरीती बंद न पडतां चालूच राहिल्या होत्या.

सहिष्णुता वाढल्यामुळें जनतेच्या स्वभावांत औदार्य दृगोचर होऊं लागलें होतें. पंचायतींचा न्याय हा स्वस्त, हितपरिणामी व त्वरित मिळत असे. मध्यवर्ती सत्ता बदलल्यामुळें सार्वजनिक निधी सुरक्षितपणें चालू राहिला. सत्तेच्या मध्यवर्तीकरणाचे दुष्परिणाम व अंमलदारांची खोगीरभरती यांचा अभाव होता. स्वाऱ्यांच्या धामधुमीमुळें राजधानींत काय गडबड असेल तितकीच. इतर सर्व ठिकाणीं मात्र शांतता अनुभविली जात असे. कायद्यांची अंमलबजावणी होत असल्यामुळें मुख्यतः प्रजा संतुष्ट असे. तेव्हां राज्यकरण्याची पद्धति आतांप्रमाणें नसल्यामुळें फक्त कर वसूलीच्याच वेळीं किंवा सार्वजनिक लाभाच्या प्रसंगी प्रजेला राजसत्तेची जाणीव होत असे. युद्धमग्न सेनेच्या भरणपोषणाची सिद्धता करणाऱ्या आजच्यासारख्या कारकुनांची किंवा मुलकी अंमलदारांची फौज तेव्हां नसे. अधिक अंमलदार असले म्हणजे लांचलुचपतीला अधिक उत्तेजन मिळतें व दडपशाहीहि अधिक होते. वसतीच्या प्रदेशांत जुलूम जबरदस्ती अधिक झाली म्हणजे किरकोळ अंमलदारहि शांतताप्रिय प्रजेला पिळून काढणारे नायबपरमेश्वरच बनतात.

**प्राचीन संस्कृतीचें रक्षण.**

५ जुना प्रघात बंद झाल्याबद्दल शोक करणें हें आपण म्हातारे होऊन तरुणपणांतील प्रघात बंद केल्याबद्दल शोक करण्यासारखेंच आहे. जुन्या हिंदी राज्यव्यवस्थेनंतर लगेच इंग्रजी राज्यव्यवस्था सुरू झाली हें सुदैवच म्हटलें पाहिजे. मध्यंतरीं सन १७७३ पासून सन १७७५ पर्यंत तंजावरावर यवनांचें राज्य होतें. तेवढा तीन वर्षांचा काळ वजा केला तर दक्षिणेंतील समृद्ध प्रदेश, शिक्षणाचें आगर, वादविवादांचें निवासस्थान, बुद्धिमान् देशबंधु व बुद्धिमती

देशभगिनी यांचें निलय असा जो तंजावरचा प्रांत तो कारिकल चोल राजांच्या वैभवशाली कारकीर्दीपासुन ख्रिस्ती शकाच्या एकोणीसाव्या शतकापर्यंत हिंदूराज्याखालींच नांदत होता. या राजांनीं, प्राचीन संस्कृति व त्या संस्कृतीचीं दर्शकें अशीं मंदिरें, हीं यवन अथवा ख्रिस्ती यांच्या संबंधापासून अलग ठेवून, त्यांचें संरक्षण केलें होतें.

प्रस्तुतचें दृश्य.

६ पूर्वीच्या राजधानीचे तंजावर हें शहर आज पाहिले असतां तेथे उदासीनता दृग्गोचर होत असून पूर्वीच्या मृतवैभवाचे भूत जणुं तेथें वावरत आहे, असें प्रेक्षकांस वाटते. तंजावर ही राजधानी असतांना येथे नांदत असलेलें वैभव, भव्यपण, अभिमानाचे श्रेष्ठत्व व द्रव्यबळ आतां नष्ट झाल्यानें या नगराचें प्राधान्य आतां लयास गेलें, हें पाहून जागतिक साम्राज्य किती भंगुर असतें याची जाणीव पदोपदीं होतें. येथील किल्ला व भव्य मंदिरें दृष्टीस पडतांच प्राचीन राजराज चोलाचें स्मरण होतें; व मदमल्लिगाई व गुड गोपुरम् या इमारती नायक व मराठी राजांच्या आठवणी करून देतात. उपर्युक्त ऐतिहासिक इमारतींच्या दर्शनानें प्रेक्षकांच्या अंतःकरणांत उद्विग्नता उत्पन्न होते यांत संशय नाही.

राजांची योग्यता.

७ अठराव्या शतकांतील हिंदुस्थानच्या इतर राजांच्या प्रमाणानें आपणांस तंजावरच्या राजांच्या योग्यतेची परीक्षा केली पाहिजे. द्वीपांतरीय राजकारणामध्यें ते मागें पडले व सत्ताहीन ठरले हें खरे असले, तरी त्यांची अशी स्थिति होण्याला त्यांना काय अडचणी उत्पन्न झाल्या होत्या त्याहि आपण विचारांत घेतल्या पाहिजेत. तो काळच

अवनतीचा व बेकीच्या वृद्धीचा होता. तंजावरच्या राजांपेक्षां अधिक साधनें व जास्त सवलती ज्या राजांना होत्या ते राजेसुद्धां कांहींहि अधिक करूं शकले नाहींत. मराठी राजांच्या पूर्वीं तंजावरावर नायकराजांचें राज्य होतें. ते नायक राजे शांत स्वभावाचे व साम्राज्यनिष्ठ होते. आपलें संस्थान त्यांनीं उत्तम प्रकारे साभाळिलें. त्यांच्यानंतर मराठी राजे तेथे झालें व त्यांनींहि नायकांचेंच अनुकरण केलें. त्याकाळी राजकारण व धर्म-पालन यांचा संबंध आजच्याप्रमाणे तुटलेला नव्हता. खरें सांगा वयाचें म्हणजे राजांची कर्तव्ये धर्मानेच मुक्रर केली होती. शांतता ठेविणें, न्याय करणें, लहान लहान कर बसविणें इत्यादि कर्तव्यें राजाचींच होत असे धर्माने मुक्रर केलें होते पण त्याशिवाय मंदिरें व मठ यांना धर्मादाय देणग्या देणे, ब्राह्मण व इतर विद्यासेवक यांना भरपूर उपहार देणे, वर्णाश्रमधर्माचे संरक्षण व परिपालन करणें व दारिद्र्याचा नाश करणें ही कर्तव्येंसुद्धा राजानेच करावींत असेंहि ठरविले होते. सार्वत्रिक शिक्षण, सार्वजनिक स्वच्छता व आरोग्य याच्यासंबंधी विचार करण्यास राजाला सवडच ठेविली नव्हती. कारण ही कामें जनतेची असल्यानें तिनेंच पार पाडावींत अशी समजूत असावीसे दिसतें. प्रजेला नियम-बद्ध स्वातंत्र्य असावें ही भावनाच नसल्यानें तिच्यासंबंधी राजाला कधींहि विचारच करावा लागत नसें. आजसुद्धां साधी, हलकी व सारासारविचारजन्यकायदे करण्याची पद्धति हिंदुस्थानांत प्रचलित आहे. साराश, त्या वेळी जमिनी धारण करणाऱ्या वर्गावर कांहीं अधिक बोजा राजांनी लादला असला तरी तें कृत्य क्षम्यच समजलें पाहिजे.

**स्वधर्मच्युति हेंच नाशाचें कारण.**

८ नायक व मराठे हे स्वधर्मापासून चळतांच त्यांचा अपकर्ष झाला व मग ते स्वतःचें संरक्षण करूं शकले नाहींत. आनंदरंगम् पिले यानें अनेकवेळां आपल्या रोजनिशीत लिहून ठेविलें आहे कीं, अनीति, अन्याय व अधमवृत्ति या त्रिदोषाने तंजावर वगैरे संस्थाने पंचत्त्व पावलीं. आनंदरंगम् हा स्वतःची रोजनिशी लिहिणारा मोठा बांका लेखक होता. राज्याला नीतिमत्तेचा पाया मोठा बळकट असतो व त्यावरच पुढील एकीची इमारत उभारलेली असते. कोण-तेंहि राज्य चालण्यास त्याची अंतर्व्यवस्था व बाह्यव्यवस्था संघशक्ती-वरच अवलंबून असते. हीं तत्त्वें आनंदरंगमूला पटलीं होतीं. यावरून याची ग्रहणशक्ति विलक्षण तीव्र, शोधक व दूरपल्ल्याची होती असें दिसतें.



# प्रकरण १५ वें

## प्राचीन राजवंश.

### मुद्दे

१ मदुरेचे नायक राजे
२ कारिकेल चोल.
३ तामिळ
४ चोल राजे

### १ मदुरेचे नायक राजे.

पूर्वी मदुरेस पाडवांचे राज्य होते, तें पुढें सन १५५९ मध्यें विजयानगराच्या विश्वनाथ नायक सेनापतीनें हस्तगत केलें; तेव्हा-पासून नायकाचें राज्य झाले.

१ विश्वनाथ ( सन १५५९–१५६३ )
|
कृष्णाप्पा ( १५६३–१५९५ )
|
विश्वनाथ (स. १५९५ ते | लिंगय्या १६०२)
|
मुत्तुकृष्णाप्पा (१६०२–१६०९)
|
मुत्तुविरप्पा ( १६०९–१६२३ )
|
तिरुमल नायक ( १६२३–१६५९ )
|
मुत्तु अरकादि (वीरप्पा) ( १६५९–१६६० )

१ यानेंच मदुरेच्या राज्यांत पाळेगारांची पद्धति प्रथम सुरू केली.

२ चोक्कनाथ ( १६६०–१६८२ )
|
रंगकृष्ण मुत्तु वीरप्पा ( १६८२–१६८९ )
|
याच्या नंतर चोक्कनाथाची विधवा — मंगम्माल ( १६८९–१७०४ )
|
विजयरंग चोक्कनाथ ( १७०४–१७३१ )
|
हा चोक्कनाथाचाच पुत्र असावा. याची विधवा — मीनाक्षी ( १७३१–१७३६ )

मीनाक्षीच्या मृत्यूनंतर मदुरेचें राज्य खालसाच झाले.

## २ करिकेल चोल.

### ( ज्ञानेश्वर नामदेवाचा कक्ष पृ. २२९ )

चेर, पांडव, पल्लव, कदंब, गंग व बाण, या दक्षिणेकडील सर्व प्राचीन राज्यापेक्षां चोलांचें साम्राज्य अधिकप्रभावशाली झालें. अशोकाच्याहि फार पूर्वीपासून चोल, पांडव व चेर, यांची राज्यें होतीं. चोल पूर्वकिनाऱ्यावर, पांडव दक्षिणेस व चेर पश्चिमेस...... अशोकाच्या वेळी सीलोन चोलांच्या राज्यांत मोडत असे. सिंहली-लोकांना चोलांशीं अनेक शतके झगडून स्वातंत्र मिळवावें लागले. कपोतासाठी स्वतःचे मांस देणारा परोपकारी शिबि राजा चोलांच्या राजघराण्यांत झाला. अतिप्राचीन काळापासून तों विजयानगरच्यां साम्राज्यांत सामील होईपर्यंतच्या काळांतला चोलांचा इतिहास उपलब्ध आहे. सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी करिकेल चोल ( इ. स. १५०–२०० ) हा प्रख्यात राजा होऊन गेला. चोलाचा ऐतिहासिक काळांतला हा पहिला सम्राट् होय. अवंती, मगध व वज्र (बुंदेलखंड)

---

२ चोक्कनाथानेंच मदुरेची राजपदाची गादी त्रिचनापल्लीस नेली.

येथील राजे याचे दोस्त होते. यानें आपला व्याघ्रध्वज हिमालयावर नेऊन रोवला होता. यानें पूर्वीची उरैयूर ( त्रिशिरापल्ली किंवा त्रिचनापल्ली ) ही राजधानी सोडून कावेरीपट्टण ही आपली राजधानी केली, व तिच्या स्थापनेसाठी यानें सीलोनमधून १२ हजार मजूर आणले होते. कावेरीपट्टण येथे देशावरी व दर्यावरी व्यापार जोरात चालत होता.........व कावेरी नदीला बंधारे घालून मोठमोठे कालवे बांधले..........याच्या घराण्यात तोण्डमाण व कोचेंगज हे विख्यात राजे झाले. या घराण्याने पांचशें वर्षें राज्य केलें.

## ज्ञानेश्वर नामदेवांचा काळ यांतील उतारा पृष्ठ २२७ पासून

### ३ तामिळ.

( गौतम बुद्धाच्या जन्मानंतर सुमारे दीड हजार वर्षांच्या काळांत ) चंद्रगुप्त, अशोक, पुष्पमित्र, विक्रमादित्य, हर्षवर्धन, ललितादित्य, भोज इत्यादि महाप्रतापी सम्राट् हिंदुस्थानाच्या इतिहासात........ प्रायः उत्तरेकडे झाले........या काळांत कलिंग व आंध्र हे ( दक्षिणकडेस ) पूर्वकिनाऱ्याकडे प्रबळ होते. त्याच्यापैकीं आंध्र पाय पसरीत पश्चिमेकडे वळले व शालिवाहन या नांवानें त्यांनीं महाराष्ट्रावर तीनशे वर्षें राज्य केलें.......द्रविड प्रांतांत चोल, पांडय, चेर, पल्लव, इत्यादि नामांकित राजघराणीं झाली. त्या सर्वांत किंबहुना हिंदुस्थानच्या इतिहासात चोल उर्फ तामीळ राजाची व तामीळ लोकांची कर्तबगारी कांहीं अलौकिक आहे. तामीळ लोकांसारखे साम्राज्य कोणी गाजविलें नाहीं. तामिळांच्या साम्राज्यांत करिकेल,

राजराज, गंगईकोंड ऊर्फ राजेंद्र जयमकोंड, कुलोत्तुंग, इत्यादि मोठमोठे सम्राट झाले व लखदिव, मालदिव ही बेटे घेऊन कृष्णेच्या खालच्या सर्व हिंदुस्थानावर त्यांनीं राज्य केलें, इतकेंच नव्हें तर पूर्व किनाऱ्याने कलिंग व आंध्र हे देश घेऊन बंगाल्यांत व ब्रह्मदेशांत आपले पाय पसरले व पुढें जावा सुमात्रादि बेटांत आपल्या वसाहती करून तेथें रायायण महाभारतादि आपले ग्रंथ नेले व रामकृष्णांची मंदिरें उभारिलीं. दक्षिणेत कावेरी तुंगभद्रा नदीचा फायदा घेऊन मोठमोठे कालवे व धरणे बांधिली, स्वतंत्र आरमार ठऊन परदेशांशी मोठा व्यापार केला व साऱ्या जगांत नाहीत अशीं, कांची, मदुरा, तंजावर, शोलापुरम्, श्रीरंगम् इत्यादि ठिकाणी भव्य मंदिरें बांधून आपल्या शिल्पकलेची जिवंत स्मारकें करून ठेविलीं. । देशी वाङ्मय सर्वात प्राचीन तामीळांचेच आहे................

---

## चोल राजे ( इ. स. ८४६ ते १११८ )

### ज्ञानेश्वर नामदेवांचा काळ पृ. ( २३० )

### ४ करिकेल चोल.

विजयालय याच्या राज्यात तंजावर, कांची, कन्याकुमारी इ. प्रात असत. याचा पुत्र पहिला आदित्य याने आपल्या राज्याची सरहद्द राष्ट्रकूटांच्या सरहद्दीशी भिडविली, याचा मुलगा परांतक ( ९०७–९४७ ) यानें आणखी राज्य विस्तार केला. हा निष्ठावंत शैव होता. चिदंबारम् येथील शिवमंदिराची पटई यानें सोन्यानें मढविली. याची पत्नी केरळकन्या ही मोठी सती होती. या दंपत्याला पांच पुत्र व अनेक प्रपौत्र झाले.......या घराण्यात राजराज-( ९८५–१०१३ ) व त्याचा पुत्र गंगईकोंड ऊर्फ राजेद्र ( १०१३–१०४३ ) हे पितापुत्र अत्यंत पराक्रमी निघाले; व उभतांनीं चोल साम्राज्याचा अत्यंत विस्तार करून अपार ऐश्वर्य भोगले. राजराज

हा अत्यंत श्रेष्ठ राजा झाला. यानें चेरांचें आरमार घेतलें व पाड्यगंग वगैरे राजे जिंकून आपलें राज्य खालपासून तों थेट कृष्णेच्या मुखापर्यंत भिडविलें. यानें फार मोठी सेना तयार केली व आरमार वाढविले. सत्याश्रय चालुक्याचा पराभव करून यानें लखदिव व मालदिव ही बेटें घेतलीं व व्यापार मनस्वी वाढविला. यानें तंजावर ही आपली राजधानीं केली व तेथें राजराजेश्वर नामक एक प्रचंड शिवालय बांधिलें. या शिवमंदिरांत याच्या कारकीर्दीचा एक विस्तृत शिलालेख आहे......याने पहिले तीन कालवे बांधले व जमीनधाऱ्याचा उत्तम बंदोबस्त केला. या राजराजाचा मुलगा राजेंद्र हा बापसे बेटा सवाई निघाला. त्यानें १०३५ ते १०३७ ह्या दोनच वर्षांत अंदमान, निकोबार ही बेटें व ब्रह्मदेशांतला पेगू प्रांत घेतला. त्याने इळम् ( सीलोन ) वर स्वारी करून तेथून तीन रत्नजडित मुगुट खंडणीदाखल आणले. केरळ व पाड्य या देशांवर आपले पुत्र सुभेदार नेमिले व उत्तरेस गंगातटाकापर्यंत मोहीम करून ओरीसाचा राजा व बंगालचा राजा महीपाल याना आपले मांडलिक बनविले. याने कलिंग जिंकले, कनोज हस्तगत केले, आणि केरळ राज्य घेऊन तेथील अफाट खजिना व सूर्यमाळा नामक बहुमोल कंठा लुटून आणिला. याने अनेक देश जिंकून अपरंपार संपत्ति मिळविली..............आरमाराच्या जोरावर बंगालचा उपसागर ओलांडून यानें ब्रह्मदेशाचा कांही भाग आपल्या राज्यास जोडला................चीन देशांत याने आपला वकील पाठविला होता !..........याने गंगैकोंड शोलापुरम् ( त्रिचनापल्ली परगण्यात ) येथे एक प्रचंड तलाव बांधला. या तलावाचे नांव त्यानें ' जयस्तंभ तडाग ' असे ठेविले..........याने आपला मुलगा राजाधिराज जयमकोंड याला उत्तम शिक्षण दिले. त्यानेंहि बारा वर्षे मोठ्या तोलदारीनें राज्य केलें. याच्या प्रतापाची एकच गोष्ट सांगितली म्हणजे पुरें कीं यानें चेर, पांड्य, गंग, पल्लव,

चालुक्य सीलोन त्या सहा राज्यांवर आपला चुलता व पांच भाऊ यांना आपल्या साम्राज्याचे सुभेदार नेमले ! यानें सर्वांशीं लढाया केल्या व हा सर्वत्र नित्य विजयी असे. हा उत्तर हिंदुस्थानांत मथुरे-पर्यंत गेला. यानें आपलें राज्य निष्कंटक केले व राज्याचा विस्तारहि केला. याचा पुत्र राजमहेन्द्र. यानें राजमहेन्द्री शहर वसविले व श्रीरंगम् देवास वर्षासन नेमून दिले. त्याचा चुलता वीरराजेंद्र याने बेझवाडा आपल्या राज्यास जोडला, व ब्रह्मदेशाचा दक्षिण भाग खालसा करून दर्यावर मोठाले विजय मिळविले. चोलाचा शेवटचा प्रतापी राजेंद्र चोड उर्फ कुलोत्तुंग ( १०७०–१११८ ) हा होय, हा गंगईकोंड याचा मुलीकडून नातु (दौहित्र ) होय. याचे बरेच शिलालेख उपलब्ध आहेत. या चोलांचा व्याघ्रध्वज असे, व चालु-क्यांचा वराहध्वज होता. याने महिपमंडळ ( म्हैसूर ) प्रांतावर स्वारी करून विक्रमादित्य चालुक्याला तुंगापार घालवून दिलें व पांड्य-राजाला जिंकून मानार, तिनिवेल्ली, मलबार व कन्याकुमारी हा सारा प्रदेश आपल्या राज्यात आणला व पल्लवांचेंहि राज्य खालसा केलें. मदुरेस त्याने आपल्या भावास सुभेदार केले. चेर राजा त्याचा मांडलिक झाला. साऱ्या दक्षिणेत हा अत्यंत बलाढ्य झाला व याने आपलें कुलोत्तुंग हे नाव सार्थ केलें. द्रविड, आंध्र व कलिंग ह्या अफाट देशांवर त्याने न्यायनीतीने अर्धशतक राज्य केले. त्याने कलिंग देश जिंकल्यावर याची कीर्ति आणीकच पसरली. यानें राज्यव्यव-स्थेकडेहि उत्तम लक्ष दिले. साम्राज्याच्या जमीनीची याने मोजणी केली ..... कुलोत्तुंगानंतर चोल साम्राज्याला उतरती कळा लागली. तरी चोलांचें राज्य १३५६ व्या पुढेपर्यंत चाललेंच होतें. चोल राजांच्या ह्या ५०० वर्षांच्या [illegible] विजयालय, परांतक, राजराज गंगैकोंड, जयमकोंड, [illegible] हे ६ राजे मोठे प्रतापी निघाले व त्यांनीं चोल साम्राज्य [illegible] गाजविलें. चोलसाम्राज्याला चोलमंडळ म्हणत. या [illegible] व कारोमांडल हें रूपांतर झालें आहे.

# परिशिष्ट १

## तंजावरचा शिलालेख.

अस्सल शिलालेख फार महत्त्वाचा असून तो श्रीयुत सांबमूर्तिराव राजवाडे यांनी छापून प्रसिद्ध केला आहे. परंतु तो प्रस्तुत दुर्मिळ असल्याने सबंद, पण कलमें पाडून दिला आहे. सर्व शिलालेखाचें कलमवार तात्पर्य आरंभीच दिलें आहे.

१ पहिल्या कलमाचा संक्षिप्त सारांश पुढे दिला आहे. भोसल्याचा वंशवृक्ष.

१ नारायण
|
२ सूर्य
|
३ मनु
|
४ इक्ष्वाकु यापासून कृत त्रेता द्वापर अशा ३ युगांत अनेक राजे होऊन गेले. हल्ली कलियुगांत वंश पुढीलप्रमाणें आहे.

१ शंभु

२ येकोजी
|
३ शरभ यास आदिलशहानें बिदलीपुर जहागीर म्हणून दिलें.
|
४ महासेन
|
५ एकोजी
|
६ रामचंद्र
|
७ भीमराव
|

८ एकोजी
९ वराह
१० एकोजी
११ ब्रह्माजी × अनसाऊ
१२ शाहजी × उमाऊ
१३ अंबाजी × रेणुका
१४ परसोजी × उमाऊ
१५ बाबाजी × रेखाऊ. यांस दोन पुत्र झाले, त्यांचा वंश पुढें दर्शविला आहे.

१६ मालोजी × उमाबाई

१६ विठोजी × आऊबाई
यास अंबाबाई नावाची कन्या व ८ पुत्र.
१ संभाजी. २ खेलोजी. ३ मालोजी.
४ परसोजी. ५ नागोजी. ६ मनोजी.
७ कंकाजी. ८ त्रिंबकजी.

१७ शाहजी × १ उमाबाई २ जिजाबाई.

१७ शरीफजी × दुर्गाबाई

शाहजीनें पुढें पुष्कळ युद्धें केलीं. एकदां दर्याखानाचा पराभव केला. पुढें शालिवाहन शके १५५१ मध्यें शाहजीस जिजाबाईचे पोटीं शिवाजी व पुढें लागलीच उमाबाईचे उदरीं येकोजी मुलगा झाला.

शाहजी

१८ शिवाजी ( कनिष्ट भार्येपासून ) १८ एकोजी ( ज्येष्ट भार्येपासून )

**२ दुसऱ्या कलमाचा तात्पुरता सारांशः—**

शहाजहान+ मरण पावल्यावर औरंगजेबास दिल्लीची पातशाही मिळाली व त्यानें निजामशहावर स्वारी करून निजामशाही खालसा

+ मूळांत जहांगीर नांव आहे.

केली. शाहजीनें मोंगलाशी युद्ध केलें त्यावेळीं त्यास मराठ्यांच्या शहाण्णव कुळांनींहि सहाय्य दिलें होतें. पुढें शाहजीने शिवाजीस शके १५६२ मध्यें ( सन १६४०) साताऱ्यास व वेंकाजीस बेंगरूळ प्राती स्थापिलें. युवराजपद व बिरुदें वेंकाजीसच दिलीं. आदिलशहानें शाहजीस कैद केले. पुढे तह झाल्यावर शाहजीची सुटका झाली व त्यानें आदिलशहातर्फे स्वाऱ्या करण्यास प्रारंभ केला. या एकंदर प्रकारामुळें शिवाजीस वैषम्य वाटले व शिवाजीने आदिलशाहीविरुद्ध उठावणी केली. शिवाजीनें राज्यारोहण करून शिवशकाची स्थापना केली. त्यावरून चंद्रराजानें आगळीक केली. त्यावरून शिवाजीच्या पारिपत्यासाठीं अफझलखानाची रवानगी करण्यात आली. शके १५८१ मार्गशीर्ष शु॥ ७ गुरुवारीं अफझलखान हा समक्ष भेटींत मारला गेला व खानाच्या फौजेचा नाश नेताजीनें केला.

**३ तिसऱ्या कलमाचा संक्षिप्त सारांश असा आहे.**

शिवाजीनें आदिलशाही व मोगली मुलुखावर स्वाऱ्या केल्या. पन्हाळगडहि घेतला. तेव्हा आदिलशहाने औरंगजेबास हें कळविलें. पुढे शास्ताखान, जोहरखान वगैरेंचे पराजय शिवाजीनें केले. नंतर सन १६७७ मध्ये चंदी प्रांत हस्तगत केला. एकोजीस शके १५९३ मध्यें शाहजी नांवाचा पुत्र झाला. शके १५९६ मध्यें दुसरा मुलगा शरफोजी झाला. शिवाजीच्या अष्टनायिकांची नांवनिशी आहे. शिवाजीला वडील पत्नी सईबाईच्या पोटीं तिघी कन्या व एक पुत्र संभाजी अशीं चार अपत्यें झालीं. शिवाजीच्या इतर भार्यांच्यां संततीची यादी व त्यांचा संबंध कोठें कोठें झाला ती माहिती दिली आहे. पुढें शिवाजीचें तंजावरास गमन व तेथून परत येणें व नंतर मृत्यु.

४ चवथ्या कलमाचा संक्षिप्त सारांश पुढें दिल्याप्रमाणें सांगतां येईल. संभाजीचा किंचित् पराक्रम व त्यास औरंजेबानें धरून नेऊन त्याचा शिरच्छेद केला हें वर्णन. पुढें औरंगजेबाच्या कन्येचें भाषण व शाहूचे संरक्षण तिनें केलें ही हकीकत. पुढें शाहूचा विवाह, नंतर मुक्तता व शाहूचा राज्याभिषेक. शाहूला फत्तेसिंग नांवाचा अनाथ मुलगा सांपडताच त्याचें संरक्षण व शिक्षण शाहूने करविलें व नंतर नागपुरचें राज्य त्यास दिलें.

५ पाचव्या कलमाचा संक्षिप्त साराश पुढील प्रमाणे सांगता येईल. मागे १ ल्या कलमांतील वशावळीत १५ व्या बाबाजी राजाचा धाकटा मुलगा जो विठोजी त्याच्या संततीची नांवे दिली आहेत. त्यांत विठोजीच्या आठ मुलांत तिसरा मालोजी सागितला आहे. त्याचा वंश पुढे दिल्याप्रमाणे आहे.

१ मालोजी
|
२ माणकोजी
|
३ विठोजी
|
४ परसोजी
|
५ संभाजी

रामराजे. हा रामराजा शाहूजवळ साताऱ्यास राहिला. हाच रामराजा शाहूच्या पश्चात् छत्रपतीच्या गादीवर छत्रपती म्हणून बसला शके १६७४ ( १७५२ ) हा रामराजा निपुत्रिकच वारला. त्याने विठोजीचा दुसरा मुलगा खेळोजी याचा नातू उमाजी याचा पुत्र शाहू यास मांडीवर घेतलें. शके १६९५

शाहु

शिवाजीचा पुत्र रामराजा यास संतति नव्हती. यानंतर वें
जीचा वंश पुढीलप्रमाणें दिला आहे. वेंकाजीच्या पराक्रमाचें व
त्यानें शके १५९६ मध्यें तंजावरांत प्रवेश केला व शके १५
मध्यें तंजावरचें राज्यावर आरोहण केलें. वेकोजीला दोन
झाल्याचा वृत्तांत मागें तिसऱ्या कलमांत दिलाच आहे. पुढें
१५९८ मध्ये तिसरा पुत्र तुकोजी झाला. एकोजीस दोन रि
लग्नाच्या व नऊ उपपत्न्या होत्या. दुसऱ्या भार्येला एक मुल
झाली. उपपत्न्यांच्या पोटीं पुढील संतति झाली. १ चंद्रभान
सूर्यभान. ३ मित्रभान, ४ कलेमान, ५ कीर्तिमाउ, ६ विजयभ
७ उदयमान, याप्रमाणें सप्त खर्ची पुत्र होत. पुढे शके १६०४
एकोजी मृत्यु पावला.

६ सहाव्या कलमाचा संक्षिप्त सारांश पुढील प्रमाणें सा
येईल. वेंकाजीच्या पश्चात् त्याचा पुत्र शाहजी गादीवर बस
शाहजी व सरफोजी यास संतति झाली. तिसरा तुकोजी याचा
पुढील प्रमाणें:—

१ तुकोजी.

२ येकोजी जन्म शक १६१७ (सन १६९५) यास बाबासा
म्हणत

शाहजीचा मृत्यु शके १६३३ ( सन १७११ ) मध्यें झाल्य
सरफोजी गादीवर बसला. सरफोजीला तीन बायका होत्या. तु
जीला लग्नाच्या पांच बायका होत्या. याशिवाय सहा रक्षा हो
यांपैकीं एक मराठा जातीची व पांच नायक जातीच्या होत्य
मराठा जातीच्या स्त्रीच्या पोटीं शके १६६४ ( सन १७४२ ) म
प्रतापसिंग जन्मला. इतर राजपुत्रांचे विवाह व त्यांच्या रक्षा यां
माहिती दिली आहे. पुढें शरफोजीच्या पत्नीनें मूल झाल्याचें प्र
केले, पण तें मिथ्या ठरलें. पुढें शके १६४९ ( सन १७२७ ) म

शरफोजी मरण पावला. त्याबरोबर दोन स्त्रिया सती गेल्या. नंतर त्याचा धाकटा भाऊ तुकोजी हा गादीवर बसला. शके १६५७ ( सन १७३५ ) मध्ये तुकोजीहि निवर्तला. नंतर एकोजी राज्यावर बसला. पण तो एक वर्षानीच निवर्तला. हा फार संशयी होता. शके १६५८ (सन १७३६) मध्ये एकोजी निवर्तला. पुढे त्याच्या सुजानबाई नांवाच्या स्त्रीनें राज्यकारभार चालविला. परंतु कोयाजी घाटग्यानें तोतया राजाची भूमिका घेतली व राज्य बळकाविलें. यालाच काटराजा म्हणतात. शरफोजीच्या पत्नीने मुलगा झाल्याचें सोंग केले होतें त्याचाच फायदा या काटराजानें घेतला. पण पुढें हें ढोंग उघडकीस येऊन शके १६६० ( सन १७३८ ) मध्ये प्रतापसिंहास गादी मिळाली.

७ सातव्या कलमाचें संक्षिप्त तात्पर्य असें सांगता येईल. शके १६६० ( सन १७३८ ) मध्यें प्रतापसिंह गादीवर बसल्यावर लगेच त्याचा विवाह झाला. त्याची संतती पुढें दिली आहे.

१ प्रातापसिंह× १, २ द्रौपदीबाई.

|

२ तुळजाराजे ×१, २ राजकुमारबाई, ३ मोहनाबाई.

मध्यंतरी कट्टराजानें राज्य बळकाविल्यावर दान, धर्म वगैरे बंद केला होता ही माहिति दिली आहे. त्यानें मोहना नांवाची एक मुरळी भ्रष्ट केली होती. प्रतापसिंह गादीवर बसल्यावरहि या कट्टराजानें कांहीं अधिकार चालविला पण पुढें त्याला कैद करण्यांत आलें. पुढें या तोतयानें चंदासाहेबाशीं संधान लाविलें. व तें या तोतयानें आपल्या भावाच्या मार्फतीनें लाविलें, पण पुढें तें फुटलें व त्यास देहान्त शिक्षा देण्यात आली. चंदासाहेबाची स्वारी मात्र जोरांत चालू होती, तेव्हां प्रतापसिंहानें साताऱ्याहून मदत मागविली. शाहूनें रघूजी व फत्तेसिंग भोसले यांस साठ हजार फोजेनिशीं

मदतीस पाठविलें. पुढें मुरारजी घोरपड्यानेहि मदत केली. पु
पुष्कळ युद्धे झालीं. प्रतापसिंहाला सात उपपत्न्या होत्या. त्यांस
संतति झाली. शके १५८५ (येथें शके १६८५ पाहिजे म्हणजे इ
१७६३ ) मध्यें प्रतापहि मरण पावला. दोघी स्त्रियांनीं अनुगम
केलें. तुळजाराजा गादीवर बसला.

८ आठव्या कलमाचा संक्षिप्त सारांश पुढें सांगितल्याप्रमा
आहे. तुळजाराजा गादीवर बसल्यावर महंमदअलीनेंहि वस्त्रें वगै
पाठवून त्याचा गौरव केला. पण पुढे या महंमदअलीच्या मनांत
तंजावरचें राज्य खालसा करावे असे विचार येऊं लागले व तदनुस
त्यानें तंजावरावर स्वारी केली. परंतु इंग्रजाच्या मध्यस्थीनें हें यु
थांबलें. पुढें तुळजाजीस संतती नव्हती म्हणून त्याने आपल
कुळातील एक मुलगा दत्तक घेऊन त्यास शरभोजी हे नांव ठेविलें
हा शरभोजी विठोजीच्या वंशातील होय. वंशवृक्ष पुढे दिला आहे.

**१ विठोजी**

|

**२ त्र्यंबकजी हा विठोजीचा आठवा पुत्र.**

|

**३ गंगाजी**

|

**४ उवाजी**

|

**५ गंगाजी**

|

**६ सुभानजी**

| | |
|---|---|
| **७ उवाजी** | **७ शाहजी** |
| | **८ शरभोजी** |

शरभोजी यासच तुळजाजीनें दत्तक घेतलें. व वसंत पंचमीस ( तारीख २४–१–१७८७ ) राज्याभिषेक व दुसरे दिवशी शके १७०८ मध्यें तुळजाराजा निवर्तला. पुढे शके १७०९ मध्यें शरभोजीस बाजूस सारून अमरसिंग राजा बनला. पुढें शार्टझच्या प्रयत्नानें शके १७२० ( सन १७९८ ) मध्यें शरभोजीला पुनः राज्यप्राप्ति झाली. पुढें शरभोजीचा विवाह झाला व त्यास संततींहि झाली. प्रस्तुत शिलालेख तारीख १३ डिसेंबर सन १८०३ रोजी पूर्ण झाला.

---

## तंजापुरीं श्रीबृहदीश्वरालयस्थ शिलालिखित.

# भोसलवंशचरित्र.

श्रीमद्भोंसल वंशाचा आदि मूलपुरुष श्रीमन्नारायण त्यापरंपरेने श्रीसूर्यनारायण त्यापासून मनू मनूपासून राजा इक्ष्वाकु त्याराजाचे परंपरेंत कृत त्रेता द्वापर या तीन युगांतहीं प्रख्यात पुण्यश्लोकराजे जाहले. या वंशांत प्रस्तुत कलियुगामध्ये शंभुपर्वतप्रदेशीं महाराष्ट्र देशाधिपति शौर्योदार्यगुणप्रख्यात राजा शंभू ह्मणून अवतरला. त्याराजानें आपुल्या स्वधर्मयुक्त विहितमार्गानें राज्य परिपालन करी. त्यासरिसें शंभूपर्वतावरी श्रीसांबशिवप्रसादार्थ अनुष्टानहीं करीत आला. त्या अनुष्टानास संतोष पावून श्रीसांबशिवानी त्या शंभूराजास स्वप्नांत प्रत्यक्षहोऊन तुला संतती संपत्ती विशेषेंकडून होईल ह्मणून प्रसाद वाक्याचे अभय दिल्हे. सवेंच कित्येक दिवसाने त्या शंभुराजाचे जठर-

समुद्रीं गुणरत्न यशप्रथम येकोजीराजे संभवले त्या येकोजी-
राजानी त्या शंभुपर्वतप्रदेशीं विहितरीतीने राज्यभार करीत
असतां त्या सांबशिवानुग्रहें करून येकोजीराजाचे उदरीं शरभ-
राजे नामक प्रथम सत्पुत्राचा संभव झाला. ते शरभराज सार्व-
कालहीं विभूतिरुद्राक्षालंकृत करून श्रीसोमस्कंदमूर्तिची उपासना-
युक्त राज्यपरिपालनकरीत असतां तेच सोमस्कंदमूर्ति स्वप्नांत
प्रसन्न होऊन मन्त्रोपदेश केले. त्या मंत्राचे माहात्म्येकरून दक्षण
प्राताचे पादशाहा संतोष पावून बिर्दलीपुरास प्रति नाम विदल-
रही शरभराजास जाहागीर दिल्हे उपरी शरभराजाचे उदरीं
महासेन ह्मणून राजे जन्मले. त्या महाशेनराजानी पन्नासहजार
स्वार स्ताम घेऊनहंबीरपादशाहस युद्धास कुमुक केले. तदनंतरें
त्यामहाशेनराजानी परम नीतीकरून राज्यपरिपालन करीत
आल्या पुण्य प्रभावेंकरून त्यांस पन्नास पुत्र झाले. त्या पन्नास
पुत्रांपैकीं ज्येष्टपुत्र येकशिवराजा ह्मणणार राज्यधर वंशधरहीं
झाले. त्या येकशिवराजानी श्रीसांबशिवाची भक्ती विशेष केल्या-
मुळें सांबशिव प्रत्यक्षहोऊन या उपरी तुह्मास व तुमचे वंशपरं-
परेसहीं माहाराज ह्मणून सकल प्रपंचांतहीं प्रख्यात होईल ह्मणून
तेंव्हाच माहाराज बिरुदें समग्र वागवणेस तुह्मी योग्य करितां
उत्तम बिरुदें समग्र वागवणें ह्मणून आज्ञापिले. त्या श्रीसांब-
शिवाचे आज्ञेवरून माहाराज येकशिवराजानीं स्वतेव इतर
राजास जिंतून संपादिली बिरुदें कित्त्येक व हंबीर पादशाहानी
येकशिवराजाचे वडील महाशेन राजानी आपल्यास फार कामा
आलेते नव्हतां येकशिवराजेहीं प्रख्यात होऊन बहुत शूरत्वेंकरून
आपल्यासहीं फार वेळ कुमुक करून स्थापिले. सांप्रत त्यांस

श्रीसांबशिवप्रत्यक्ष होऊन सकल बिरुदें वागवणेस आज्ञापिले करितां आपणहीं या येकशिवराजास आपली खांस बिरुदें कितेक द्यावी ह्मणून हत्तीची बिरुदें कित्येक व घोड्याची कित्येक इतर बिरुदें कित्तेक येणे प्रमाणें दिले. तऱ्हा त्या येकशिवमहाराजानी ते बिरुदें समग्र येकवटून अपल्या जवळील उत्तम सामादिक सर्वदा उत्तम काम करीत आल. त्यांस येकेक काम नेमिले त्याचा विस्तार थोडा जाणवितों. जे मुख्यप्रधान पेशवे व फौजदार सरनोबत देवकराचे घराणे व दुसरे फौजदार पोवांराचे घराणे. त्या त्रिवर्गासही नेमिली कामें आपल्या घोडयास व हत्तीस बिरुदें बांधितांना इतर सामादिक व वरी लिहिलें त्रिवर्ग मुख्यसामादिकांनीहीं बसून बिरुदें उचलून पोंवारानीं पेशव्याचे ाती देणे. त्यानी देवकराकडे देणें देवकरानी बांधणे व कित्तेक बांधवणेहीं येणेप्रमाणे चालविले. त्याचरीती तेते वंशस्थ अद्यापि तेचकाम करीत येतात. याखेरीज दुसरी यांस हत्यार धुणे देवकरानींच धुतली. खांसहत्यारें देवकरानीच आणून माहाराजापासी देणें तदनंतर ते हत्यार पूजितेवेळेस उजव्या बाजूस पोंवार डाव्या बाजूस देवकर मध्यें महाराज पेशव्यासहीं घेऊन बसून पूजाकरिणे. महाराज सिंव्हासनावरी सद्रेस बसल्यावेळेसहीं उजवीबाजू डाव्याबाजूस वरि लिहिल्याप्रमाणे पोंवार देवकर पेशवे पुढेंबसणें. येणप्रमाणें आज्ञापून उरली बिरुदें व हत्तीवरील नौबतपंजा हत्तीवरील माही मरतब व हत्तीवरील तासाबिरुदाचे भालाबर्ची निशाने वगैरे इत्यादिबिरुदें जिलेंबेस व माघिलांगी यावयाच्या यथाक्रमेकडून चालवीत आले. तदनंतरें प्रकृत आपलेचित्तानुरूप कित्तेक बिरुदें अंगीकारिले. त्यांत या महा-

राष्ट्र देशास व त्याजातीसहीं मुख्ययान पालखी जाहल्याकरितां त्या पालखीसच लाविलीबिरुदें लिहितों. पालखीची तवकडा व कमान देखील हत्तीचे दांताची शिफेद येकरंग त्यास रेशमी कान्हण्या व नवार रेशमी दांडीचे पुढिले बाजूस सिंव्हललाट सोन्याचे दांडीचे माघले बाजूस शार्दुलवदन सोन्याचे पिंजरीचे शेवटासदोनीबाजूस जडित केळीचे फुलाकृती कलश २. पिंजरीचे चारीकोनेस जडीत गोंडे जरीझालरी ४. दोनीबाजूचे कत्तरीवरील दांडीस रुप्याचे खुब्याचे जरी दांडयाचें घोंस. दांडीस समग्र जडित खुब्याचे येखादें सोन्याचें रुप्याचेंही भरजरी गोंडे. पालखींतसमोर अरसा, वठहिं, पालखी यात दांडीस मोराचा विजणा, रुप्पेरी पिंजरा वरी शिफेद फूल, बासण, दांडीचे पुढिले बाजूस सिव्हललाटा, वरी फुलाचाहार, धरितागोंडा, जडितखुवा, येखादे सोन्याचाखुबा. भरजरी दांडीस दोनीबाजूस मखमली गलेफ. येणप्रमाण यायेकशिव महाराजानी बिरुदाचे पालखींत स्वारकरूंलागले. याखेरीज हत्ती घोड्याची वगैरे बिरुदें प्रसंगानुसार लिहिली आहेत. तदनंतरे त्या येकशिवराज्याचे उदरीं रामचंद्रराजे जन्मले. रामचंद्रराजानी न्यायेकडून राज्यपरिपालन करीत असतां त्यांचे उदरी भीमराज ह्मणून राजे जन्मले त्या भीमराजानी विहितधर्मेकडून प्रजापालन करीत असता त्याचे उदरीं दुसरे येकोजीराजे जन्मले. त्या येकोजीराजानी आपले स्वबाहुबलपराक्रमे करून सातारगड आक्रमिले. तदनंतरे पादशाहासी युद्ध प्रसक्तिपडल्यामुळे गडावरीच वासकरून होते. उपरी त्या येकोजीराजाचे उदरी वराहराजे जन्मले. ते वराहराजे परमशूर न्यायेकडून राज्य परिपालन करीत

येण्यांत पंचावन्नहजार स्वारठेऊन पादशाहाशीं युद्धकरून जिंतून ख्याती केले. उपरी त्यांचे उदरी तिसरे येकोजीराजे जन्मले. त्या येकोजीराजाचे उदरी ब्रह्माजीराज जन्मले. त्या ब्रह्माजी-राजाची धर्म पत्नी अनसाउ त्यां उभयां पासून प्रथम शाहजी राजे जन्मले. त्या शाहजी राजाची पट्टस्त्री उमाउ त्या उभया पासून अंबाजीराजे जन्मले. त्या अंबाजीराजाची स्त्री रेणुकाआउ त्या उभयां पासून परसोजीराजे जन्मपावले. त्या परसोजी राजाची स्त्री उमाउ त्या उभयां पासून बाबाजीराजे जन्मपावले. त्या बाबाजीराजाची स्त्री रेखाउ. त्यां उभयां पासून दोघेपुत्र जन्मले. त्या पैकीं ज्येष्ठ मालोजीराजे दुसरे विठोजीराजे. दुसरे पुत्र विठोजीराजाची धर्मपत्नी आउ बाई साहेब त्यां पासून जेष्ट-कन्या अंबाबाई त्या उपरी अष्टपुत्र जन्मपावले पैकीं पहिले संभा-जीराजे दुसरे खेलोजीराजे तिसरे मालोजीराजे चौथे परसोजी-राजे पांचवे नागोजीराजे साहवे मनोजीराजे सातवे कंकाजीराजे आठवे त्रिंबकजीराजे हा बाजाजीराजे यांचे दुसरेपुत्र विठोजी-राजाचा वंश. याउपरी यांचा विस्तार पुढें येयील. आतां बाबा-जीराजे याचे ज्येष्टपुत्र मालोजीराजे यांची ख्याती, त्यामालोजी-राजे यांनी उमाबाईसाहेब यांसी पाणिग्रहण करून घेऊन विहित धर्म करून स्वराज्य परिपालन करीत येते त्यासमयीं निजाम पादशाहा ह्मणणार देवागिरी दुर्गांत राज्यकरीत होता. व इब्राहीम पादशाहाचा लेंक यद्लूशाहा ह्मणणार पादशाहा विजय दुर्गांत राज्यकरीत होता. त्या यदल्शाहास प्रतिनाम अल्लीशाहा ह्मणूनहीं प्रख्यात होतें. अवशात् देवांगेरी दुर्गांच्या निजाम शाहासहीं व विजयदुर्गाचाराजा यदिल्शाहासहीं युद्धप्रसंग पडलें. त्याप्रसक्तींत

बांवाजीराजाचे पुत्र मालोजीराजे परमशूर बहुत युद्धांत जय पांवले आहेत हे जाणून मालोजीराजास व त्यांचे भाउ विठोजी-राजासहीं देवगिरीदुर्गाचा निजाम पादशहा सहायास बलाविला. त्या उभयता बंधूनी सैन्यासह निजामशहाला सहायहोऊन विजयदुर्गाचा राजा अल्लीशहाबरोबर युद्धकरून जयपावून निजा-मपादशहाची संकटे परिहारकरून त्याचे देवगिरीदुर्गाचे राज्य देते-त्यास झाले. तो संतोष पावून आपुल्या समग्र राज्यांतहीं चौथायी जहागीर देऊन मालोजीराजे विठोजीराजे उभयतां बंधूनी आपल्या-कडेंच असावें ह्मणून प्रार्थिले. तेणेप्रमाणेंच मालोजीराजानी आपुले स्वराज्य आपले सचिवाचे स्वाधीन करून आपण उभयतां बंधूनी निजामशाहाकडेंच वास्तव्यकेले. तेव्हां मालोजीराजास शाहा-शरीफ बेअल्ली कलंदर ह्मणणार एक फकीर सिद्धपुरुष स्नेहित जाहला. त्या शाहशरीफ ह्मणणार फकीराचे ठांयांस मालोजी-राजानी जाऊन आपल्यास पुत्रसंतान नाही ह्मणून सांगीतले. त्यास त्या फकीरानी कांहीं वेळ ध्यानकरून सवेंच मालोजी-राजास पाहून ह्मणाले. जे तुह्मास दोघेपुत्र होतातीं दोघे महाशूर परम भाग्यवंतही होतील त्यांचावंशहीं विस्तारकडून होईल. त्यांचे वंशी परंपरेंत जाहले पुत्रसमग्रहीं परम भाग्यवंत होऊन असतील. त्यादोघां पुत्रांसहीं अमचे नावें ठेवा आणि आह्मी-देतों त्या वस्तूस मर्यादें कडून ठेवा ह्मणून पांच वस्तू दिल्हे. त्याचा तपशील नागीन ह्मणोन येक तरवार पद्मीन ह्मणोन येक तरवार येकून तरवारा दोनी व अपला लंगोटा एक व कलदरा एक व पंजा १ ऐशे पांच वस्तू दिल्हे उपरी मालोजीराजास प्रथम पुत्र शालीवाहनशके १५३१ साधारणसंवत्सरीं दुसरे

शाहजीराज जन्मले. तदनंतर दुसरे पुत्र जन्मले. त्यांस शरफोजी-राजे ह्मणून नाम ठेविले ते दुसरे तदनंतरें ज्येष्ट पुत्र शाहजीराजे ५ वर्षाचे वयारूढ झाले तेव्हां कोल्हापुरचे राजे होते. त्यास व निजामशहापादशहासहीं विकल्प पडून कोल्हापुराचा राजा व पांच वर्षाचे शाहजीराजाचे वडील मालोजीराजास युध्दास पाठविले. तेव्हां मालोजीराजे निजामशहाचे प्रेषित होऊन आपले स्वसैन्य व पादशाहाचे सैन्यहीं स्वारवार परिवार हत्त्यारासहीत कोल्हापुरच्या राजावरी जावून अद्भुत युध्द करून बहुत वार शत्रूस पराजयहीं करून तदनंतरें सन्मुख युद्धांत वीरस्वर्गपावले. उपरी शाहजी राजास निजामशाहा पादशहानी या शाहजीराजे, शरफोजीराजे उभयतांचे वय लहान करितां त्यांचे संरक्षणास्तव त्यांचेचुलते विठोजीराजांकडे निरवून त्यांचे योग्यतानुसार परि-पालन कराविलें. तदनंतरें शाहजीराजे यौवनारूढ जाहल्यावरी मोहते रायांची कन्या उमा बाईसाहेबास प्रथम पाणिग्रहण केले. तदनंतरे निजामशाहाचे अनुमतीने शाहजीराजे आपले स्वराज्य-पदास शालीवाहनशके १५४३ दुर्मतीसंवत्सरीं तक्त निशी जाहले. सवेंच यादवराजे ह्मणणार कोणीएक राजे होते. त्यानी प्रार्थनापू-र्वक आपली कन्या जिजाऊस शाहजीराजास द्वितीय विवाहास लग्नकरून दिल्हे. या शाहजिराजाचे धाकुटे भावू शरभोजीराजे यानी विश्वासरायांचीकन्या दुर्गाबाईयांसी लग्नकरून घेतले. तद-नंतरें कितेकदिवसावरी याउभयतांचे चुलते विठोजीराजे देवगतीस पावले. त्यांचे लेंक आठजणहीं निजामशाहा पादशहास अनुसरून होतें. तदनंतरें कांहींयेक विशेष दिवसांत निजामशहा पादशहानी आपल्या खालील राजेलोक तमामास बोलाऊन पाठवून सदर केले. त्या सदरेस आल्या उपयुक्त नावनिशा-प्रथम मालोजीराजे

शाहजीराजे शरफोजी राजे हे दोघेभाऊ व यांचे चुलतभाऊ वेठोजीराजे यांचे लेंक आठजण व शाहजीराजे यांचे दुसऱ्या ब्रीचे जानिता यादवराजे ह्मणणार तेहीं येक व त्यांचे पुत्र दत्ताजी-राजे ह्मणणारही व खंडागळे ह्मणणार तेहीं येक थोरसरदार समग्रही सदरमाडा जाहल्यावरी बाहेरी येतेवेळेस दाटणपडली त्या दाट-गींत वरी लिहिल्या खंडागळे ह्मणणार सरदाराचा हत्ती मस्तीस घेऊन बहुत प्रजांस मारिला. तेंव्हां यादवराजे ह्मणणाराचे लेंक दत्ताजीराजे यानी तरवार घेऊन त्या खंडागळाच्या हत्तीस मारावेंयास गेले. त्या वेळेस विठोजी राजाचे लेंक आठजण भावांपैकीं संबाजीराजे ह्मणणार एक व खेळोजी ह्मणणार येक यादोघानीहीं खंडागळेचे स्नेहास्तव त्या खंडागळाचा हत्ती मारा-वयास आल्या दत्ताजीराजास हत्ती मारणें गरजनाहीं ह्मणून अटकाविले. तेंव्हा दत्ताजीस रागयेऊन बहुत लोकांस जायां केला हत्तीस मारावें ह्मणालियास तुह्मी अटकावणें काय ह्मणून येकास येक चर्चावाढून हातासहात मिळून हानीं जंगीं जाहली. त्यांत विठोजीराजाचे लेंक संभाजीराजाचा हात चालून दत्ता-जीराजाचे डोसके उडालें. तेंव्हा त्या दत्ताजीराजाचे वडील यादवराजे पुढें लांबले होतें. त्यास आपले पुत्र दत्ताजीराजे खंडागळेचे हत्तीस्तव विठोजीराजाचे लेंक संभाजीराजाकडून दैवगतीतें पावले ह्मणावयाचे वर्तमान कळून तसेंच यासंभाजी-राजे खेळोजीराजावरी युद्धास आले. तेंव्हा शाहजी राजानी यादवराजे आपले सासरे जाहलेतरींहीं आपले चुलतभावू संभाजी-राजे व खेळोजीराजे यां उभयतांवरी युद्धास आलेकां म्हणून त्यायुद्धास आपण पुढे होऊन युद्धकेले. तेंव्हां सासरा यादवरा-

याचा हात चालून शाहजीराजे मूर्छागत जाहले. तेव्हां यादवरा- जानी आपले जांवाई शाहाजीराजे मूर्छागत जाहले त्यावरी हतक- रीनासें त्यांच्या सैन्यावरी युद्धास प्रवर्तले. त्या युद्धांत विठोजी- राजांचे लेंक संभाजीराजे यादवराजा कडून रणास आले. सवेंच शाहजीराजेहीं मूर्छेतून सावध होऊन युद्धास प्रवर्तते समयीं हे वर्तमान येकंदर निजामशाहा बादशाहास कळून यादवराजास पुत्रशोक जाहल्या करितां पराक्रम असेल त्यासमयी युद्धकामानये म्हणून राहतें करून त्यां त्यांस त्यां त्यांचे स्थलास निरोप दिल्हे. यादवराजे स्वस्थलास जावून विमनस्क होऊन होते. येणे प्रमाणे यादवराजे विमनस्क आहेत ह्मणायाचेहीं विमनस्क होण्यास कारणहीं विजयदुर्गाचे राज्यकर- णार अल्लीयदल्शाहास कळून त्या अल्लीयदल्शाहानी याचना केलीजे. देवदुर्गाचे निजामशाहा पादशाहास आह्मास विरोध पडून येकदोनदा युद्धारंभ केल्यांत शेनेसहित आपण भग्न जाहले. त्यास कारण मुख्य शाहाजीराजे व यादवराजे प्रभृति शूर निजामशाहा पादशाहाकडे मिळून आहेत करितां त्या पैकी यादवराजा महाशूर तो प्रस्तुत विमनस्क जाहला आहे करितां त्याला संविधान करून आपलें करून घेऊन निजामशाहाशी युद्धास आरंभ करून जयप्रद व्हावे म्हणून दृढ याचना करून यादव राजासी संविधान करून भेटी गोष्टी जाहल्यांत यादव राजानी सांगितले जे केवळ तुमच्या अमच्या सैन्ये कडूनच निजामशाहा जिंतलाजाईना कां ह्मणिजे त्याकडे शाहजी राजे प्रभृति कित्येक प्रख्यात शूर आहेत त्यास्तव दिल्लेश्वर जहगीर पादशाहासी संविधान करून त्याकडील सैन्य आणवून तदनंतरें

निजामशाहासी युद्धास प्रवर्तावे म्हणून सांगीतले. तेंव्हां अल्ली-यदिल्शाहानी म्हणाले जे तुम्ही सांगीतलें ते युक्तच आहे. तत्रापि अमचे वडील इब्राहीमखानास व जाहगीरपादशाहासहीं रिणानुबंध त्या अनुसंधाने कडून जाहगीर पादशाहाही अमुची गोष्टी अंगीकार करून आम्हास सहायहीं करितील म्हणून तेणे प्रमाणे संविधानासही आरंभिले. तेव्हा जाहगीरपादशाहा दिल्लेश्वरयानी इब्रायीम्खानाचे स्वस्नेहास्तव अल्ली यदल्शाहास कुमुक पाठविले ते तांब्रमुखी प्रजा सरदार लस्करीखान म्हणणार ताम्रमुखी म्हणिजे शुद्ध मोगलयांस कुमुक पाठविल्या कुमुक कडूनहीं व यादवराज आपल्या सरदारासमवेत मिळाल्याकरितांहीं त्यागवेंकडून अल्लीयदल्शहानी निजामशाहासी युद्धकरावे ह्मणून त्यांच्या मुलुकातें उपद्रवास आरंभिले. तेव्हां निजामशाहा पादशाहासी मिळून होते. ते सरदाराची नावनिशी मालोजीराजाचे पुत्र शाहजीराजे व शाहजीराजाचे भावू शरफोजीराजे विठोजी राजे यांचे लेंक जेष्ट संभाजीराजे वीरस्वर्गस्थितजातां वरकड नावानिशा खेळोजीराजे, व मालोजीराजे, संबाजीराजे, व नागोजीराजे, व परसोजीराजे, व मक्कोजीराजे, त्रयंबकजीराजे, शामवक्र सैन्याचे सरदार, शामवक्र म्हणजे शुद्धहत, सीहमीर-खान, मुधाखान, फलसखा देशाचा अधिपती बल्लाळराजा बेडराचा यजमान सिंव्हराजा विठोजी राजा म्हणणार अन्य येक ह्मराटा, दत्ताजीराजा म्हणणार अन्य येक ह्मराटा, नागोजी-राजा ह्मणणार अन्ययेक ह्मराटा, नरसिंव्हराजे म्हणणार अन्ययेक ह्मराटे जगदेयराजाचे लेंक सुंदरराजेमराठे तुरुष्कंद-खनी सरदार सारतखान् व याकूतखान् व पनमूरखान, व

सूरूपखान, व जोहरखान, व फत्तेखान, व त्यांचेलेंक अहमदखान प्रमुख देखील, आकबराचे सेनापती निजामशाहा पातशहाचे या इतके सरदार मातबर राजेलोक देखील आपल्या सैन्यासमवेत अपल्यासी मिळाले आहेत करितां, निजाम शाहा पादशाहा अल्ली यदल्‌शाहास तृणप्राय मानीतहोते. अल्लीयदल्‌शाहाने यादवराजाचे सैन्यासहित झाल्याकुमुकें व कांहीं व दिल्लेश्वरानी मोगलाची कुमुकें पाठविल्याकडूनहीं निजामशाहासी युद्धास प्रवर्तलें करितां त्याकडील सरदाराची नावनिशा प्रथम यादवरायाकडील सरदार राजेलोक वगैरे मराठे तुरूक देखील नावनिशा—जलाखान व खजीरखान व खरमुल्लाखान् व सुजानखान व जाहनखान् व शिकंदरखान् व खलैलखान व हिसामदखान सदरल्हा तुरूक ८ जण यादवराजाचे लेंकाच्या नावानिशा—उदारराम, व विश्वनाथ, व अचल, व बाहदार, व दादाजी, व राघव व जसवन्त हे सातही यादवराजाचे लेंक. हे यादवराजाकडील सरदार समवेत यादवराजाहीं दिल्हेश्वरानीपाठविल्या मोगलाचा सरदार लष्करखान अल्लीयदल्‌शाहाकडील सरदार मराठे तुरूक वगैरे देखील मुस्तपखान, काहमदखान् दिलावरखान, याकूतूखान्, अबरखान, मुशेखान, फरीदखान्, सजीखान, जाहेरखान्, अंकुशखान, येकूनदहा. या खेरीज अल्लीयदल्‌शहाचे वडील इभरायीम याचे आप्तसोझिरे सरदार रुस्तुंखान् प्रभृति आणि धुंडीराव ब्राह्मण सरदार, मराठे सरदार घाटके प्रभृति शेनापती मुल्लामअहमदखान या इतुक्या सरदारानिशी सेनापती मुल्लाम अहंमदखानास पुढें करून निजामशाहासी युद्धास प्रवर्तले. वरी लिहिल्या प्रमाणे निजामशाहानी

आपले तरफेचे सैन्य व सरदार राजेलोक इत्यादिकांसीसह अबरखान शेनापतीस पुढें करून अल्लीयदलूशहासीं युद्धकेलें. त्या युद्धांत मालोजीराजाचे लेंक शाहजीराजानी रणशूर होऊन पूर्वी देवासुर युद्धापरी युद्धकरून दिल्हेश्वर जाहगीरपादशाहानी अल्ली-यदलशहास कुमुकास पाठविल्या मोगलाच्या सैन्यास तमामास पराजय देऊन पळविले. त्या बरोबरी मिळून युद्धकेले. ते यादवे राजाची फौजेसहीं पराजय देऊन पळविलें. तसेंच त्या शाहजी-राजाचे भावू शरफोजीराजानी अल्लीयदिलूशाहाचे फौजेशी निर्वाण युद्ध करून त्या फौजेसहीत सरदारासहीं पराजय देउन अल्लीयदलशाहाची फौज तमाम पळविली. पराजयपावून सैन्य समग्र अल्लीयदलूशाहा आदि करून समग्रहीं कित्त्येक दूर पळून गेल्यावरी त्या अल्लीयदलशाहा कडील सरदारापैकी जोहरखान म्हणणार सरदारानें समग्रास इरेस घालून यादवराजे व मोगलाचे सरदार सर्वत्रांसहीं परतून घेऊन पुन्हा युद्धास आले. तेंव्हां मालोजीराजाचे द्वितीय पुत्र शरफोजीराजानी युद्धभार घेऊन शत्रु सैन्याभिमुख होऊन बहुतवेळ बहुताप्रकारें बहुत युद्धांची अंगेकरून बहुतसैन्य शत्रूचेरणास आणून आपणहीं वीरस्वर्ग-पावले. सवेच त्यांचेवडील भावू शाहजीराजानीं आपले चुलत भावू विठोजीराजाचे द्वितीय पुत्र खेळोजीराजास बरोबर घेऊन बहुत पराक्रमेंकडून युद्ध करून शत्रूस ताप देऊन परतून युद्धास आल्या जोहरखानासमवेत कितेक सरदारांसहीं मारून कितेक सरदारांस जीतधरून काराग्रहीं प्रवेश करवून निर्वाणयुद्ध-केल्यांत अल्लीयदिलशाहानीस्थिरून शाहजीराजासीं युद्ध करव-नासें आलें. ते व पढाउ सांपळेसरदार जातां उरलेते सरदार व

यादवराजे प्रभृति सहित छिन्नाभिन्नहोऊन पळोनगेले. तदनंतर शाहजीराजे रण स्वाधीन जाहल्यानंतरें अंबरशेनापतीस पुढें करून निजामशाहा पादशहापासी येऊन खुरनिशी केले. तेंव्हां निजाम शाहानि शाहजीराजास विशेष मर्यादा विशेष बहुमान विशेष आदर केले. तदनंतरें विठोजीराजाचे लेंक खेळोजीराजानी शाहजीराजास झाला आदरमान आपल्यासहीं व्हावा म्हणायाची अपेक्षा धरून शेनापती अंबरखानास केवळ अनुसरले. तेंव्हां त्याशेनापती अंबरखानाचे चित्तीं आपण सेनापती होऊन असूनहीं शाहजीराजानी युद्धांत जय संपादिल्याकरितां पादशहाचे समक्षेमांत आपल्या क्षेमास शतगुणें कडून अधीक मानाई झालेंकी ह्मणावेयाचा मत्सर वाढत होता करितां शाहजीराजाहून खेळोजीराजासी विशेष दिसूनद्यावा ह्मणावयाचा दुराग्रहेंकडून निजामशाहापासी खेळोजीराजाची योग्यता व शौर्यं प्रस्तुत संभवल्या युद्धांत जयजाहला तोहीं खेळोजीराजा मुळेंच म्हणून असें येकंदर जाणवून निजामशाहाकडून विठोजी राजाचे पुत्र खेळोजीराजास विशेष मर्यादा करविले. ते शाहाजीराजानी ऐकून विमनस्क होऊन सर्वेच त्या संगतीचा त्यागकरून आपले स्वस्थल सातारगडास पावले. कित्तेक दिवसानंतर शाहजीराजे निजामशाहाकडून विमनस्क होऊन आपले स्वस्थलास पावला विध समग्र अल्लीयदलशाहास कळून शाहाजीराजा सारिख्यास आपले करावें ह्मणावयाचे अपेक्षेने तदनुसार संविधान केलें. त्या संविधानाची बोली प्रशस्त भासल्या करितां शाहजीराजानी अंगीकार करून अल्लीयदिलशाहाकडे जावून भेटी व बोलणे झाल्यानंतर आपलें सैन्य व

अल्लीयदिल्‌शाहाचे सैन्यहीं येकवटून येथून निजामशाहावरी मोडिम्‌ केले. तेंव्हां पेसजी अल्लीयदल्‌शहासी दिल्लेश्वर जाहगीर पादशाहानी मोगलाईचा कुमुक पाठविलेहोते तेहीं व यादवराजेहीं यादोनी फौजाहीं अगावूच निजामशाहाशी मिळून शाहजीराजानी युद्धकेल्यांत पराजय पावून फरारी जाहले. तेहीं व यादवराजे मोगलाचे इलाखेंत राहून गेले. प्रस्तुत शाहजीराजानी अल्लीयदल्‌-शाहाचे सैन्य मात्र आपल्या सैन्याबरोबरी घेऊन निजामशाहावरी युद्धास जाऊन युद्धकेल्याठायीं निजामशाहाचे सैन्य व सेनापती अंबरखान देखील पराजय पावून वाताहत झाले. शाहजीराजे जय पावून अल्लीयदिल्‌शाहाकडे आले. तेंव्हा शाहामजकूरानी फार संतोप पावून शाहजीराजास आपले अर्ध राज्य जाहागीर दिल्हे. तदनंतरे शाहाजी राजे अल्लीयदलशाहाचे स्वाधीनेंत न्यायता होते. ते मुदेखान प्रभृतीस येवंदूर जिंतून स्ववशास आणून पश्चिम प्रांत केरळदेश आदिकरून अनेक देशाचे देशाधिपती समग्र अल्लीयदल्‌शाहास तोफा देइजेसे करून अल्लीयदिलशाहाच्या खजान्यास बहुत द्रव्य जमा होईजेसे केलें. तदनंतरे शाहजीराजे विजयदुर्ग म्हणावयाचे विजा-पुरांत असतोदिवसांतच त्यांची दुसरी स्त्री जिजाईचे उदरीं शाली-वाहन शकें १५४७ अक्षय संवत्सर प्रथम पुत्र संभाजीराजे जन्मले. त्यामागूनही क्रमेंकडून चौघे पुत्र जाहले. परंतु वर्धमान दशेस पावले नाहींत. ऐसें असतां देवदुर्गेचे राज्य करणार निजामशाहाचा सैनापती शाहजीराजासी मत्सर केला. तो अंबर-खान देवगतीस पावला. येथें विजापुरांत अल्लीयदील्‌शाहाचा बाप इब्राईमखान तोहीं देवगतसि पावला. तेंव्हां दिल्लेश्वरऐसा जाह-

गीर पादशहाने पेसजी आपण दक्षिण प्रांतांत देवदुर्गाचा निजां-
शाहासहीं व विजापुरच्या अल्लीयदील्शाहासहीं लढाईची प्रसक्ती
पडली होती तेंव्हां अल्लीयदिल्शाहास कुमुक मोंगलाईची फौज
देऊन लष्करखानास पाठविला. तेंव्हां निजामशाहाने शाहाजी-
राजाच्या बलेंकडून अमुचे मोगलाईच्या फौजेस मारून कांही
अपमान केला. आतां त्या निजामशाहाकडे शाहजीराजेहीं
नाहींत व यादवराजाहीं अगोदरीच निघून गेला. त्याचा सेनापती
अंबरखान देवगतीस पावल्याकरीतां त्याचें बलहीं उणें पडलें.
दुसरें त्या निजामशाहाची चर्याहीं नीटनाहीं ऐशा समयांत
याजवरी राजकारण केलींया स्वाधीन होईल म्हणून तजवीज
करून निजामशाहावरी युद्धाससैन्य देऊन दर्याखान म्हणणार
सर्दारास पाठविले. हेवर्तमान निजामशाहास कळून निजाम-
शाहानी आम्हाकडील शाहजीराजे व यादवराजे उभयतांहीं
आम्हांकडून गेल्याकरितांम्हणे पराजयहीं आला; आतांहीं दर्या-
खानाने चालीकेली आहे, आतां सर्वप्रयत्नकरून शाहजीराजे व
यादवराजे उभयतांसहीं बलाऊन घ्यावे म्हणून दृढयोचना करून
उभयतांसहीं अंतरंगें कडून संधिवान पाठविले. त्यावरून
यादवराजे मोगलाचे इलाखेंत होते तेहीं व शाहजीराजे विजापु-
रांत होते तेहीं उभयतां निजामशाहाचा मुलुक् देवगिरी समीप
धारागिरी म्हणावयाचे स्थलास येऊन पावले. त्या धारागिरी
समीप शिवनेदीगड म्हणून येक स्थल, त्या शिवनेदीगडचा
यजमान विश्वासराव याचा वंशांत जन्मलते विजयराजा म्हणणार
त्या शिवनेदीगडचे राज्य करीत होता. त्या विजयराजानी आपुली
कन्या जयंती बाई म्हणणारीस शाहजी राजाचे ज्येष्ठ पुत्र संभा-

जीराजास देतों म्हणून सांगून पाठविले. तेव्हां शाहजीराजानी त्यामुलीस आपुले पुत्र संभाजीराजासहीं घटितपाहून तदनंतर विजापुरांतून आपल्या संसारासहीं बलावून पाठवून शिवनेदी-गडास जावून संभाजीराजाची लग्न सिद्धी केले. तेंव्हां निजामशहानी शाहजी राजास मोगलाची फौज घेऊन येणार दर्याखानावरी आपल्या स्तोमकडून जा म्हणून निरोपून यादव राजास आपल्या भेटीस या म्हणून बलावून पाठविले. तेंव्हां शाहजीराजाची दुसरी स्त्री जीजाई बाईसाहेब पूर्ण गर्भहोते. त्यांस व कित्तेक सैन्यहीं त्यांचे संरक्षणास शिवनेदी गडांतच ठेऊन वरकड सैन्यानिशी आपण दर्याखानाचे मोकाबिलेस गेले. गेल्यांठांयीं दर्याखानासी युद्ध करून मोगलाची फौजा समवेत दर्याखानास पळवून जयपावून शाहजीराजे परतून शिवनेदी गडास येतोइतुक्यांत जीजाईसाहेब यांस पूर्णगर्भहोता तो शालीवानशके १५५१ त्यास इंग्रजी वर्ष सन १६९८ इसवी प्रमोदूत संवत्सरी प्रसव होऊन पुत्रोत्सव जाहला. सर्वेच शाहजी साहेब यांचे पोटी पुत्रसंतान जाहले. त्या पुत्रास येकोजीराजे म्हणून नाव ठेविले. हे येकोजीराजे वंशांत चार येकोजीराजे जन्मले. ते शालीवाहन शके १५५२ प्रजोत्पत्ती संवत्सर पेसजी शाहजी राजानी निजामशाहाचे सहायास्तव शिवनेदी गडांत आपला संसार ठेऊन मोगलाचा सरदार दर्याखानावरी जाऊन लढाई करून त्या दर्याखानास पळवून आले होते कीं तो दर्याखान शाहजीराजाकडून पराजय पावून माघारला. तो पलीकडे न जातां तापीनदी तीरींच आपल्या फौजेनिशी राहिला होता. त्यातें या निजामशाहाची अव्यवस्थ स्थिती व

यादवराजे स्वर्गस्थ जाहलें तो विध शाहजीराजे निश्चयेकडून विमनस्क होऊन स्वस्थलास जाऊन पावलें ते ऐसें हे समग्र कळून घेतल्यावरी आतां निजामशहाचें राज्य स्वाधीन करूये म्हणावयाचें दृढबुद्धीनें निजामशाहावरी चाली करून आला. त्यादिवसांत निजामशाहा देवगिरीदुर्गसोडून धारागिरी दुर्गांत होते. निजामशाहा वडील यारीतीचें वर्तमान यकंदर अली-यीदिल्शाहास कळून याउपरी निजामशहाची दौलत राहणार नाहीं. तो मारलातरी पडावुतरी जाईल परंतु धारागिरीचाकिल्ला फार मजबूत तैसाकिल्लां दर्याखानाचे हातास लागल्याने तो असल्यास नित्यनूत शल्य होईल यास्तव तो धारागिरीचा किल्ला आपल्या स्वाधीन घ्यावाह्मणून अल्लीयदिल्शाहा अपल्या फौजे-निशी चालेकरून धारागिरीवरी आले. ही बातमी दिल्लीस पावली तेव्हां दिल्लीचे तक्त जाहंगीर बादशाहास होते त्यानी देवगतीस पावून त्याचे बलदायक अलंगिरी बादशाहा ज्यास प्रतिनाम अवरंगजब ह्मणूनहीं ते अवरंगजब निजामशाहानी पादशाहा आपली करावी ह्मणून सर्वत्र निघून आले. हे बातमी समग्र शान्तजीराजास पावली. त्यानी हे कोणत्यास जातें पाहूं ह्मणून आपल्या स्थलीच राहिले. तेव्हां अवरंगजेबानी आपल्या वडिलांकडून प्रेषितहोऊन आला ऐसा दर्याखानासहित धारागिरी-च्या किल्यावरी येक्याबाजूस मोरचे देऊन युद्धकेले. तैसेंची एक्याबाजूस अल्लीयदिल्शाहानी मोरचे देऊन युद्धकेले. त्यांत निजामशाहाचा निर्वाह नाहीसा दौलत समग्र बुडून जाऊन आप-णहीं औरंगजेबास स्वाधीन होऊन गेला. सवेंच त्या अवरंगज-बानी अल्लीयदिल्शहाशी युद्धकरून पळवून आपण देवगिरी दुर्गांत

स्थाई होऊन राज्यपरिपालन करूंलागले. तेंव्हां सातारगडांत हातेते शाहजीराजे यानी केली तजवीज जंवरी निजामशाहा अपल्या दौलतेनिशी होते तंवरी अल्लीयदिल्शहा दिल्हेश्वर ऐसा औरंगजबासी मिळून होते. प्रस्तुत धारागिरीदुर्गानिमित्त अल्लीय-दिलशाहास औरंगजबासी विरोध प्राप्त झाल्या करितां अवरंगजब आपल्या फौजेनिशीमात्र राहिले. या उपरी अल्लीयदिल्शहाची अवरंगजबाची मिळणीहोणेनाहीं करितां अपल्यास पेसजी निजा-मशाहाने जाहगीर दिल्ही तो देश आता आपण साधूये ह्मणून निश्चय करून आपुल्या जाहगीरच्या देशाचें व्याज करून देव-गिरीदुर्ग राज्याखालील ऐशी दुर्गेहीं शाहजीराजानी साधून आपुले केले. तेव्हां शाहजीराजाची दौलतेची व शौर्याचेहीं अधिक्यता पाहून इतर राजे व सरदार शाहणौकुलाचे ह्मराठे होते ते समग्र शाहाजीराजासी मिळालें. त्या शाहणौ कुलाचा विस्तार थोडा जाणवितो. जो छत्रियवंश सूर्यांपासूनहा चंद्रा-पासूनहीं ब्रह्मदेवापासूनहीं वृद्धीतें पावला म्हणून भारत, भागवत, हरिवंश, रामायण हीं ग्रंथांत विस्तारें सांगीतलें. त्यांत सकल वंशासहीं मुख्य मूल ब्रह्मदेवापासून अलीकडे चंद्र सूर्य हे समग्र कारण जाहले. तत्रापि ब्रह्मवंश व सूर्यवंश व चंद्रवंशाचे राजे येकास येक मिळणीही आहेकारितां, मुख्य ब्रह्मवंशांत मरीच त्यापासून कश्यप त्यापासून सूर्यनारायण त्यापासून वैवस्वत मनू त्यापासून उत्तानपादराजाचे संततींत दांभीकराजा त्याचे सहा लेंक त्यापासून राजवंश झाला आहे. तैसेंच सूर्यवं-शांत रामचंद्राचे लेंक कुशलवापासून वंश विस्तारला आहे. तैसेंच चंद्र वंशांत चंद्राचा लेंक बुध त्याचा लेंक आयु त्याचालेक नहुष

याचालेंक ययाति त्यापासून पुरूराजा त्यापासून राजवंश विस्तारला आहे. त्या त्रिवंशापासून विस्तारिली क्षत्रियकुलें शाण्णौची नावनिशी "भोंसले, घोर्पडे, लिंबालकर, जाप्त्याप, नळवेंदे, किकाडो, शदे, साखत, निककाकड, फडके, माने, इदलकर, भिसले, मोहिते, शिरके, फडतरे, काळे, पुंवार, होलकर, वणगे, रणनवरे, अटाले, पाहतसे, करजादाळे, पोलवा, फडसाळ, खेडगळे, बहुगुण, मोरे, साबत, सूर्यवंशी, सोमवंशी, यादव, मस्तके, लोखडे, शिगाडे, दळवी, घांटके, सनगर, गायकवाड, दवकर, जाधव, सोनवणें, लांडर, उदारे, पिंसाळ, विरज, राय, जाहे, भाडलकर, गुजाठे, शिशोंग, शिरसाठे, भानदुर्ग, काडे, कराडे, गाळिंगरूड, गावाडे, दुमाल, रणपिशका, पुशे, मठले, टोके, गुजर, खडटोन, कुराहे, शलके, शिलार, गाडे, काटकर, महडीक, वानिवरे, वितरे, वाघमारे, वाघचवरे, वाघ, कल्पाडे, शितोले, शिकरे, वावर, इगवळे, नारदिवे, बोधळे, बरूगर, इंसाफ, आहारकर, अवोर, दुनमोताटे, लगठ, लगड, कल्याण, करटोंवर, शंकर, बालके, येणेप्रमाणे तमाम मराठे सरदार शाहजीराजासी मिळाले." तेणेकडून शाहजीराजाची दौलत अधिक वाहडली. हे वर्तमान दिल्हेश्वरास पावून त्यास केली तजवीज येणेप्रमाणे होणेस मुख्य कारण अल्लीयदिल्शाहास आह्मी पळविल्या करितां जाहले. यास्तव आतां अल्लीयादिल्शाहा अह्मी येकमत होऊन शाहजीराजास उणें करावें ह्मणून दिलेश्वरऐसे अवरंगजेबानी तजवीज करून अल्लीयदलशास संविधान करून येकहोवून उभयतांहीं शाहजी राजासीं युद्ध योजून भीवरातीरी येऊन उतरले. तेव्हां,

शाहजी राजानी, तमाम यवनास मारून निर्नाम करितों ह्मणून तीनवर्षे युद्ध केलें. तेव्हां शाहजीराजाचे आराध्य दैवत स्वप्नांत येऊन तुजकडून यवनाचा नाश होतनाही ते कारण पुढे कित्तेक दिवसा नंतर तुझे लेंकाकडून होणार करितां अतां यवनाशीं संधी करून घेणे ह्मणऊन आज्ञापिले. त्याईश्वर वचनाचा अंगीकार करून शाहजीराजानीं नूतन निजामशाहाचे मुल्क आपण बांधिला तो समग्रदिल्लेश्वर अवरंगजब व विजापुरचे अल्लीयदल्‌शाहा उभयतास वांटूनदेऊन सोडून आपण आपल्या स्वराज्य साताऱगड नगरांतच राहिले उपरी कित्येक दिवसानंतरे अवरंगजेबास व अल्लीयदिल्‌शाहासहीं विरोध पडला. तेंव्हां अल्लीयदिल्‌शहानी शाहजीराजे आपले वडील इभराईमखानाचे स्नेहित आणि शूरहीं जाहल्या करितां आतांहीं त्याचास्नेह राखावा ह्मणून शाहजीराजास बलावून पाठवून बोलून आपल्याकडील सरदार रणदुल्लाखान ह्मणणारास बरोबरी देऊन दक्षिण प्रांतचे राज्य वगैरे अवरंगजबास तोफा देणार समग्रास स्वाधीन करिणे ह्मणून पाठविले. शाहजीराजे तेणेप्रमाणे निघून दक्षिण प्रांतचे राजेलोकांस जिंतले नावनिशा—येल्लीजपूरचाराजा वीरभद्र, कोंगदेशाचाराजा कोंगनायक, कावेरीपट्टणाचाराजा जगदेव, श्रीरंग पट्टणाचाराजा कंठीरव, तंजापुरचा विजयराघवराजा, चंदीचाराजा वेंकठनायक, मधुरेचाराजा तिरुमल नायक, वालींगुडापुरचाराजा अरिकाल वेंकटनाईक, विधानगरचाराजा रंगशायीनायक, ईसकूटपुरचाराजा तन्नोगोडनायक, वरकड पाळेपट्टचे राजे कित्तेक याइतुक्या राजांसहीं जितून करभार यापासून घेतला. तो समग्र अल्लीयदिल्‌शाहास पाठविलें. तेणेकडून शहाम

जकूर फार संतुष्ट होऊन नूतन बेंगळूरचे राज्य आपण स्थापिले-होते ते पांनसुपारीस शाहजीराजास जाहगीर दिल्हे. शाहजी राजानी बेंगळूरास येऊन पाहतेवेळेस किल्ला मजबूत स्थळहीं वासयोग्यसे भासल्याकरितां सातारांतून संसार तमामास बलावून पाठवून घेऊन आपण बेंगळूरींच वास्तव्य करून शिवाजीराजे व येकोजीराजे उभयतांस सकल विद्याभ्यास करविले. तेव्हां शिवाजीराजे यांसी बारावर्षाचे वय झाले. शूरहीं जाहले. त्यास मधीं शाहजीराजास स्वप्नांत श्रीसांबशिवानी येऊन शिवाजीराजास येथे ठेऊन घेऊ नका याकडून उदंड कार्य होणार आहे त्याकरितां यास सातार पुणे प्रांतास पाठवूनद्या ह्मणवून आज्ञापिले. तेव्हां शाहजीराजानी जेष्ठ भार्येपासून जाहली संतती येकोजीराज जाहले करीतां वयानी धाकुटे झालेतरी मातास हेच वडील ह्मणून आपले युवराज्यपदं व बेंगळूर तक्तहीं शके १५६२ विषु संवत्सरी देऊन आपली बिरुदें समग्रहीं येकोजीराजास देऊन आपले कुलदैवतहीं येकोजीराजास देऊन शिवाजीराजास सातार पुने प्रांताचे राज्यास शके १५६२ विषु संवत्सरी तक्तबांधून पाठविले. तदनंतरें शिवाजीराजे सातारगडास पावून अजूबाजूच गड किल्ले दुर्गं कित्त्येक बाछाई मुलुकचे बांधून राज्य करू लागले. शाहाजीराजे बेंगळूरीच होते. त्यांस अल्लीय-दिलशाहानी दोनतीनदा बलावून पाठविले. त्यास शाहजीराजे निराकारण करूंलागलेशेच होते त्यावरून अल्लीयदल्शाहास शाह-जीराजे बलाविलीयां येत नाहींत; त्यांचे लेंक शूर होऊन बाछाई मुलुक बांधीत बसले आहेत. पहिलेपासूनच शाहजीराजे शूर, आतां त्यांचे पुत्रहीं शूरच जाहल्याकारितां शाहजीराजे चढूनगेले

आहेत म्हणावयाच्या वैषम्याने कपटेंकडून शाहजीराजास धरून कैद करावे म्हणावयाची योजना करून मुस्तफखान नाम सरदार मोटा कपटज्ञ त्याला पाठविणेचा निश्चय करून त्या बरोबर दिलावरखान फरीदखान हैवती राजाचालेंक बल्लाळराजा मसूदखान,अज्जमखान,सजारखान,राघवराजे झराठे,यादुहखान, बाजीराजे झराठे, अंबरखान, वेदाजीभास्कर ब्राह्मण, जोहरखान कण्णरचा प्रतिनाम कन्नोळ यासरदारास बरोबरी देऊन हरउपाय करून शाहजीराजास जीत धरून अणावे म्हणून सांगून मुस्तब खानास बेंगळूर प्रांतास पाठविलें. तो मस्तबखान बेंगळूर प्रांतास येऊन शाहजीराजास सांगून पाठविलाजे अल्लीयादिल्शाहा बाद-शाहा कडून अन्यत्र कार्यास्तव आज्ञापितहोऊन मी आलों आहे. त्यास तुम्हांसी भेटून तजवीज करून मग कशास प्रवर्तणेस निरोपिले आहेत करितां अगत्य भेटीसयावे बोलणे आहे म्हणून सांगून पाठविला. तेंव्हां मुस्तफखानाची कपट योचना शाहजीराजास जाणवली तरींहीं आम्ही बाछायर्ताचा मर्यादेस उणें कां करावे याच्या कपटानें काय होणें आहे, पाहूनयेऊं म्हणून येकोजीराजे यास अधिपत्य समग्रही दिलेहोतें. परंतु, त्यांचें वय लहानझाल्या-करितां यांचे व दूर्गांचेंहीं संरक्षणास ज्येष्टपुत्र संभाजीराजास ठेऊन आपण समागम घेतले सरदार खंडोजी म्हणून मानामा-नाजी म्हणून, तानाजी म्हणून बंधूजी, मांडवलकर, दशदीत म्हणून, मेघजित म्हणून, हे सातहीं शूर व आप्त जाहल्याकारित यांस घेऊन मुस्तबखानाचे भेटीस गेले. तेंव्हां कित्येक अपशकुनहीं जाहले. परंतु त्याची परवां करीनासें जाऊन पावले. तेंव्हां मुस्तबूखानाने फार मर्यादेने भेटी घेऊन उदंड

उपचार करून आणखी अपल्यास तजवीज करिणे आहे करितां दाहा पंधरा दिवसाचे कामास आपण येथेंच उतरावें म्हणाले. येणेप्रमाणेच शाहाजीराजानी या समीपच स्थलांत आपले डेरे देऊन उतरले. मुस्तभखानाने शाहजीराजास पातेरा होईजेसे स्नेह नित्य नूतन वाहडवीत आला. परंतु राजे यास विश्वासले नाहीत. बाहेरंगास आपलें कपट राजास कळलें नाहीं म्हणून मुस्तपखानास भासावें यानुसार होते. तेव्हांहीं राजाचे डेरांत अपशकुन चिन्हेंच उदंड दिसूं आली. त्यावरून ते स्थल त्यागून राजानीं आपल्यादुर्गांत येऊन पावले. दैवप्राबल्यास्तव येथेंच राहिले तेव्हां मुस्तबखानानें येकेदिवशी रात्री आपल्याबरोबरी आल्या सरदारास शाहजीराजाचा डेरा घेरून घेणेस निरोपून आपणहीं त्यांचा पाठीराखा होवून शाहजीराजास ही सूचना कळली नव्हती करितां आपल्या सरदारानिशी डेरांत सुख करीत होते. येकायेकी अर्धरात्रीं डेऱ्यास सर्दारलोकानी येऊन घेरून घेतले वर्तमान राजाकडील सर्दारानी राजास उठऊन सांगीतले. तेव्हां राजे हुशार होऊन घोड्यावरी स्वारहोऊन आपले सर्दारानिशी युद्धाभिमुख होऊन युद्ध केलें. तेव्हा बहुत लोकास जायांकरून फारवेळ युद्ध केलें. शेवट खानमजकूराकडील सर्दार बाजीरायांसी युद्ध करीतांना बाजीरायांचाहात चालून शहाजीराजे जखमीहोऊन घोड्याखाले मूर्छागत जाहले. सर्वेची बाजीराजे व मुस्तबखानही शाहजी राजाजवळ येऊन राजास अनेक उपचाराने मूर्छा सावध करून जखमहीं बांधून राजास अंबारींत बसवून विजापूरास अल्लीयदिलशहाकडे पाठविलें शके १५७०. शाहजीराजाचे ज्येष्ठ पुत्र संभाजीराजे बेंगळूरीं होते. त्यांस मुस्तफखानानें केलें कृत्रिम व

शाहजीराजास विजापुरास पाठविले वर्तमान साद्यंत कळून संभाजी राजे मुस्तबूखानासी युद्धास तयार झाले. इतक्यांत मुस्तबूखानाने बेंगलूर किल्ला साधावयाचे तात्पर्येंकडून युद्धास आला. उभयतांस युद्धलागले. हे वर्तमान समग्रहीं शीवाजीराजास कळून त्यानी शेना सन्नद्ध करून अल्लीयदिल्शाहावरी चाले करिणेस शिद्ध जाहले. या दोठांयींचे वर्तमान अल्लीयदिल्शहास कळून अल्लीयदिल्शाहाने बेडराचा यजमान बल्लाळ, फत्तेखान, मुझेखान, या तीघे सरदारांस युद्धसन्नाह, व सेनाहीं देऊन शिवाजीराजानी पादशाहाहीं गड किल्ले बांधिले. तेसमग्र सोडून शिवाजीराजे आहेत ते स्थल पुरंदरगडास पाऊन शिवाजीराजास हस्तगत करिणे ह्मणवून निरोपून पाठविले. उपरी त्या त्रिवर्ग सर्दारानींहीं शिरोबल ह्मणावयाचागड शिवाजीराजानी आक्रमिला होता तो घेऊन तेथें बेडराचा यजमान बल्लाळास ठेऊन, फत्तेखान्, मुसेखान दोघेहीं शिवाजीराजे होते त्या पुरंदर गडास वेढा दिल्हे. तेंव्हां शिवाजीराजानी आपले शेनापती भीम ह्मणणारास बलावून फार रागाभरून याक्षणीं तुह्मी जावून शिरोबलाचा किल्लाघेवून ठाणे ठेवून येणे ह्मणवून निरोपून अपण फत्तेखान हुशेखानासीं युद्धास सन्नद्ध जाहले. भीमशेनापती जावून शिरोबलाचा किल्यास वेढून चहूंकडे मोर्चे देवन तोफखाना नवीबाणाचा मार केले. तेंव्हां बल्लाळाकडील सैनीक समग्र डोसकें दाखविनासें किल्यांतच दडाले. भीमसेनापतीनी चहूंकडून किल्ला पाडून हल्ला करून आंतशिरून खत्तल करिण्यांत बल्लाळासहीं मारून टाकून किल्ला स्वाधीनकरून घेवून आंत आपलें ठाणें वसवून आपण निघून शिवाजीराजाकडे आले.

त्यानी पावल्या अगोदरी फत्तेखान, मुसखान, उभयता
फौज तयार करून घेवून पुरंदर गडावरी हल्लाकरून फौजचंद्र
गेले. तेंव्हां शिवाजीराजानी वरील किल्यांतून जबर मारकरू
कित्तेक फौजेकडे लोट करून कित्तेकांस तोफाने व भांड्याने
बचीने व तरवाराने मारून व शीशें तावून ओतून ऐसा जब
पार करून हल्ला परतून सोडविले. तदनंतरें दुसराकित्ता फत्ते
खान हुशेखान अपल्या फौजेनिशी संधीपाहून येकायेकी पुरंदर
गड तमाम चढून जावून किल्याचा दरवाज्यास जावून लागले
तेव्हां शिवाजीराजे अपल्या जवळील थोंडे लोकानिशी बाहे
निघून अपल्या अंगेकडून महायुद्ध करून फौज तमाम मारू
काहडून आल्या दोघे सरदारां पैकी हुशेखानासही मारूनटाकिले
फत्तेखान पळून गेला. त्या बरोबरी त्याची फौजहीं गेली. तं
उपरी शिवाजीराजे बाहेर निघून सेनासन्नद्ध करून अल्लीयदल
शाहावरी जाणेस सिद्ध जाहले. इतक्यांत शिरोबल दुर्ग साधू
भीमशेनापतीही येवून पावले. ऐसे असतां चित्रकल्लदुर्गा
राज्यकरणार विम्मकत्तीभरमा म्हणणार मोटाशूर त्याची शे
समीप राहावयाचें स्वार उजव्याबाजूस तीनी हजारस्वार त्या
तरवारीस मेण सेन्याचे डाव्याबाजूस तीनहजार स्वार—त्या
तरवारास मेण रूप्याचे त्याखेरीज मार्गे पुढील जिलेबचे वेगले
याखेरीज चित्रकल्लदुर्गाचे प्यादे फार जबरदस्त तैसे प्यादेह
त्याकडें फार. या सैन्हानिशी त्याने सर्वदा अल्लीयदिल्शाहा
मुलूक व विजापुरची पेट देखील मारून लुटून घेवून जाणे ऐ
बहुतदा करीत आला. तो त्या कित्त्यासहीं पहिल्या प्रमाणें
जावून विजापुरची पेट लुटून गेला. तेंव्हां अल्लीयदिल्शहा
तजवीजकेलीजे दाक्षिणेकडे बेंगळूरास मुस्तबखानास पाठविल

जे करितात्ती परंतु संभाजीराजे स्ववशास यावयाचे दिसतनाहीं. चित्रकल्लदुर्गाचा भरमा विजापुराची पेट देखील मारून लुटून घेऊन जातो. पुनेप्रातास मुसेखान व फत्तेखानास पाठविल्यापैकीं शिवाजीराजानी हुसेखानास मारून टाकिले. फत्तेखान सर्वस्वहीं गमावून जीवानिशी येऊन पावला. आता शिवाजीराजे फौज तयार करून विजापुरावरी चाले करावयास सिद्धजाहले आहेत. शिवाजीराजे वरप्रसादी आणि त्यरहीं कोठें गेल्याहीं जयच पावणार तशानीं चाले करून आल्यावरी विजापुरचा विचारही संशयांत आहे करिता यास मुख्य योचना करून शाहजीराजास कबूल देऊन मोकले करून यांकडून हे राजकारण यकंदर थोपावें ह्मणवून दृढयोचना करून शाहजी राजास कैदेंतून मोकळें करून भेटीस बलावून शाहामजकूरानी म्हणाले राजेहो तुम्हास व अमचे वडील इब्राहीमखानासहीं बहुता दिवसापासून स्नेह तुम्हाकडून इब्राहीमखानासही उदंड कामें जाहली इब्राहीमखानानी तुम्हास बहुत उपकार केले. प्रस्तुत अम्हीहीं तुम्हास तसेच चालविले. तुम्हास दक्षिणप्रातास आम्ही पाठविल्यास तुम्ही सागीतल्याप्रमाणे काम मात्र केलें. परंतु तुम्ही अम्हापासी न येतां बेगळूर जाहगीर तुम्हास दिल्याकरीता संसारहीं आणवून तुम्ही तेथेंच राहून गेलां. तुम्ही अम्हाजवळी असावें म्हणून तुम्हास बलावणेस्तव मुस्तफखानास पाठविलों. त्यानी वेवळ्याच रीतीनें तुम्हास फाठविले. असो, आतां ते कोपातें मनी धरूनका आतांहीं तुम्हास अम्हास संधी हेच कीं—तुमचें पुत्र शिवाजीराजे यानी अमुचे शिंव्हगड घेतले आहेत ते गड आमुचे आम्हास सोडून द्यावें तुमचे ज्येष्टपुत्र संभाजीराजे बेंगळूरात

असून मुस्तफखानाशी भाडताती त्यास व तुमचे संसारासहीं सातारासी बलावून घेऊन बेंगळूर सोडून द्यावें. तिसरें चित्रकल्ल दुर्गाचा भरमा फार लबाडी करितो त्यावरी मोहिम करून त्याला स्ववशास आणावें म्हणाले. या तीनी गोष्टीसही शाहजी· राजानी अंगीकार करून उभयता पुत्रास लिहून पाठवून शिंव्ह-गडहीं सोडविले. व संभाजीराजे व येकोर्जीराजे उभयतां संसारासहित सातान्यांत येवून राहणे म्हणवून बेंगळूरहीं सोडून दिल्हे. आपणहीं फौज तयार करून भरम्यावर चालेकरून गेले. शाहजीराजे चित्रगल्ल पावले तेंव्हां भरमा बागामध्ये माशाची शिकारी खेळत होता. त्याला त्याकडील लोकानी अल्लीयदल्शा-हानी फौज पाठविले आहेत. त्या फौजेंत शाहजीराजे येताहेत म्हणून सांगीतले. तेंव्हां भरमा आपुला बिरूदाचा घोडा आण-ऊन स्वार होवून वरिलिहिल्याप्रमाणें सन्नाहहीं बरोबरी घेऊन युद्धास आला. शाहजी राजानी त्यासीं चांगले युद्ध करून आपले हातानेंच त्याला मारून भरम्याचें डोसकें कापून रुमालांत बांधून घेतले. त्याच्या घोडयाची बिरुदें ताजवस ज्याव तोडेहीं तीनी-बिरुदें काहडून घेवून त्याची फौजहीं कित्येक लुटून घेऊन राजे विजापुरासी पावून अल्लीयदल्शाहा समोर भरम्याचे डोसकें व त्याचा घोडयाची बिरुदे तीनीही ठेऊन खुरनिशि केले. तेंव्हां अल्लीयदल्शाहा अत्यंत संतोष पावून त्यानी आणिली बिरुदें त्यांसच देवून आपल्या सकळ बिरुदांनिशी भरली सदर शाहजी-राजास बकशीस केले. सदर बकशीस केल्यांत शाहजीराजास लाभली वरतू हीरवा मखमली डेरा, जिलेबाचा तास नगारा, येकट रुदेचा हिरवा मखमली चांदनी, सोन्याचे कलशासहित

सोन्यारुप्याच्या अंबाऱ्या हत्ती सहित, जिलेबेचे सदरेंतील नंगीसंशेरवाले बाछाईचे बाजूचे विचकत्तीचे भरम्यास मारून घेतली घोड्याची बिरुदें, नव्हतां बाछाईचे सदरेंतील जिलेबेचे घोडयाची बिरुदें घोड्यासहीत ताजवस ज्याचा हुंमादेखील मोहिमरत व चंद्रसूर्य वाद्य, सोन्यारुप्याची चोरखणी डेरा, हिरव्यामखमलीची सदरेचा थोर्ला व पत्रापडदे जगाली त्याचे रेशमी तमवे, त्या डेराचे पांय, त्या चडते ठायींचा चांदनी हिरवी मखमली व त्याचे हिरे जडित त्याचे कलशदेखील व रेशमी तिवाऱ्या तक्त खासजीच्या पांयाच्या त्यावरी घालावयाच्या सुजन्या देखील व डेरा खालील सुतर नळ्यांच उंठ व हिरव्या सखलातीचे निशानाचे हत्ती व सोन्यारुप्याचे मोलाम्याचे पाखरा व दातास लाविल्यासनिना हिरवे मखमलीचे शेरेमाशेसहीत पाऱ्याचेहत्ती इतुक्या सन्नाहानिशी भरली सदर बकशीस केले. ते समग्रहीं शाहजीराजे पावले. शाहजीराजे तो बहुत मान समग्र पावून अलीयदल्शाहाचा निरोप घेऊन सकल बिरुदें विशेष संपदेनिशी साताऱ्यास आपले संसारांत पावून सुखी राहिले. आतां शिवाजी राजाची प्रख्यातता झाल्याचा विस्तार जाणवितों. आपुले वडील शाहजीराजे यानी अलीयदल्शाहा पासून मोकळीक होणेस्तव लाभलें राज्य देखील सोडून साताऱ्यांत येवून राहिल्यावरी शिवाजी राजे पुरंदरगडांत होते. त्यानी अपला मंत्री सुवर्णनामक ब्राम्हण त्यास सोनाजीपंत म्हणून येक त्यास बलावून येकांती· सांगीतले जे अमुचेवडील शाहाजीराजे परम शूर आणी योगवंतहीं त्यानी केली कामेंहीं निर्मळ मनेकडून केले. परंतु त्यांत थोडा भाव सूचतो. तो काय

म्हणजे प्रथम निजामशाहा संगतीस होते ते अलीयदिलशाहाचे बोधनेवरून त्याकडे आले. परतून निजामशाहानी बलावितांच त्याकडे गेले. पुन्हा अलीयदिलशाहाकडेहीं आले. ऐशा दोनी तीनी येरधारा जाहल्या तशाचे संगतीस जितके दिवस होतेकीं त्या त्याची कामें निर्वंचन करून करूनहीं त्यां त्यांस यांचेठायीं कपटच भासावयाजोगें जाहले. परंतु आपले म्हणून विश्वास धरावयास ठाव नाहींसें जाहले. त्यां त्यांस त्यां त्यांना कार्य करण्यावांचून सरनाते कार्यास यांस आपले करून घेऊन कार्य शेखर करून तदनुसार मान बहुमान केले. येवढच परंतु मनेंकडून हे आपले म्हणून मानावयाजोगी करणी वडीलां कडून घडली नाहीं. ते कैशी म्हणजें थोरमनुष्यानी येकाची संगती धरिल्यावरी त्याशी विगडताच नये कदाचित् विगडावयाजोगे (संभवलेतर) परतून त्यांशी मिळूनये. हे तो प्रसिद्ध नीति असतां या रीती चालून बोलेइतुक्यासहीं वडील अंगेकडून शूर आणि निर्वचनेंकडुन वर्तल्या करितां कृत्रिमी यवनापासून वडिलांस ईश्वर राखिले. आम्ही प्रयासाने घेतलें सिंव्हगडहीं व आपण बहुत प्रयासेंकडून संपादिले बेंगळूरहीं यवनास सोडून देवून सातार्‍यांत येवून राहिले. आतां त्यांस वृद्धाप्य दशाहीं आली. याउपरि आम्हास सुचल्या बुद्धीनुसार जावें. अलीयदलशाहाकडे वडिलांनी अनेक प्रयास केले; तरीहीं त्यांचे चित्तांत अम्ही जडजाहलो; अम्हास तोडावे म्हणूनच आहे. तसेच निजामशाहाचे राज्य बांधून घेवून देवगिरीदुर्गांत आहे त्या अवरंगजबासहीं आम्ही येक शल्य होवून आहों. आम्हास तोडावे म्हणावयाचेंच आहे. हे दोन प्रबलशत्रूमध्ये अम्ही पुरंदर-

गडांत असून राज्यकरावें म्हणिजे अम्हास कदापी चाल
णार नाहीं. येखादेवेळेस दगा करून अम्हास बुडवती
याकारीतां अम्ही बाहेर निघून यादोघांसहीं अवरावें तेंव्हा
अमचा टिकावा होईल, हे तजवीज तुम्हास मानेत काय म्हणू
विचारिल्यास त्यानी उत्तर दिल्हे जे महाराजानी केली तजवी
इतुकीहीं खरीच. प्रस्तुत महाराजानी योजिलें कार्यहीं करावे
ईश्वरहीं साह्यहोईल म्हणून त्यानी जबाब दिल्हा. त्यावरून मह
राज शिवाजीराजे फौजेची संजोगनीत्व यवनावरी राजकारणा
प्रवर्तले. तो विध प्रथम अम्ही या दोघानीहीं सर्व प्रयास केल्याह
त्यांचा यत्न चालेना त्या ठिकाणी राहून मग वरकड तजवीजे
प्रवर्तावे म्हणवून स्थल परामृश केल्याठायी पश्चिम प्रदेशीं विरा
देशांत साघपर्वताचे घाटाखाले पश्चिम समुद्रतीरासमी  दे
लोहपर्वतप्रांतीं प्रतापगडास समीप जयवल्ली नगर आहे तेस्थल
बहुत कुवल. तेथें कोणाचाहीं लाग नाहीं. वाटेस घाटहीं कुब
करितां तेस्थल आक्रमावेतरी वाटेस बहुत राजे आहेत. ते राजे
समग्र अल्लीयदल्शाहास ताफा देणार, त्या समग्रास मारून
तेस्थल, साधावें म्हणावयाचा दृढनिश्चय करून यास प्रथम सिंव्ह
गड साधिलातो शाहजीराजाचे मोकळीकेस्तव अल्लीयदल्शाहा
सोडिला होता तो परतून घेऊन त्या सिंव्हगडास अधिकरून
आपले गड किल्यांत समग्र सामान रस्त व फौज हे समग्र
भरून बंदोबस्त करून आपण बरोबरी घ्यावयाची फौज
धारकरी, चांगला राबूत, निवडून आपल्या मेनास पाहिजे
तितुकी शेना पादचारीच विशेष घेऊन बरोबरी कोणत
रस्तहीं मागून यावा म्हणावयाची अपेक्षा न धरावयाजोग

सुलभांत घेऊन प्रयाण सिद्ध करुन, अनेक द्रव्य दक्षिणायुक्त यात्रादान करुन, देवता प्रार्थना कुलदेवताराधना विशेष करून, प्रयाणसमयीं कुलदेवता प्रत्यक्ष होऊन स्वप्नांत जयप्रद ऐसा दृष्टांतहीं दिल्हा. तोहीं पाहून जयभेरी ठोकून सुमुहूर्तें विजयदशमीचे मुहूर्तानें कूच करून चालिले. विजयदशमी सणांस कूचकेलें म्हणजें भोंसल वंशांत जयप्रद दिवस तोच म्हणून परंपरा चालले. याकारतां उत्तम शकुनहीं जाहले. त्या शकुन सुमुहुर्तानिशी कूच करून जातेवेळेस आरंभा पासून जय-वल्ली नगर पावेतोंहीं वाटेस निबिड वन, निबिड पर्वत संधींत वनांतर्हा अनेक देशाधिपती दुर्गाधिपति, पाळेगार, जमेदार, त्या सर्वेत्रासहीं मारिल. जातां स्तलसोडून पळालेतेहीं जातां सांपडले यास मारणारास मारून सोडून देणारास सोडून बंदी-खाना दाखल करणार त्यां त्यां जोगें योग्यस्थळांत घालून यांत थोर थोर राजे बाजीराजे येक, कृष्णराजा येक, जनकराजा येक, चंद्रराजा येक, या चौघांसहीं जितून त्या जिंतिल्या राज्यास येकंदर मजबूत गणी विश्वासूक सर्दारांस ठेवून, मागील पाउले आपलें करून पुढं चालेकरुन जयवल्लीनगर पावले. त्या नगराची थोरवी थोडी कळावयास्तव सांगिजेलींहोतीं जे—सिंव्हेपर्वताच्या शिरेस घाट उतरून या घाटास रडतोंडीचा घाट म्हणूनहीं नाव पावलें आहे. त्या घाटाची कुबलता प्रख्यात तसा घाट उतरून येकपद-मार्गानें बहुतदुरजावून लोह पर्वताचा माथा चढून खालीं पाहिल्यां समग्र निबिड वन त्या वनांत सूर्यरश्मि पडल्यां भूमिवर गोप्पादमात्रहीं पाहण्यास सांपडेना, शुद्ध अंधकारमय तैशा वन-दुर्गाच्या आवरणामध्ये जयवल्ली नगर. त्या नगरासमपि प्रताप-

गिरीदुर्गहीं तेस्थळहीं जिंतूनि तेथील रामचंद्रराजा म्हणून वरी राहिला. तो त्याला पळवून आपले स्वाधीन करून तदनंतरें त्या स्थलांत व प्रतापदुर्गांतहीं मजबूत ठाणी ठेऊन पलीकडें स्वार-होऊन पश्चिम समुद्रतीरीं उतरुन समुद्रामध्यें कित्येक प्रदेशा पलीकडे काठांस विशेष दूर नाहीसे येक किल्ला मजबूत बांधून त्यास शिवलंका म्हणून नाव ठेवून त्या शिवलंकेच्या किल्यांत वस्तींही करून, रत्नखचित सिंव्हसन येक करून, त्या सिंव्हास-नावरी आपण बसून, शिवशक म्हणून येक शक कल्पून, सकल हिशोब कितोब वगैरे लिहिण्यांत शिवशक घालून, लिहिजेसें आपुलें अधिकाराचे भूमीस समग्र आज्ञापून येणेप्रमाणे चालवून, आपण तेथें राहिले. जयवल्ली नगराचा चंद्रराजा पळून गेला. तो अल्लीयदल्शाहापासी पावून शिवाजीराजाची ख्याती व शौर्य-धैर्यादिकृत्य समग्र अल्लीयदल्शाहास जाणती केली. ते अल्लीयद-ल्शाहाने परमाश्चर्य मानून तेवेळ पावेतो शिवाजीराज अमुके ठायीं आहेत म्हणावयाचें देखील कोणासहीं कळलेनव्हतें. चंद्र-राजानीं सागितल्या वरून अल्लीयदल्शाहास त्या शिवाजी राजाचा कृत्याचेठायी आश्चर्य व असूया विशेष होऊन सर्व प्रकारें शिवाजी राजास खालीं करावें नाहीतरी आपलें अधिपत्य टिकणें कठीण म्हणून दृढ योजना करून, त्याचे बारा वजीरापैकीं अफजलखान म्हणणार मुख्य वजीर त्याला अब्दलखान म्हणून प्रसिद्ध आहे त्या अफजल्खानास बलाऊन तुह्मीं पादशाहाचे रफाक मार्गे बहुत कामें केलां आहां. बहुत मूलूक साधिलाहो आहां तुम्हामुळें बादशाहास नाव आहे. अतां शाहाजीचा ल्योंक केवळ शिवाजी उन्मत्तहोऊन बापाची गोष्टीही ऐकनासे आपण अति

क्रमून बाच्छाई मुलुकें तमाम बांधून बाच्छाई खजान्यास न्यावयाचें द्रव्य लुटिलें होतें नव्हतां प्रस्तुत बाजीराजा, कृष्णराजा, जनकराजा यांचा मुलुक बांधून पलीकडे चंद्रराजाचा मुलुक जयवल्लीनगर प्रतिनाम जावळी म्हणावयाचें स्थलहीं आक्रमून समुद्रामध्यें किल्ला बांधून शिवलंका म्हणून नावे ठेऊन जडित सिंव्हासन करून आपण बसून आपले शक देखील चालविलें. उपरि तो काय करीना याकरितां तुम्ही विशेष फौज विशेष खजाना घेऊन तुम्हा बरोबरीचे वजीर अकरा आहेत; त्यांसहीं बरोबरी घेवून जावून बहुत बुद्धीनें शिवाजी राजातें धरावें अथवा मारून तरी टाकावें, त्याविना अमुचा टिकाव होईना म्हणून सांगीतल्यास अफझुलखान कबूल होऊन सकल-सैन्यहीं अकरा वजिरास कृष्णाजीपंत वकीलास बरोबरी घेवून निघणेस सिद्धजाहला. इतक्यांत शिवाजीराजे पूनेस येवून पावले म्हणून वर्तमान आलें. तेंव्हां चंद्रराजानें सांगीतले ते शिवाजीराजे तेथुन निघून पुणेस आले ते येक्या कामास बरेंच जाहले. जावलीगडांत असलियां त्याचा लाग करिणे बहुत प्रयास तो पुणेस आल्या करितां परतून त्याने येवुनि पावतो इतुक्यांत आम्ही पंढरपुरावरुन निस्संग जावळीगडास जावुन जावळी व प्रतापगड साधिल्यां ते शिवाजी मैदानात पडला. त्याचें पारपत्य सहज करूये म्हणून सल्ला दिल्हा. त्या चंद्रराजाचे सल्यास युक्तमानून अफजलखान कूच करुन निघाला. तेंव्हां उदंड अपशकुनहीं जाहले. मुख्य त्फथे लस्कर म्हणणार बाछाईचा खासहत्ती जो निशानाचा तो हत्ती पहिल्या मजलेस देवगतसि पावला. तेंहीं अलक्ष करुन अफजलखान पंढरपुरचे

मार्गाने प्रथम जावळीगड प्रतापगड साधून मग शिवाजीवरी परतावें म्हणावयाचे योजनेने चाली केली. तेंव्हां शिवाजी-राजाचे कुलदैवत श्रीजगदंबा तुळजा भवानी राजास रात्रिकालीं प्रत्यक्ष होवून, अफझल्खानाने केली योचना अल्ली-यदल्शाहाने निरोपिला अर्थ अबुजुल्खान कपटाने स्नेहाचे सन्निधान करील त्यास पातेजातानये म्हणूनहीं त्याक्षणी पुणें सोडून जावळीगडास पावणें, तेंथेंच अफजल्खानाचा संहार मी उभीराहून तुजकडून करवितें म्हणून सागीतली. सवेंच राजे उठून देवीस नमस्कार करून देवी अप्रत्यक्ष जाहल्यावरी स्वप्न पाहिलें म्हणावेतरीं जागाच आहें. अतएव कुलदेवता प्रत्यक्ष होउन पुढिलें भविष्य जाणविले म्हणून संतोष मानून त्याक्षणी पूणे प्रांतचे गड, किल्ले, दुर्ग समग्र मजबूत करून अपण जावळी गडास प्रयाण जाहले. तेंव्हां वाटेचे गडकिल्लेंत होतेत्या सरदारास येकंदर संकेत सांगून ठेविले जे अफजल्खान बहुत सैन्यानिशी जावळीस पंढरपुरचे मार्गानें जातो इतक्यांत अम्हीही जाऊन पावतों तो अम्हासीं भेटीचे संन्निधान बोलेल. अम्हीहीं त्याप्रकारेंच बोल देतों. तुम्ही आपले आपले गड किल्ले मजबूत करून फौजमात्र दाखऊन देयीनासे राणांत दबऊन ठेऊन अफजलखान येणारास त्याचे फौजेनिशी धाराळ सोडूनदेणे, जावळीचे मैदानांत त्याची अमुची भेटी झाल्याठायीं संविधान बिघडल्यां त्याधडीस संकेताचा नगारा वाजवितों, तोशब्द ऐकल्याक्षणी तमाम बाहेर निघून तमाम घाटा बांधून त्याचे एक मनुष्य देखील आंत येऊन देइनासें आंतील येकासहीं बाहेर सोडीनासें ज्याला जेंथें देखिलें तेथें मारून टाकिणें. येकमनुष्य सोडणें गरजनाहीं म्हणून

सांगून आपण सकेतकडून वाजवावयाचा जिनसहीं त्यांस कळवून आपण जावळी जावून पावले. उपरि अपजलखान् परामर्ष केल्यांत शिवाजिराजे जावळीस पावले म्हणावयाचे कळून पंढर–पुरचे मार्गानें जाणार वाटेने न जातां विठोबाचे मूर्तींस उपद्रव करावयाची योचना केली. त्यास विठोबा अप्रत्यक्ष होवून त्यावेळेस मूर्ति दृष्टीस पडेनासी झाली. त्याउपरी तुळजापुरास पाऊन तुलजाभवानीचे मूर्तींसहीं उपद्रव मांडिला. तेथेंही मूर्ति अप्रत्यक्ष जाहली तेथून निघून शंभूमहादेवास येऊन उपद्रव आरंभिला. तो बराबरी साहा वजीर मराठे होते. तेंहीं आडवें येऊन अटकाविले. त्या मुळें तेथून निघून पलीवन ह्मणावेयाचे पालीचे गडास आला. तेथेंहीं देवानें कांहीं चमत्कार दृष्टांत दाखविल्यामुळें उपद्रवकरीनासें येथें राहून कृष्णाजीपंत वकीलास भेटीचे संविधान बोलणे ह्मणून राजाचे नावें अफजल्खानाने पत्रलिहिले जें–तुम्ही किती जाहल्याहीं अलीयादिल्शाहा बादशाहासी विरोधच केला तुमचें नातें तैसें नव्हें. तुमचे वडील शाहजी राजानी केले वर्तुणूक ऐकिलीं असालकी आतांतुम्ही बादशाहा किल्ले एकंदर बांधिलें; व, बादशाही मनसूपदारांस येकंदर मारून टाकिलां, बादशाही खजानें लुटलां, रत्नसिंव्हासन येक करून, त्यावरी बादशाहाहोऊन बसतां, याखेरीज तुरुकाचे मतास निंदितां, जेथें तेथें मशीदा तोडितां, ऐसा येकंदर द्वेष वाढवितां, करितां तुम्ही बादशाहीस गुनेगार जाहलां आहां. अलीयदिल्–शाहाचे चित्तांत तुम्हास उदंड रीतीने कष्टद्यावें म्हणावयाचे वाटलें. यास शाहाजीराजाच्या स्नेहाकरितां बादशाहास उदंड रीतीने सांगून तुम्ही बांधिल्यापैकीं सिंहगड, भीमरथी, पुरंदरगड,

जयवल्ली येवढें सोडूनदेणे. यथाप्रकारें तुमच्यादेशांत तुम्हीसुख-
रूप असणें म्हणून वारून घेऊन आलों आहों करितां तुमची
अमची भेट जाहल्यावरी वरकडही कळून येईल म्हणून लिहून
कृष्णाजीपंताकडे देऊन आणखी कृष्णाजीपंतास कपट युक्तीनि-
रोपून शिवाजीराजाकडे पाठविले. त्याने राजापासी येऊन
केवळ आप्तकीने बोलून भेटीचे संविधान सांगीतलें. त्यास
शिवाजीराजानी अंगीकार करून फारउत्तम अमचे अपेक्षित
कार्यच खानानी सांगून पाठविले. ते फार उत्तमजाहलें.
खान मजकूरानी या जयवल्लीनगर जावळीचे मैदान येथील
रान येथील गड व हे कांहीं पाहिले नाहीतकीं येथेंच आलीया
भेटे गोष्टी यथास्तितीहोती म्हणवून सांगून पाठविले. ते
वर्तमान कृष्णाजीपंत वकीलानें येऊनसांगतांच खानमजकूर
बहुत संतोष पावून फौज कूचकरून चालिले. तेंव्हां बरोबरीचे
वरकड वजीरानी त्या स्थळास जातानये शिवाजीराजा
सामान्य नव्हें कांहीं कपट करील म्हणवून उदंड रीतीनें सांगि-
तलें; व अपशकुनहीं फार जाहले. कोणतेहीं मानीनासें लोह-
पर्वताचे उतारांत जावळीचे वनदुर्गास बाहेर उतरून राजास
सांगून पाठविले. तेंव्हांराजानी घाटा बेटा समग्र बांधून
पलीकाडिले मनुष्य घाटांत येवूनदेईनासें घाटा तमाम झाडें
तोडून खान मजकुराचे लोकांस आपण आलीवाट देखील
आपणास कळेंनासें करून आपलें गडें, दुर्ग, किल्लेसमग्र मज-
बूद करून पुणें प्रांता कडील—वहली नवी संपादिल्या मुल-
कांतही त्या त्या ठाणेदारांस आपण संकेताचा नगारा वाज-
वितांच तोशब्द ऐकिल्याक्षणीं चहुंकडील फौज खवळून

अफजलूखानाकडील येक मानव देखील सोडीनासे मारून टाकणें म्हणून ताकीदकरून आपण जावळीचे वनदुर्गा आतील मैदानांत सदर करून खान मजकूरास भेटीस बलावून पाठविले. ऐशा समयीं शिवाजी राजास वर्तमान आले जे अपजलखान विजापुर सोडून येथेवाटेस नवी मुलुकें आम्ही बांधिलातो बांधीत व लुटे करीत येणेप्रमाणें येत असता तुमचे जेष्टबंधू संभाजी राजे कांहीं फौज घेवून युद्धास गेले त्यास घेरून कलहा आधीं देऊन कृत्रमेकरुन मारून टाकिलें. ते वर्तमान शाहाजीराजास कळून त्यांचे उत्तरकार्य जाहल्यानंतर त्याच व्यसनानें थोडें दिवस असून शाहाजीराजेहीं परमपदास पावले. त्याचा दिवस शके १६५८ विकारी संवत्तरी संभाजीराजे दैवगातीस पावलें. सवेच दोन महिन्याच्या अभ्यंतरात तोच शक त्याचे वडील शाहाजी राजेहीं परमपदास पावलें. त्यांचे उत्तर कृत्य यकोजीराजानीं केले. मातोश्री जीजाईआउ साहेब तुमचे भेटीस आले ह्मणून वर्तमान सांगितलें तेव्हा शिवाजीराजानी फार क्लेश मानून जीजाई आऊस बलावून घेऊन, भेटून समाधान करून, आऊसाहेबांस प्रतापगडावरी ठेऊन, संभाजीराजाचें उसणें घेतो ह्मणून रागानें असते वेळेस तेंव्हां अफजलूखान येक पालखी व कृष्णाजीपंत हेजीवे चौघे पांचजण खिजमतगारानिशी सदरेस आला. उपरी शिवाजीराजेहीं तुदनुसारच दोघे चौघे बरोबरी घेऊन भेटीस आले. येकासयेक भेट होते समयीं थोडी बोला बोली होऊन अफजलखानानें राजास गवसून धरून माजेची कठार काढून राजाचे पोटावरी चालविली. दोनतीन-

मार चालविले तरीहीं राजानीं अंग्या आत बारीक बखतर ल्यालेहोते, ते कोणासहीं कळेना. त्यामुळें राजाचे पोटावरी चालविली कठार व्यर्थ होऊन गेली. इतक्यांत राजानीं वरचेवरी हाताच्या विसव्याने मार दाखवून डाव्याहाती वाघनखें होतीं त्याने अफजलखानाचे पोटावरी मारून ओढिले. तेणेकडून पोट चिरलेजाऊन चरबीं बाहेरीं आलींतरीही खान मजकूर तक्त जाहल्या करितां तेचरबी पोटांत आपले हातें भरून दुशालाने पोट ओढून बांधून हातीं फिरंग घेऊन राजावरीं बार करूं लागला. तेंव्हां राजानी हाती पट्टा घेऊन खानमजकूराचे बार यकंदर पट्ट्यावरीं आडवून आपण बार करून तोबार खानमजकुराचे डाव्याभुजापासून उजव्या बाजूच्या बरगड्या पावेतों उतरल्या मुळें खान दुर्घट होऊन खाले पडला तेव्हां शालींवाहन शके १५८१ विकारी संवत्सर मार्गशीर्ष शुद्ध सप्तमी गुरुवारीं दुपारा अफजलूखान पडला. खान मजकूर देवगतीस पावल्यानंतर खानाची तरवार कृष्णाजीपंत हेजिराणे घेवून राजावरी बार करूं लागला. तेव्हां राजे ह्मणाले जे तूं ब्राह्मण तुला मारणें आह्मास धर्म नव्हे. आह्मी ब्राह्मण चरणरजासच पूजाकरितों. आह्मास गुरुदेवतास्थानहीं ब्राह्मण जाहल्या करितां हाताची हत्यारा टाकून देऊन तुला जावें सारिखें असल्यां सुखरुप जा घाटा मोकळ्या करून देतों. अथवा येथेंच राहावेंतरी अन्न-वस्त्रास चालवितों रहाह्मणून उदंड रीतीनें सांगील्यांहीं त्या ब्राम्हणाने ऐकनासे बारावरी बार चालविला. तो समग्र ओंह-डीत परतून पाहिनासे राजे चालिले. तेव्हां राजाचा खिसमजदार-येकानें पाहून ब्राम्हण हट्टास पेटून मारितो. येखादा मार चुकून

लागल्या कोट्यावधीं जनास पोसणार राजा जायांहोईल तत्रापीं शस्त्रधरुन मारणार ब्राम्हणास सुखें मारुये म्हणून त्या कृष्णाजीं-पंतास मारून दुधड केला. तो ब्राम्हण देवगतीस पावल्या वरीं शिवाजींराजानी पूर्वसंकेताप्रमाणें नगारा वाजाविला. तो नाद ऐकतांच जेथिले तेथें लोक खवळून अफजलखानाचीं फौज तमाम मारून वरकड वजीरांस धरून फौजेंतींल हत्तीं घोडे तमाम लुटून राजापासीं आणून पावतें केले. राजानी सांपडल्या वजी-रांस बहुमान करून पाठविले. ते वजीर बहुत शेष थोडें होते तेंहीं अल्लीयदिलशाहपासी जावून साद्यंत वर्तमान जाणतेंकेले. अल्लियदिल्शाहानी अफजलखानाचे वर्तमान ऐकून दोनघटिका आपले ठायीं खिन्नहोवून बहूत फौज सरदारेंहीं गेलेकीं ह्मणावयाचे व्यसनानें मग्नहोवून पुन्हा हम्मधरुन शिवाजीराजावरी लढायी करावी ह्मणून फौज बंदीकरू लागले. हे वर्तमान पेसजी शिवाजीराजे अफजलखानास मारणेनिमित्त जावळींस जाते. वेळेस पुणेप्रांताचे राज्य समग्र नेतोजी ह्मणणार सेनापतीस निरऊन जावळींत आपण संकेत नगारा वाजविला वर्तमान कळतांच चालावेयाची घटिकहीं सांगुन गेले होते. तो नेतोजीं ह्मणणार सेनापतीनें अफजलखान दैवगतीस पावले वर्तमान ऐकून अल्लीयदिलशहानी पून्हा युद्धार्थ फौज बंदी करितातीं ह्मणावयाचे ऐकून अफजलखान जावळीस राजाचे भेटींस जाते-वळेस ठाणीं ठेविल्या गड किल्यांत येकंदर त्यांची ठाणी ठेऊन आपली ठाणीं मजबूत ठेऊन आपणहीं राजाजवळीं जावळीस जाऊन पावला. तदनंतरें शिवाजींराजयांनी नेतोजी सेनापतीस बरोवरीं घेऊन अल्लीयदिल् शाहाचा मुलुक बांधिला. तो पाश्चिम

नगर संपगावरासवड हे शाहार किल्ला सहींत घेऊन यास अधिकारी होता तो अल्लीयादिल शाहाकडील हिलालखानास पडाऊ केले. तोहीं निर्मल मनेकडून राजाचा अंकित झाला. त्यालाहीं समागमें घेऊन शिवाजीराजानीं अल्लीयदिलशहाचा मुल्क व दिल्लींद्र अवरंगजेबाचा मुलूक देखील बांधिल्या नावनिशा किल्ले दुर्ग गड देखील मायावनी रामपूर कन्धूतिका जयंतिका, अष्टी, अष्टवठ, वेल्लापुर, उंबरगांव, मसूर, करहाताग, गावें, पल्लीकाने, रलकन, नारबटु, मुरण, कोकपुर, करवार, येणेंप्रमाणें तमामें राज्य बांधून यांतील सरदारांस कित्तेकांस कौलावरी सोडिलें. कित्तेकांस मारून टाकिलें. कित्तेकांस बंदीखानी घालून साधिल्या राज्यास येकंदर मजबूत ठाणी ठेऊन तदनंतरें नेतोजी सेनापती समागम सेना देऊन अल्लीयदिलूशाहाचा मुलख व दिल्लींद्र औरंगजेबाचे मुलूकहीं बांधणें ह्मणून निरोपून पाठवून आपण पणालागड साधावा ह्मणून येऊन पणालास मोर्चे देऊन गडावरी चाल केली. तेंव्हां गडावल्यांनी अनेक गोळ्याचा मार व उदंड शीसें तावून ओतिले. याप्रकारीं बहुत मार केले. ते कोणतेंही गणना करिनासें शिवाजीराजे गडावरी चढून हल्ला करून, किल्लाहीं घेऊन, आंतिले सरदारांस मारून येकून मारिले लोकजातां उरल्यांस सोडून देऊन पनाळगड संग्रह करून घेऊन तेथेंच राहिले. यास कांहीं अगोदरीच अल्लीयदिल्शाहानी तजवीज केली जे—शिवाजीराजे केवळ शूर प्रस्तुत प्रतापगड जयवल्ली प्रांती आहेत ते पुनें पनाळगड समपिच करितां तिकडे येतील ते पणाळगड फारचांगला आह्माला प्रियकर आंस्तीं होऊन आहे. कदाचिंतू तो गड शिवाजीराजाचे

हातास लागल्यां मग आह्मांस फार संकट जाईल याकरिता तो राखावा ह्मणून रुस्तुमखान ह्मणणार सरदारास बरोबरी जोर फौज देवून पनाळ राखनेस्तव पाठविले. तो रुस्तुंखान येवून पावतो इतक्यांत शिवाजीराजानी पनाळ हस्तगत केले होते; ते वर्तमान रुस्तुंखानाने अल्लीयदिल्‌शाहास लिहिले ते पाहून अल्लीयदिशाहा फार व्यसनग्रस्तहोवून पनाळ गडहीं शिवाजीराजानी साधिल्याकरितां या उपरि शिवाजीराजे आह्मास दुर्जय, बहुत राज्य बांधिले, बहुत फौजहीं जमला, आह्मा येकल्याचानें त्यास जिंकवेना ह्मणून दिल्लींद्र ऐसा अवरंगजेबास अल्लीयदिल्‌शाहानी कागद लिहिलेजे—“ शाहाजीराजाचे लेंक शिवाजीराजे केवळ तुंदहोवून तुमचा व आमचा मुलूक बांधिला तो मात्र नव्हतां आमचे तुरुकाचे मताचे जे देखिले त्यांस येकंदर मारितात. मशीदा तमाम उपडून साडिल्या जडित सिंहासन येक करून त्यावरी आपण बसून अपल्यास बादशाहा ह्मणविताहेत. अपल्या नांवें शिवशक ह्मणून शक चालवितातो. ऐसें येकंदर उन्मत्त जाहले आहेत. अमच्या आटोप्यांत येत नाहींत. अमचे पनाळगडही स्वाधीन करून घेतले यास्तव तुह्मी फौजा पाठविल्याने अमची फौजहीं बरोबरी देवून पाठवून शिवाजी राजास ठांयास आणितों ” ह्मणून लिहिले. ते पाहून अवरंगजबानि अनेक मोगलायी फौज बरोबरीदेऊन जुलुफकारखान ह्मणणार सरदारास पाठविले. त्या जुलुफकारखानानें अल्लीयदिलशाहा कडील सरदार पहिले, पनाळ राखनेस पाठविले होते. त्या रुस्तुपखानासहीं मिळून घेऊन पनाळ प्रांतास बहुत सन्नाहानिशी उभयतां आले. तेव्हां शिवाजीराजे आपल्या फौजेनिशी बाहेर

निघून पुणेंप्रांताकडे संमोर येऊन जुलुफकारखान् व रुस्तुफखा-नाचीफौज तमाम मारून टाकून जुलुफकारखानचा निशान हिरून घेतले. तेणेकडून सैन्य समग्र वाताहत होऊन जुलूफकार खान, पराजय पावून निघून गेला. दुसऱ्याकित्ता जुलुफकार-खानानें दर्याखान्, फत्तेखान्, मुसेखान् ऐसे थोर सरदारांस भारी फौजहीं घेऊन आला तैसाचं अल्लीयदिलशाहानेहीं फौज पाठविला. तेहींघेऊन आले. दुसऱ्या कित्ताहीं राजे बाहेर निघून भांडून सैन्य वाताहत करून सोडिले. पुन्हा जुलूफकारखानानें जावून फौज बंदकिरून आला. येणेप्रमाणें जुलूफकारखान् व अल्लीयदल्शाहानी फौज सोळा कित्ते युद्धास आले. सोळाकित्तेहीं युद्धांत राजानी फौज तमाम मारून उभयतांची फौज नाशहो-ऊन गेली. हे वर्तमान हतशेषांचे सांगण्यावरूनहीं व अल्लीयदि-ल्शाहानी लिहिल्या वरूनहीं अवरंगजबास कळून फार आग्रहें येवून आतां शिवाजी राजा कोठें आहे ह्मणून अवरंगजबानी विचारिले. तेंव्हां जवळच्यानी सांगीतले जे–शिवाजीराजा जय-वली, चक्रावती याप्रांतासहित अनेक बाछाई किल्ले, गड, शाहार साधून पनाळ गडहीं घेऊन आपण पनाळ गडांत बैसला आहे. त्याचा सेनापती नेतोजी ह्मगणार बाछाई मुलुक साधीत आला आहे. त्या नेतोजीने साधिला मुलुक अल्लीयदल्शाहाचे मुलुकांत कपित्थगांव १, बंदरगांव १, मलगांव १, कडल १, गोकाक १, दुग्दवाट १, सुरवट १, धारावट १, पोरगांव १, मतपळ १, फागाद १, कद्मवट १, हेणवट १, रायबाग १, दुमैरिका १, काडग्राम १, कमलापूर १, चित्रकूट १, काराळ १, गारयाव १, शामगांव १, सतमीरघड १, हरिद्रा १, क्षुईवट १,

ईवल १, घुणिका १, मिरजें १, हनुवल्ली १, माथोल १, कुणिक१, इत्यादि राज्य आणखी कित्येकहीं बांधिली. ते नव्होता बाछाई मुलूक तमाम लुटणें जाळणें येणेंप्रमाणे किरात नेतोजी प्रबळ आहे ह्मणून सांगीतले. तेव्हां अवरंजबानी आपला थोर वंशास मिळाला खिनरी सरदार मुसेखान पठाण १, गोंड विठ्ठलदास मऱ्हाटा १, पाठरू १, गिरजासलतान १, अमरसिंव्हमराटा १, कोकाटे १, शादिवर्दीखान १, सरजेराव मऱ्हाटा१, राजेबगान१, बद्लूखान् पठान् १, रामसरु मऱ्हाटा १, कारतकबखान १, जयामाद १, कृष्णराजे १, यानावानिशीचे समग्र देवून शास्ताखानास निरोपिले जे–शिवाजीकडील नेतोजी बाछाई मुलुकांत करावयाची घुदाईस शतांशाने अधीक पणें प्रांतीं जाळणें लुटणें येणेंप्रमाणें करीत जयवल्ली चक्रावती प्रांतां वरून तो प्रांत समग्र साधून पनाळास जावून शिवाजीचें पारपत्य करा ह्मणून शास्ताखानास भारी फौज देवून पाठविलें. त्यानीहीं आपल्यास झाल्या हुकुमा पेक्षा जास्ती घर दायाकरीत मुलुकहीं बांधीत चक्रावती प्रांतास चालिले. येणेप्रमाणे अज्ञापित होवून बाछाइचा मामा शास्ताखान निघावयाचें वर्तमान अल्ली-यदिल् शाहास कळून आतां पनाळांत आहे त्या शिवाजी राजास हे वर्तमान कळतांच आपण निघून समोर जावून शास्ताखानास येऊं देयीनासे तेथेंच रोधील करितां त्याला पनाळांतून बाहेर निघेनासे करावें ह्मणून कनोळचे जोहरखानास लिहिले जे–तुह्मा-समागमें वल्लीखान् व बाच्छाई खान् व घोरपडे वगैरे सरदारांस व भारी फौज व भारी सरंजाम् घेवून पनाळास जावून सक्त लढाई करून पनाळगड व शिवाजीसहीं हस्तगत करणें ह्मणून

लिहिले. ते पत्र जोहर खानाने पाहून अती त्वरेनें सेना व सरदार सरंजामहीं शेखर करून घेऊन पनाळावरी उतरून गडास पांच महिने वेढादिल्हा तरीहीं शिवाजीराजानी चांगलें भांडणें भांडत होते. शास्ताकान अवरंगजेबाकडून निघाला तो चक्रावतीप्रांतीं संग्रामदुर्ग वेढून भांडत होता. त्या संग्राम दुर्गांतील शिवाजिराजाकडील ठाणेदार शास्ताखाना संहारिनासें चांगलें भांडणें देतहोते. येणेप्रमाणें शिवाजिराजे पांच महिन्यापासून पनाळ गडांत जोहरखानाचे वेढ्यांत सांपडून युद्ध करीत असतां राजमाता जीजाईआवूसाहेब प्रताप गडावरी थोडे दिवस असून तदनंतरें परतून राजगडास पावले होते ते जिजाईआवुसाहेब प्रस्तुत राजेहीं वेढयांत सांपडले. तेथेंहीं संग्रामगड चक्रावती शास्ताखानाने वेढिला. तेंव्हां जिजाईआवूसाहेबांस शिवाजीराजास पाहावें ह्मणून तेवढा येकपुत्र आपल्यास आहें. कोणा रीतीहीं त्यास पाहावे ह्मणावयाची अपेक्षा जाहली. दुसरें कित्येक सेना घेवून जावून राजास मोकळें करावें ह्मगावयाची हावहीं धरून जीजाईआवुसाहेब पनाळास जाणेस सिद्ध जाहले. पुन्हा आवूसाहेबानि केली तजवीज—जे संग्रामगड चक्रावतीदुर्ग शास्ताखानाचे हातास लागल्यासें दिसतें, पूणेसी सरल्ली सूपगावें हेहीं ताम्रमुखाच्या हातास लागले; शिवाजीराजे पनाळीवेढेंत आहेत करितां आपण जावून सोडवावें ह्मणून निश्चय केले. तेव्हां राजाचा सेनापती नेतोजी म्हणणार हिलालखाना समवेत येवून नम्रतेनें नमस्कार केला. मातोश्री त्या दोघां पाहून माझा लेंक तुमचा यजमान पनाळगडीं शत्रूशीं युद्धकरितो तुम्ही उभयतां लाज नाहीसें—भिवून आपला प्राणच थोरसा समजून पळून आलां कीं त्यास्तव मीच जावून

माझ्या लेंकास सोडवितें म्हणतांच सेनापतीनी मातोश्रीचे प्रथमराजे असाध्य शूर त्यास्तव त्यांचे निरोपावरून विजयगड जिंतून येप्रांती तांम्रमुखींसी युद्धकरिणेस आलें. आपण येथेंच आमुचे संरक्षण करावें पनाळ्यास न जावें नाहींतरी अमचे सैनीक समर्थ ताम्रमुखासी जिंतून गड किल्ले घेऊंसकनात्. आम्हीच यजमाना समीप—जातोंसें राजमातेस विज्ञापना करून पनाळेस निघाले. तेंव्हां सेनापतीसह सैन्य येणेचे वृत्त जोहरखान ऐकून व कांहीं सैन्य पाठवून मार्गी निरोधितां उभयता सैन्या-सही अद्भुत युद्ध जाहलें. त्या युद्धीं हिलालखानाचा पुत्र अनेक पराक्रमेकरून घायानें घाबरा जाहला. त्याला यवनाचे लोकानी धरून नेले. हे वर्तमान कळूनहीं सोडवणेस शक्त न जाहले. हे वर्तमान राजानीहीं ऐकून व्यसनाने रात्रीं निद्रिस्त असतां श्रीतुळजाभवानी स्वप्नी येऊन अरे लेंकरा तुझी माय राजगडांत तुजलागीं पाहावें म्हणून बहुत कष्टी होते; आतांच मातोश्रीचे भेटीस स्वल्प सैन्या समवेत जा तेसमयीं शत्रूस मी मोहवितें. जोहरहीं कारणामुळें नाशपावेल. म्हणतांच राजे जाग्रत होऊन श्रीदेवीस साष्टांग नमस्कार करून पुना प्रांत ताम्र मुखानी आक्रमिले असती आम्ही येथें असणें विहित नव्हें. ही तजवीज करून त्र्यंबक भास्कर यांस पनाळी ठेऊन देवीच्या आज्ञेप्रमाणें राजगडास जाणें निश्चय करून जोहरास आपण राजगडांस जातों आमुचे सैन्य येथें तुम्हासी समर करील, कदाचित् ऐसें तुजला संमत नसल्यां उभयदलभारहीं दूसरसें उभें करून आम्ही दोघेही द्वंद्व युद्ध करूंसे राजानी सांगून पाठविलें. ते वर्तमान ऐकूनहीं न ऐकाल्यासे होता. तदनंतर राजें रात्रीं प्रहरा नंतरें

साहाशें पायदळासही तेरी वाजवीत शत्रू समीप मार्गाने चालिले. तेव्हां तो शब्द मेघ गर्जनाम्हणून शत्रूमसग्र समजले. तेव्हां राजेहीं कठीण मार्ग रानचा पांच गांव भोय क्रमून विशालगडास पावले. त्यानंतरें ते वर्तमान जोहराने ऐकून आम्ही घेरिलें असतांहीं कैसें दगा करून गेले म्हणून तप्तहोवून महसुद म्हणणार सेनापती समागमे कांहीं सैन्य देऊन राजास धरणेस्तव पाठविला. तो महसूद तेथून जातानां मार्गीं चिखोलांत बहुत सेना गडून गेली. कांहीं सेनेसमवेत गडासमीप पावला. त्या अगोदरी पल्लीवनाचा राजा जशवंत, शृंगारपुरचा राजा सूर्य राजे दोघेही जोहराचे निरोपावरून विशालगडी युद्धकरून पराभव पावले होते. त्यानी महसूद आले वर्तमान ऐकून त्याची भेटी घेऊन तांघहीं विशालगडास घेरिले. तेंव्हां राजे नीट युद्ध करून स्वसैन्यकडून शत्रूस जिंतून तेथून निघून राजगडास येऊन आपले मातोश्रीस साष्टांग नमस्कार करून चालले वर्तमान येकंदर सांगून येक दिवस तेथेंचि राहिले. महसूदहीं केवळ अपमान पावून प्राणनी जोहराकडें पावला. हे वर्तमान दिल्लीश्वराचा मामा शास्ताखान् प्रभृतींनी ऐकून आपले मनोरथसिद्धी विषयीं संशयी जाहले. ऐसें असतां शिवाजीराजे आलोचना करून त्र्यंबक भास्करास पनाळगड यवनाचे स्वाधीन करून तुम्ही येथें येणे त्यागडास प्रतिनिधी अल्लीयदिल्शाहा पासून इतर गड घेवूंसकतों दोनी ठायीं युद्ध करिणे होईना करितां हा निश्चय समजून शीघ्र येणेसें बलावून पाठविल्यावरून त्र्यंबक भास्कर राजे आज्ञानुसार गड जोहराचे स्वाधीन करून त्याची भेट घेवून त्याकडून अनेकसन्मान पावून राजासमीप येऊन पावले. ऐशासमयीं यदुलाने

राजास जोहर लांच घेऊन सोडिलासे अनुमान मानून जोहरास राजाकडून लांच घेतलास तें द्रव्य देणे नाही तरीं तुझें पारपत्य केलें जाईलसें पत्र पाठविलें. ते पाहून मनस्तापें करून अपलें सैन्य घेवून कर्नपुरास निघून गेला. आपलें भय नाहीसें निघून गेला ह्मणावयाचे द्वेषानें कित्येक तामुम्रखास पाठविला. त्या ताम्रमुखानी विष देवून जोहरखानास मारिले. राजगडांत शिवाजीराज यानीं ताम्रमुखी, चक्रावती, आणी संग्राम दुर्ग भाडून घेतिले वर्तमान ऐकून मंत्रीस बलावून आतां ताम्रमुखा-वरी युद्धास जावयास अनेक द्रव्य पाहिजे त्यास्तव कित्येक राजे जितून यावेसें म्हणतांच मंत्री प्रत्युत्तर दिलें जे—महाराजानी केली तजवीज युक्तच युद्धासहीं निघावें परंतू दिल्लीश्वराचा मामा साप्रत पुनेंत आहे. तो महाराज राजगडास आलें वर्तमान ऐकून अमचें राज्य सिंह पर्वतप्रांत आक्रामिणेचें योजून कारतलब म्हणणारास कांहीं सैन्य समवेत पाठविणेस निश्चय केला आहे त्यास्तव तो मार्ग निरोधावा म्हणतांच ते ऐकून आपण सैन्या-निशी जयवल्ली प्रांतास जावून खालील आंतील राणांत लोक दबवून ठेविले. त्यानंतरें कारतलबखान व अमरसिंह आणी राजे व्यांघ्रो व जसवंत व सूर्य राजा व कोकाटे व मित्रस्नेह हे समग्र सैन्य समवेत निघून भीमपुर व कल्याणपुर व पनवल्लीपुर व कश्चपदेश हेसमग्र स्वसैन्य समेत निघून भीमपुर वगैरे स्वाधीन करून घेऊन लोहादीचे राणचे मार्ग सिंह पर्वत उतरून त्या खालील रान परदळ समेत होतेते न कळतां राणीं प्रवेशून दोन तीन दिवस वासकरून पलीकडें साधणेस निघाले. तेंव्हां शिवा-जीराजे समोर निरोधिले. दोभागी होतेते राजसैन्यकहीं घेरून

गास तंजावुर राज्याचे तक्तनिशी केले. त्यानंतरें अमरशिंग राजानी राज्यभार करणेंत निज बाध्य ऐशे शरफोजीराजास सहज बाध्यता असतांहीं तुळजामहाराजानी विहित रीतीनें युक्त-प्रकारें दत्त घेऊन कुंपनीसहीं निरविल्या करितां सर्व विघें कडू-नहीं बाध्य ऐशा शरफोजी राजास अमरशिंग यानी मत्सरें कडून करावेंयाचा वुपद्रव सर्वहीं मेस्तर स्वार्च पादरी साहेबानी पूर्वा-पार शोधून पाहून, विचारणा केल्या ठायीं शरफोजी राजाच्या निजवाने स्वार्च पादरी साहेबाचे दये युक्त अंतःकरणास वोढिलें याकरितां त्यीनी हा अर्थ समग्रहीं इंग्रज कुंपनीस जाणतें केले. त्या संधींत कुंपनीचे तरफेने मेस्तर राम ह्मणणार सरदार तंजा-वुर रेसिडेंटीस आले. त्या मेस्तर राम ह्मणणार रेशीडेंटास मेस्तर स्वार्च पादरी साहेबानी कुंपनीस जाणविला अर्थ विलाय-तसि पावून तेथून कोर्ट अफ डिरेक्टरचे निरोपा प्रमाणे गौनर-मेंटाच्यानी लिहिलें जे—शरफोजीराजास अमरशिंगयाचे निर्बंधा खेरिज करून ठेऊन त्यांचे संरक्षण करा ह्मणून त्यांस तेणे प्रमा-णेच राजे मजकुरास वेघळें स्थळी दिवाण वाड्यांतच ठेऊन रक्षणार्थ कुंपणीचे लोकहीं ठेऊन तदनंतरें, त्यानी मेस्तर स्वार्चा कडूनहीं कित्त्येक व तंजावुराचे पंडिताकडूनहीं शरफोजीराजाची बाध्यता कळून घेऊन प्रस्तुत शरफोजीराजास खर्चासहीं चालावें या वाटार्थ कुंपणसि जाणते केला तेहीं, इंग्रेज कुंपनीवाल्यानी मनास आणून शरफोजीराजास व त्यांचे संसारासहीं विद्यमाना-नुसार खर्चांसहीं करून ठेविले. त्यावरी शरफोजीराजानी वृथा काल जावूं देयीनासें मेस्तर स्वार्चा कडून इंग्रेजी लिहिण्या बोल-ण्याचे अभ्यास स्वमन केले. तेव्हां, मेस्तर स्वार्चे पादरीसाहेब

यानी अंतःकरण पुरस्सर त्यांस करविले. तेणे करून राजे मजकूर इंग्रेजीचा अभ्यास चांगल्या रीतीने केले. तैसेच स्वजाति लिपी महाराष्ट्र व बालोबंदहीं अभ्यासिले. व अरबी लिपीही अभ्यासिले. तशामध्येंही अमरशिंगानी प्रतिपदींही उपद्रवच करूं लागले. करितां सकळहीं मेस्तर स्वार्चास शरफोजी राजानी ओपिले. मेस्तर स्वार्चानी हे येकंदर मनास आणून कुंपनीस जाणविले. त्या वरून कुंपनीवाल्यानी शरफोजीराजे व त्यांचे मातोश्री या उभयतांचेहीं मनोगत कळून घेऊन तदनुसारच राजे मजकूर चन्नपट्टणास येणेस निरोप पाठविल्या सरिसेंच शरफोजीराजे व त्यांचे मातोश्री या उभयतानीहीं चन्नपट्टणास पावून कुंपनीच्या आश्रयांत राहिले. तेंव्हां समागमें आले ते मेस्तर स्वार्च पादरी साहेब यानी मेस्तर जरीख पादरी साहेबास अपले कार्यास ठेऊन आपण तंजावूरास परतून आले. तेंव्हां कुंपनी वाल्यानी शरफोजीराजे व त्यांचे मातोश्री उभयतांसहीं आदरें मानकरून चालविले. त्यासरिसें शराफोजीराजे यांचे बाध्यस्थेची विचारणा निर्मल करावी ह्मणून इच्छिल्यासमयीं शरफोजीराजे यांस त्याविषयीं तंजाउरच्या पंडितानी निष्कर्ष केला. पुस्तक कुंपणीस दिल्हे. तेंव्हां कुंपनीवाल्यानी अमरशिंग यांस याविषयीं विचारल्यास अमरशिंग यानी त्यास विरोध लिहून दिल्हे. तोहीं घेऊन काशी वगैरे स्थळास पाठवून विचारणाकरविली. शरफोजीराजे तंजाउरांतच अमरशिंगाच्या उपद्रवाविरहित स्थळांत जाऊन राहातेंसें निरोपिले. राजे मजकूरहीं तदनुसार वर्तणूक केले. तेंव्हां मेस्तर स्वार्चसाहेबानी पेसजी अमरशिगयास शास्त्र न जाणता भयकरूनहीं, कांहीं आशे करूनहीं लटिक्या

साक्षी दिल्या बारा पंडितां पैकीं मेले ते जातां, वरकड पंडितांनी आह्मी केलेंते अन्याय म्हणून मेस्तर स्वार्च पादरी साहेबास सांगीतले. तो अर्थ मेस्तर स्वार्च साहेब गवर्नमेंटास लिहून पाठविला. तदनंतरें कित्येक दिवसांवरी मेस्तर स्वार्च साहेब दैवगतीस पावले. तेंव्हां शरभोजीराजास फार व्यसन जाहलें. परंतु त्या मेस्तर स्वार्च पादरी साहेबाचे स्थानास मेस्तर जनीक पादरी साहेब आले. त्यानी राजे मजकूराचा विचार वर्तणूक चांगला कळून घेऊन पाहत आल्या करितां, त्या जनीक साहेबानीही राजाचेठायीं फार अंतःकरण करूं लागले. तेव्हां त्या जनीक साहेबाचे स्नेहित मेस्तर् टूर्यन् साहेब ह्मणणार रेसिडेंटीस आल्याकरितां त्यांचे नीति व न्याययुक्त चलंतीहीं पाहात येण्यावरून प्रतिपदीही राजास ते व्यसन शमन पावण्यास कारण जाहलें. तदनंतरें इंग्रेजी कुंपनीवाल्यानी आपण करविल्या विचारणेंत सर्व विधेंकडूनहीं शरफोजी राजाची बाध्यता बलवंत ह्मणावयाचे जाणून तंजाउर रेशिडेंटीस मेस्तर इरियसन् साहेब यांसी निरोपून त्याकडून प्रस्तुत अबाध्यतेकडून राज्य करणार अमरशिंगाने अक्रा वर्षें चुंगडी दिवस राज्य केल्यांत रयतांसहीं सौख्य नाहीसें मुलुकांत रुजु मार्गें कडून पैका वसूल होणे नाहीसें वसूल जाहला पैका रुजुमार्गानें सर्कारासहीं पावनामुळें मुशारदारांना मुशाराहीं न पावतां व कुंपनीचे लोकांचे खर्चास ह्मणून नेमिलेतेहीं न पावतां बेसुमार कर्जेहीं होऊन कित्त्येक जन स्वतां बेसुमार लटिके कतबेहीं होऊन ऐशे येकंदर येकहीं नीट नाहीसे अन्याय होऊन केवळ अमरतें कडूनच करित आले.

ऐशा अमरशिंगास परतें करून सर्वविध कडूनहीं योग्यऐशे शरफोजी राजास शकें १७२० काळयुक्ती नाम संवत्सरीं तंजाउर राज्याचें तक्तनिशी केले. सवेंच याविषयीं केल्या विचारणेचा मथितार्थाची प्रख्यातिपत्रें प्रचुर केले. तेणेकडून सकल जनासहीं इंग्रेजकुंपनीवाल्याचे विहित विचारणेचाहीं व न्यायाचाहीं प्रकाश चांगल्या रीतीने कळून आला. तदनंतरें शरफोजी राजानी अपले स्वराज्यपद प्राप्ती नंतरें, या अगोदरील अमरशिंगाचे वेळेस चालिलें अन्याय समग्रहीं निरोधून विहित मार्गेंकडून अपले प्रजेसाहीं विहित सौख्य देऊन आले. दप्तर्चें हिशोबासहीं येक पद्धती करून, राजग्रह समग्रहीं जंद होते तें डाराडूजी करून कित्येक नूतनेहीं करून युक्तप्रकारें राज्यभार करण्याचे दिवसांत कुंपनीचे फौज टिप्पूसुल्तान् याजवरी मोहिम केली. तेंव्हां, महाराजास रस्ते विषयीं जाणविल्यास महाराजानी आपले शक्तीस कांहीं अधिक व करवेल आहे त्या घोड्यापैकीं आपले बिरुदाचे व बसावेयाचे व रथाचे घोडे देखील देऊन व हत्ती इत्यादि देवून, कुंपनीच्यानी इच्छिले स्थलास पोहचविले. सवेंच महाराजानी अपल्या समानकुलांत घांटक्याच्या लेंकी यमुना बाईसाहेब ह्मणणार येक व अहिल्या बाईसाहेब ह्मणणार येक या उभयतां बाईसाहेबांसहीं लग्न करून घेतिले. तदनंतरे, पेसजी अमरसिंहाचे राज्यभारा शेवटी इंग्रेजी सरकारचे तरफेने होतेते रेशिडेंट् मेस्तर मकलोठ् साहेब ह्मणणारानी महाराज तक्तनिशी होयनिाते अगोदरी महाराजास निष्कर्ष पावल्या देण्यास तसा हा वित्यास जाहला आहे ह्मणून इंग्रेज सर्कारास

जाणविल्या क्षणी महाराजाची बाकी पावती केला. त्यास त्या मकलोट साहेबानी जाणविली गोष्टी निजास पावली. ह्मणावयाचा व याद लिहून दिल्हा. तो प्रस्तुत रेसिडेंट मेस्तर डुर्यन्‌साहेबाने महाराज साहेबास ओपिल्या वरून महाराजानी आपली निजाची वर्तणूक इंग्रेज सर्कारास व्यक्त होण्यास्तव महाराजानी विहित साक्षियुक्त रेशिडेंट मेस्तर डुयन्तु साहेबास सन्‌ १८०० इसवी माहे मे २७ तारखेस लिहिलें पत्र मस्तर मजकूरानी पूर्वापर संदर्भ साक्षियुक्तहीं मनास आणून महाराजाचे निजत्व व महाराजाची बरवी वर्तणूकहीं व खरेंपणहीं इंग्रेजसर्कारास चांगल्या रीतीनें जाणते केले. त्या वरून हानरबिल् कुंपनीवाल्यानी ते पाहून महाराजाचे कार्यस्थान पाठविणे असें निरोपिले. तेंव्हां महाराजानी दत्ताजी अप्पास व या अनुभोगांत असणार येक दोघांसहीं पाठविले. त्यास योग्यतेनें बलावून घेऊन विचारून महाराजाचे निजत्वास मानवले कुंपनीवाल्यानी अपल्या स्वजातीवरी दृष्टी देयीनासारिखें शुद्ध न्यायावरच उभेराहून न्याय विस्तारविले. ते श्लाघना करावेंयास योग्य असे या रीतिच्या मकलोटास संकट काल प्राप्त जाहल्यासमयीं मकलोटानी त्याची बायका मिस्स्ट्रेस मेकलोट ह्मणणारानीहीं संकटकालाचा विध जाणवून महाराजास प्रार्थिले. तेंव्हां महाराजानी पेसजी महाराजाच्या बाध्यतेचा मजकूर कित्येक मेकलोटानाहीं कुंपनीस कळविले होते. त्या उपकारास्तवहीं अपले थोरवी करितांहीं पेसजी मकलोट ह्मणणाराचे प्रार्थनेस्तवहीं प्रस्तुत मेकलोटानी केला अपकार देखील आठविनासें त्यास कांहीं अधीकच दहाहजार रुपये देवविले. त्यावेळेस मेस्तर स्वार्चानी या अनुभ-

वांत होते मेस्तर तरीखपादरी साहेबास मेस्तर जसाख पादरी-साहेबासहीं नीट कळलें होतें. त्याकरितां त्या उभयतांचे निज-बोलणें महाराजाचे निजत्वास केवळ प्रबळ साक्षी होऊन होत्या करितां महाराजानी त्या उभयतां पादरी साहेबाचे खरें बोल-णेच्या उपकारास महाराज बद्ध जाहले. या अगोदरीच महारा-जानी लग्नकेलेली दुसरी स्त्री सौ० अहल्या बाईसाहेब यांचे उदरीं कन्यारत्न जन्मलें. त्यास सुलक्षणा बाईसाहेब ह्मणून नांव ठेविले. तद्नंतरें, इग्रजसर्कार तर्फेस अमरशिंग यानी केल्या राज्यभारांत तंजाउर देशाचे राज्यांत अन्याय चालिला आहे या करितां देश समग्र इंग्रेजसर्कारचे तरफेने केलया यां चांगल्या रीतीनें न्याय करितों ह्मणून महाराजास जाणविले. त्या न्याय करणेस महाराजानी अंगिकार करुन आपला देश इंग्रेज सर्कारचे तरफेने ओपिले. इंग्रेजसर्कारच्यानी महाराजाचे निर्मल मनास व निर्मल वर्तणुकेसहीं मानून महाराजाचे किल्यांत इंग्रेजाचे ठाणे होते तेंहीं काहडून महाराजाचा किल्ला मोकळा करुन दिल्हे. तेंव्हां महाराज इंग्रेज सर्कारांतर्शी येक त्रीटी जाहली त्यांत कित्त्येक कामास मेस्तर टूरियन् साहेब सहायभूत असून महाराजास युक्त प्रकारें सुलभ केले. तद्नंतरें इंग्रेज सर्कारच्यास दक्षिणप्रांती मरदा ह्मणणार पाळेगाराचे पारपत्त्य करणे जरुर पडल्यावेळेस महाराजास जाणविल्याक्षणी महाराजानी आपला देश ओपिल्या वरहीं आपल्या संरक्षणार्थ थोडें सैन्य आहेत्यांतहीं शिवण्णा ह्मणणार सरदारा बरोबरी समरधीराचे स्वार पन्नास व मोगलायीस्वार वीस झुंजार व पाद्चार आपळे समक्ष गाहनशार ह्मणणार गलेफाचे बंदूकेचे देखीलानिशी महरादानशया इतुक्या

फौजेसहीं खर्चास देखील आपणच देऊन रोशिडेंट मेस्तर ब्लाक-बरन साहेबा बरोबरी कुमुकेस पाठविले. ( सन १८०१ इसवी माहे जून तारीख ७ स ) तदनंतरें, पेसजी महाराजानी आपलें लग्नहोइनात्या अगोदरीं येक स्त्री सर्वगुण कडून युक्त योग्य बाल्यवयी ऐशे स्त्रियेस परिग्रह केले होते. त्यानीहीं महाराजाचे चित्तानुरुप वर्तणूक करीत होते. तैशी स्त्री दोनदा गर्भ होऊन प्रसवहीं होऊन ते दोनी प्रजाहीं नष्ट जाहली. व दुसरे प्रसवा मध्येच ती स्त्रीहीं नष्ट जाहली करितां त्या स्त्रीचे गुणाधिक्ये कडून महाराजास ते येक व्यसनास्पदहीं जाहले. परंतु, त्या स्त्रियेने आपलें अवसान समयीं आपलया नावें येक चांगला धर्म अन्नछत्रादिक व्हावें ह्मणून महाराजास विनविलें होतें. त्याचा अंगिकार करून महाराजानी उत्तम व उपयुक्त ऐशा शेतूमार्गांत छत्र व अग्रहार व देवालय व शृंगारवन व तटाक इत्यादिक होण्यास आरंभ करुन त्या स्थलास मुक्तंबापुरछत्र म्हणून नांवहीं ठेऊन चांगलया रीतीने कामहीं चालतें केले. ते येकंदर त्याचे स्मरण सर्वदा करिणेस हेतुभूत आहे. तदनंतरें, महाराजानी तीर्थ यात्रेचा उद्देश करुन चोळदेश समग्र येक किता, व श्रीरंग यात्रा येक कित्ता व गंगा यात्रा येक कित्ता व पळगी यात्रा येक कित्ता, येणेप्रमाणे तीनी चार कित्ते यात्रा केल्यांत रोशिडेंट मेस्तर ब्लयाक्बरन् साहेब याने यात्रेंत समागमें येऊन त्या त्या स्थळीहीं वाटेंत प्रति मजलांतहीं महाराजाचे मतानुसार मर्यादा चालवीत आले. त्या वरुन मेस्तर मजकूराचा उपकार महाराजानी फार मानिला. महाराज व इंग्रेज सर्कारास राजी केले त्यांत महाराजास कुंपनीचे स्वाधीन देश जे थोरकी त्या देशा-

तहीं महाराजाचे स्वदेशा सारिखें उपचार करितों ह्मणून वाकदत्त केले होते. ते मेस्तर ब्लाकबरन साहेबानी दृढ केलें. आणखी येक उपकार मेस्तर ब्लाकबरन साहेबाचा महाराज मानितातित ते काय ह्मणजें महाराजानी आपला देश समग्र न्याय करिणे-स्तव इंग्रेज सरदारांस ओपिते वेळेस महाराज व इंग्रेज सर्का-रामध्ये जाहल्या त्रीटींत महाराजास उपयुक्त कार्य इंग्रेज सरका-रानीं अंगीकारायाजोगें केलें. ते नव्हतां त्याच त्रीटी मध्ये इंग्रेजास अन्य देशावरी कलाप करणेच्या समयीं हो अथवा इंग्रेजा वरी अन्यदेशाच्यानी कलाप करण्याच्या समयीं हो महाराजाच्या किल्ल्यांत इंग्रेज सरकारचे ठाणे ठेवणें ह्मणून करार पावला होता त्यास तेणे प्रमाणेच इंग्रेज सरकारच्यास कलाप प्रसक्ती पडल्या वेळेस करारा प्रमाणें ठाणी ठेवणेस उद्युक्त जाहले. तेंव्हां मेस्तर मजकूरानी महाराजाची चलंती व महाराजाचे योग्यतेस व महाराजाचा विश्वास हे समग्रहीं कुंपनीस जाणता करुन महाराजाच्या ठायीं कुंपनीस प्रिय होयसे हीं करुन तो अर्थ राहता करविले. त्या वरुन मेस्तर ब्ल्याक्बरन् साहेबाचा उपकार महाराज बहुत मानितातो. तैसेंच मेस्तर टुरायन साहे-बाचे रिसिडेंटींत मेस्तर मक्लोट साहेबाचे व्यवहारा विषयीं महाराजाना निजेकडून लिहिला अर्थ येकंदरहीं व महाराजाचे निजत्वहीं व साक्षीचे बलहीं कुंपनीस व्यक्त जाणतें केलें. तो उपकार नव्हतां आपण विलायतीस गेल्यावरीहीं महाराजाचे ठायीं प्रीतीकडून महाराजास कित्येक पुस्तकें व भूगोळ व भूगो-ळाचे पुस्तकें व रुप्यांचीं बासनें व रुप्याच्या कित्ये चीजाहीं पाठविले त्या वरुनहीं मेस्तर टुरियन साहेबाचा उपकार

महाराज प्रतिपदीहीं मानितातिः या पळनी स्वारी अगोदरीच पेसजी महाराजास प्रथम कन्या जाहली. सौभाग्यवती अहल्याबाई साहेबाचे उदरींच महाराजास दुसरी कन्या जन्मली. त्यांस राजकुमार बाईसाहेब म्हणून नांव ठेविले. शरभोजी महाराजाचे राज्यभारीं तबाज ह्मणावयाचें येक पांखरुं फार अपूर्व कधीहीं या देशीं आले नव्हते. तैसें पांखरु बाज ह्मणावयाचे आठ होते. तदनंतर महाराजास धर्मपत्नी ऐशा सौभाग्यवती मातोश्री अहिल्या बाईसाहेब यांचें उदरी पेसजी दोघी कन्या जन्मल्या. त्यांचे उदरीं महाराजास तिसरी कन्या जन्मले. त्यांचे नांव बायमा बाईसाहेब ह्मणून ठेविले. आता शरफोजी महाराज सर्वदा शिवपुराण ऐकणें व शिवपूजा करुन यात्रादिकहीं करीत सन्मार्गांतच आहेत. सकल जनासहीं सकल राज्यासहीं वैषम्य तिरस्कार या दोहींचा परित्याग करुन त्या त्या मताचे मताप्रमाणें, वेदाप्रमाणें चालवीत व सकल जनासहीं व्यसन न येतां युक्तप्रकारें प्रतिपालन करिताहेत श्रीमद्भोंसल वंशांत महादंपती श्रेष्ठ श्रीमच्छंकर प्रसाद जनित प्रताप स्वीकृत दिल्लीचातुर्भाग स्वातंत्र्य विपक्षीकृत दिल्लीराज सार्वभौम अवनीशकुलललामायमान महाराष्ट्र तथा चोळदेशाधिप पुण्यश्लोक राजाचे चरित्र सकल मनोभीष्ट दायक असें प्रथमवर्ण महाराष्ट्र जाती भगवंत रायाचे पौत्र विठ्ठल रायांचे पुत्र प्रस्तुत चोळदेशाधिपती श्रीमंत राजेश्री महाराज क्षत्रपती शरफोजीराजे साहेब यांचे निज सेवक चिटनीस बाबुराय काश्यपगोत्र आश्वलायन सूत्र ऋक् शाखाध्याई यांजकडून लिहिजेले ते शालीवाहन शकें १७२५ रुधिरोद्गारि संवत्सर मार्गशीर्षवद्य अमावास्या भौमवासरीं इंग्रेजी सन १८०३ इसवी डिसंबर १३ तारिखेस लेखन शीमा समाप्त ॥

# परिशिष्ट २

## नायकराजे

प्राचीनकाळीं पाडवांचें राज्य असलेल्या नगरीस अर्वाचीन काळीं मदुरा हें नांव दिलेलें आहे. या मदुरेवर अनेक घराण्यांनीं एका-मागून दुसरे अशा क्रमानें राज्य केल्यावर सन १५५९ मध्यें हें राज्य विजयानगरच्या विश्वनाथ नायकानें हस्तगत केलें. कारण हा विश्वनाथच त्यावेळीं सेनापति होता. अर्थात् सन १५५९ पासून मदुरेवर नायक राजे राज्य करूं लागले. शेवटीं दुसऱ्या चोक्कनाथ नायकाची विधवा पत्नी मीनाक्षी हिच्या मृत्यूनंतर सन १७३६ मध्यें हें राज्य खालसा करण्यांत आलें. नायक राजांची वंशावळ. मागें पृष्ठ १५७–१५८ वर दिलेली आहे.

# परिशिष्ट ३.

## मीनाक्षीराणी

" In 1732, the Raja of Trichinopoly had died without issue; his second and third wives burned themselves with the body, but the first wife succeeded to the Government, in conformity, it is said, with the desire of the deceased Rajah. Disputes subsequently ensued between the Rani and a Prince of the royal blood. Dost Ali, the Nabob of Arcot, was prevailed upon to take advantage of the confustion, to subject the kingdome of Trichinopoly to his own authority. Accordingly he sent an army under his son Subder Ali, and his son-in-law Chanda Saheb, to seize any opportunity which might offer of getting possession of the capital.

The result was tragical. Chanda Saheb who already owed his advancement to his matrimonial arrangements, was fortunate enough to excite the tender regard of the Rani. Accordingly he was enabled to prevail on the love striken lady to admit him with a body of troops into the city of Trichinopoly, having

first taken an oath on the Koran that he would act in nothing to her detriment. But the lover of middle aged queens are not always fortunate and Chanda Saheb proved more cruel to the Rani than Æneas proved to Dido. There is however a slight difference between the classical legend and the modern story. Æneas broke the heart of Dido by running away; whereas Chanda Saheb broke the heart of the Ranee by remaining where he was. The latter seized the City of Trichinopoly, and there imprisined the lady; upon which the latter died of grief and the kingdom of Trichinopoly yielded to the authority of the faithless Chanda." ( Madras in olden times )



मंगम्माल राणीच्या कारकीर्दीमध्यें मदुरा व त्रिचनापल्ली येथील राज्यें एक झाली. पुढे तेथील राजा विजयरंग चोकनाथ हा मृत्यु पावल्यावर त्याची राणी मीनाक्षी ही गादीवर आली. तिची हकीकत वरीलप्रमाणें आहे.

# परिशिष्ट ४

## यंकोजीस शिवाजीचें पत्र. ( सन १६७८ )



## श्री महादेवकुलस्वामिनी

( १ )

" श्री सहस्त्रायु चिरंजीव अखंडित लक्ष्मी अलंकृत राजश्रिया-विराजित राजमान्य राजश्री येकोजी राजे प्रति राजश्री शिवाजी राजे, आशीर्वाद. येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन केले पाहिजे. उपरि कैलासवासी साहेबी कैलासवास केला, त्यास आज तेरा वर्षे झाली. महाराजांचे पैके व जडाव व हत्ती व घोडे व मुलूख अवघेही राजश्री रघुनाथपंती तुम्हाला राज्यावर बैसवून संपूर्ण राज्य तुमचे हातीं दिलें. ऐशियास आमचा अर्धा वांटा तेरा वर्षे तुम्हींच खादला. आम्हीं जरी तुम्हाजवळी मागावे तरी बहुत दूर होतां. बऱ्या बोलें तुम्ही देणार नव्हां; म्हणून तेरा वर्षे सबूरी केली. मनामध्ये ऐसा विचार केला की, बरे महाराजांचे पुत्र तेही आहेत, खाती तोवरी खात. मालाचे धनीच आहेत. जे समयीं आम्हांला फावेल, ते समयी आम्ही वेव्हार सांगोन घेऊं. असे मनी धरोन होतो. ऐशियास राजकारणप्रसंगें, आम्हीं कुतूबशहाचे भेटीस भागा नगरास गेलों. तेथून कर्नाटकांत गेलों. चंजीस आलो. चंजी घेतली व येलूर तर्फेचा मुलूख घेतला व सदर खानास ( शेरखा-नास ) झगड्यांत मोडून गर्दीत मेळवाले. सदर खानाचें हातीं मुलूख होता तेवढाही घेतला. त्यावरी मजला दरमजल कावेरी तीरास गेलों.

तेथून तुम्हांस पत्रें लिहिलीं कीं, राजश्री गोविंदभट गोसावी व राजश्री काकाजीपंत व राजश्री निळोबा नाईक व राजश्री रंगोबा नाईक व तिमाजी यक्षियावर राऊ असे भले लोक आम्हांपासीं पाठविणें म्हणून तुम्हांला बहुता रीती लेहून पाठविलें. त्यावरुन तारहु भले लोक आम्हापासीं पाठवून दिले. त्या भल्या लोकांसीं बहुतां रीतीं घरोबियाचा व्यवहार सांगून, आमचा अर्धा वाटा आम्हास बऱ्या बोलें द्या, म्हणून सांगून पाठविले. व त्याबराबरी राजश्री बाळंभट गोसावी, राजश्री कृष्ण ज्योतिषी व कृष्णाजी शेखजी असे आपले तर्फेनें भले लोक दिल्हे. हे भले लोक तुम्हां जवळीं जाऊन बहुतां रीतीं बोलले कीं, गृहकलह करूं नये. आपला अर्धा वांटा मागतात तो द्यावा. असें बोललें. परंतु कपटबुद्धी तुह्मीं ऐसी मनीं धरिली की, या समयांत आम्हीं थोर राजे जालो आहोंत. आम्हासी आपण खांसा भेटीस येऊन आम्हाजवळ नरमी बहुत दाखवावी, आणि आमचा वाटा बुडवावा. तेरा वर्षे सारे राज्य आपणच खादले. पुढेंही आपणच सारे राज्य खावे, अशी बुद्धी मनी धरून, वांटियाचा निवाडियाचा तह न करता आपण खांसाच आमचे भेटीस आलें. यांस आमची व तुमची भेट जाहली. त्या उपरी आम्हीं बहुतां रीतीं तुम्हांसी बोलिलों की, आमचा अर्धावांटा द्या. परंतु तुम्हीं वांटा द्यावा हा विचार मनीं धराचना. मग जरूर जाहलें कीं, तुम्हीं धाकटे भाऊ आपण होऊन आमचे भेटीस आल्यास तुम्हांला धरावें आणि वाटा मागावा ही गाष्ट थोरपणाचें इजतीमध्यें लायख नव्हे. या निमित्त तुम्हांला चंजाउरास जाण्याचा निरोप दिला. तुम्हीं चंजा-उरास गेलेती. त्याउपरी गृहकलह वाढवूं नये, वाढविल्यानें पहिलें

युगी पांडव कारव बहुत कष्टी जाले. ते सारी भारताची कथा मनांत आणून, गृहकलह वाढविलीयां उभयपक्षीं कष्टी होइजे ऐसें मनांत जाणून राजश्री श्यामजी नाईक व कोन्हेरीपंत व शिवाजी शंकर या हाती मागतें बहुता रीतीं सांगून पाठविलें कीं, तुम्हीं व आम्हीं वाटे करून घेऊं; परस्परें समाधानें राहूं. परंतु तुम्ही, दुर्योधनासारखी दुष्ट बुद्धी धरून संधि न करावा, युद्ध करावें, ऐसेच मनी धरिलें. ऐशियास आम्हाला रायगड प्रांतें बहुत कांहीं कार्य होतें. या निमित्तें चिरंजीव संताजी भोसले, व राजश्री रघुनाथपंत व राजश्री हंबीरराव असे ते प्रांतीं ठेवून आम्ही स्वार होऊन तोरगळ प्रांतास आलों. येथें अशी खबर ऐकिली की, तुम्हीं तुरूक लोकाच्या बुद्धीस लागून आमचे लोकाशी झगडा करावा ऐसे मनी धरून, आपली सारी जमेत एकवट करुन आमचे लोकावर पाठवून दिलेती. ते वालगोंडपुरास आले. तुमचे लोक चालून आल्यावर तुमचे आमचे लोकात थोर झगडा जाला. तुमचे लोक पराजय पावले. प्रतापजी राजे व भिवजी राजे व शिवाजी डबीर ऐसे तिघे धरले, व किती एक लोक मारले. किती एक लोक पळून दाणादाण होऊन गेले. ऐसा समाचार ऐकिला. हे ऐकून बहूत नवल ऐसें वाटले की, कैलासवासी महाराज, त्यांचे तुम्ही पुत्र बहुत थोर लोक, ऐसे असून कांही विचार करीत नाही व धर्माधर्म विचारीत नाही. ऐसे असता कष्टी व्हाल याचे नवल काय ! तुम्हीं म्हणाल की कैसा विचार करावा ? तरि ऐसा विचार करावा होता की, अधर्मे करून तेरा वर्षे आपण सारें राज्य खादलें ते खादलें. आतां अर्धा वांटा मागतात, तो त्यांचा त्यांला द्यावा, आणि आपण सुखी राहावे. ऐसा करावा होता. दुसरा विचार करावा होता कीं, श्रीदेवाची व श्रीची कृपा त्यावरी पूर्ण जाली

आहे. दुष्ट तुरुंकाला ते मारतात. आपल्या सैन्यांत तुरक लोकच असतां जय कैसा होतो, आणि तुरुक लोक कैसे वाचूं पाहतात. हा विचार करावा होता; आणि युद्धाचा प्रसंग पाडावा नव्हता. परंतु दुर्योधनासारखी बुद्धी करून युद्ध केलें आणि लोक मारविले. जे जाहले ते जाहले. पुढे तरी हट्ट न करणें. तेरा वर्षे तुम्ही सारे राज्य खादले तें खादलें. याउपरी कितेक प्रांत आमचे आम्ही घेतले असेत. अरणी, बंगरुळ, कोलार, हसकोट, शिराळकोट व चिरकोळ जागे व चंजाऊर असे जे जागे तुमचे हाती उरले आहेती, ते आमचे लोकाचे हाती देणें; आणि जमेत, पैका व जडाव व हत्ती व घोडे यांचा अर्धा वांटा देणें. ऐसा विचार करून आम्हांसी संधि करणें. तुम्ही ऐसा निर्मलपणे संधि केलीया, आम्ही आपणापासून तुम्हाला तुंगभद्र अल्याड पन्हाळे प्राते तीन लक्ष होनाची दौलत देऊं. अथवा आम्हाजवळील दौलत तुम्हाला मानेना, तरी कुतुबशहास अर्ज करून त्यापासून तुम्हास तीन लक्षाची दौलत देऊं. असे दोनही विचार तुम्हाला लिहीले आहेती. या दोनहीमधील एक मनी धरून मान्य करणे. हट्टाचे हाती न देणे. आपल्या आपल्यांत आपण कलह करावा आणि कष्टी व्हावे याचे काही प्रयोजन नाही. याउपरी तरी आमचा आपला संधि व्हावा. ऐशी बुद्धी मनीं धरून वाटीयाचा व्यवहार निर्गमून टाकणें. आणि सुखी राहणे. गृहकलह बरा नव्हे, आम्ही रीतीने वडीलपणें आजवरी तुम्हाला सांगितलें, आताही सागतों, ऐकाल तरी बरे. तुम्ही सुख पावाल न ऐकाल तरी तुम्हीच कष्टी व्हाल. आमचे काय चालते ? बहुत काय लिहीणें. " ( मोर्तब )

---

## परिशिष्ट ५ वें.

### तहाचीं कलमें. ( १६७८ )

( २ )

१ " सोईरे मानकरी याचा बंदोबस्त माफक करून, अपमान होऊं न देता आदर ठेवीत जावा. वामांत वागवूं नयेत.

२ दरकदार मंडळी व कामदार याचे इतल्याशिवाय कामकाज होऊं नये. बरी वाईट सल्ला विचारीत जावी. इतबारी असेल त्याजपासोन काम घ्यावें. परंतु लौकीकांत याचे हातीं कांहीं नाहीं असे दिसण्यात येऊं नये, दरखात खलेल करूं नये. भूपण देऊन चालवावे.

३ शागिर्द पेशा मंडळी चांगली कुलीन, इमानी, इतबारी, पाहून जामीन घेऊन जवळ बाळगांवे. कृपेत ठेवावे. बातमी सर्वाठायींची राखावी. परंतु त्यांचें ऐकितात असें दुसरीयास कळो न देतां जरनेंत वागवून नाजूक कामी सर्व चाकरी घेत जावी.

४ शत्रुमित्राचे ठायीं संस्थानमाफक वकील व हरबातमीदार ठेवून दुसरीयास न समजता, सर्व जागेंतील बातमी वरचेवरी येऊन पोहोचत असावी. यांस अंतर नसावे.

५ घरपागा, शिलेदार, पथके यांचे काम पाहून योग्यता ठेवावी. उगेच घोडे माणूस हुशार राखावें. शिलेदार घोड्याघोड्याचें असतील, त्यांस पागा पेठ्यांत ठेवून त्यांची सरबरा करून चाकरीचा राबता नित्य ठेवावा, म्हणजे हुषारी राहाते. नाहींतरी गाफिली येऊन, परचक्र आलें असता नाश होतो. यास्तव पागा, तोफा वगैरे कारखाने सर्व कायम ठेवावे.

६ दुष्ट दुरात्मे निग्रही हिंदुद्वेषी, चोरटे, चहाड, सोदे, फितवेकरी दरवडेकरी, दावेकरी, मद्यपी, हिंसक, त्यांसी आपले राज्यांत ठेवू नये. ठेविल्यास जामीनदंड घेऊन दिक हरकत होऊं नये, येविषयी बंदोबस्त पक्का राखावा. यांची गाफिली करूं नये.

७ अहदनामे, तह, लहान थोराशी केले, त्याचा तंटा पडूं नये. गोरगरीब अनाथ यांचा अभिमान धरून चालवावे, देववावें, हरकत न होय ते करावे.

८ धर्मादाय, देवस्थाने, अग्रहारे चालत आल्याप्रमाणें चालवीत जावीं त्याचा उच्छेद होऊं नये. बंदोबस्त चांगला ठेवीत जावा.

९ कजिया, तंटा, बखेडा, भाऊपणा, देणेंघेणें, वादी-फिर्यादी यांची पंचाईत, सोपणे, वाजवी करणें, लांच न घेतां इनसाफ तोडणे गोरगरीब याचा अभिमानी सरकार, मायबाप, त्यांनीं मनावर घेऊन उलगडा करावा. त्याचा लोभ पैशाचा धरूं नये. धरला असता वाईट.

१० वचन प्रमाण, अभय देणें, त्याशी पुन्हा दंडेली करणे, हे आपले कुलांत जाले नाहीं व पुढें होऊं नये.

११ किल्ले अरणी हा महाल वेदो भास्कर यांसीं पूर्वी महाराजांनीं दत्त दिल्हा आहे. त्यांस पुत्र आठजण आहेत. त्यांचे उचितास येऊन चाकरीवरी राहिल्यास उत्तम न राहिले म्हणून महालास इजा चाकरीबद्दल म्हणून उपद्रव देऊं नये. दोन रुपयांची लाढ्च ठेवूं नये.

१२ विजापुराकडून सनदी अंमल आहे. कांहीं दौलताबादकराकडून इकडे येतां त्यांचा अंमल तहात घेतला. त्याखेरीज जरबेने कित्येक पाळेगार बसांत आणून खास अंमल केला. त्यांत इजमायली

जमेंत कमकसर आहे. तशी विजापुरकराकडे पांच हजार फौजेनिशी चाकरी करावी लागते. त्यांस पांच हजार फौजेनिशी चाकरीचे वल्म, आमचा त्याचा तह जाला त्यांत आम्हीं चाकरी करणार नाहीं, वख्तशीर मदत देऊं, इमाने इतबारे मेहनत करूं, असे तीर्थरूप असतां ठरले आहे. त्यास चाकरी तुम्हाकडे नाहीं. सबब, चाकरीबद्दल वख्तशीर काम लागेल, त्या समयीं तुम्हीं फौज देत जावी. न दिल्यास त्याचा जाब तुम्हास विचारूं. खर्च पडेल त्याचा पैसा घेऊं.

१३ वरघाटी, हिंगणी, बेरडी, देऊळगांव वगैरे पाटिलक्या आहेत, व देशमुख्या व नाडगौडया वगैरे वडिलार्जित वतनें आहेत. त्याविशी तुम्हीं बोलूं नये. आम्हीं वहिवाटूं.

१४ वख्तशीर माणूस इकडील तिकडे, अगर तिकडील इकडे आल्यास परस्पर संभाळोन, त्यांचा संतोष राखोन, समजूत करून, खुलासा करून जिकडील तिकडे सोपावें त्याविशी हरकत करूं नये.

१५ परगणे बेंगरूळ आम्हीं सोडविले, त्यास आसपास ठाणीं हासकोटें, व सिलेकोटें ऐसे तीन महाल, दोन लाख वराईचें उत्पन्न आज आहे. जमेवर आल्यास पाच लाखांपर्यंत उत्पन्नास येतील. त्यास आम्ही आपले तर्फेने चिरंजीव सौ. दीपाबाईस चोळीबांगडीस दिले आहेत. त्यास याचा विभाग तुमचे वंशानीं करूं नये. मुलीनीं परंपरा आपले खाजगी खर्चांत ठेवावे, त्याची चौकशी तुम्हीं राखीत जावी, सौभाग्यवती देतील त्याणी खावेत.

१६ चंदी प्रांतानजीक आम्ही प्रांत सोडविला. त्यापैकीं सात लाख होनांचे महाल चीरंजीव राजश्री व्यंकोजी राजे यांस दूध भाताकरितां इनाम परंपरेनें चालण्यास दिल्हे आहेत. त्यास त्यांची याद तुम्ही करून पाठवाल, त्याप्रमाणे मजुरा देऊं. सनद पाठवूं. अनुभवीत जाणे.

१७ तुमचा चोर आमचे राज्यात आला, तरी तुमचा तुम्ही मागितल्यास देऊं, तसा आमचेकडील हरामखोर आल्यास तुम्ही आमचे स्वाधीन करावयास अंतर करूं नये.

# परिशिष्ट ६ वें.

## व्यंकोजीस समाधानाचें पत्र. ( १६८० )

( ३ )

श्री.

श्रियासह चिरंजीव अखंडित–लक्ष्मीअलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री महाराज व्यंकोजी राजे प्रती राजश्री शिवाजी राजे आशीर्वाद येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन करणें. विशेषः–कित्येक दिवस जाले, तुमचे पत्र येत नाहीं. याकरितां समाधान वाटत नाहीं. सांप्रत राजश्री रघुनाथपंतीं लिहीलें कीं, तुम्ही आपले ठायीं उदास वृत्ती धरून पहिले सारखे आपले शरीर संरक्षण करीत नाहीं. सणवार उत्सवादिक हेंही कांहीं करीत नाहीं. सेना बहुत आहे, परंतु उपयोग करून कार्यप्रयोजन करवावें हेंहि कांही करीत नाहीं वैराग्य धरलें आहे. एखादे तीर्थीचे बसून कालक्रमणा करूं, ऐशा गोष्टी सांगता म्हणोन विस्तारे लिहीले होतें. तरी या गोष्टी आम्हास बहुत अपूर्व वाटल्या कीं कैलासवासी स्वामीनीं कसे कसे प्रसंग पडले निवाह करून, यवनांच्या सेवा करून आपल्या पुरुषार्थें बाजी सांवरून, उत्कर्ष करून घेतला. शेवट बरा निर्वाह केला, तें सर्व तुम्हीं जाणता. त्यांच्या साह्यतेस त्यांच्या बुद्धी युक्ती सर्वही तुम्हांस उपतिष्ठोन त्यापासून शहाणे झाला आहां. त्याउपरी आम्हीही जे जे प्रसंग पडले, तें निर्वाह करून कोणे तऱ्हेनें राज्य मिळविले, हें जाणता व देखत आहा. असे असोन तुम्हांला ऐसा कोणता प्रसंग पडला जे इतक्याचमध्यें आपल्या संसाराची कृतकृत्यता मानून, नसते वैराग्य मनावरी आणून, कार्य प्रयोजनाचा उद्योग सोडोन,

लोकांहातीं रिकामेपणी द्रव्य खाऊन, नाश करवणे व आपल्या शरीराची उपेक्षा करणें. हें कोण शहाणपण व कोणती नीती ? व आम्ही तुम्हांस वडील मस्तकीं असतां चिंता कोणे गोष्टीची आहे ? याउपरी सहसा वैराग्य न धरितां मनांतून विषण्णता (काढून) कालक्रमणा करीत जाणे. सणवार उत्साह पूर्ववत करीत जाऊन तुम्हीं आपलें शरीर संरक्षण बरें करीत जाणें. जमेती सेवक लोकांना रिकामें न ठेवून कार्य प्रयोजनाचा उद्योग करून, पुरुषार्थ व कीर्ती अर्जणे. तुम्हीं त्या प्रांते पुरुषार्थ करून संतोषरूप असलीया आम्हांस समाधान व श्लाघ्य आहे कीं कनिष्ठ बंधु असे पुरुषार्थी आहेत. रा. रघुनाथ पंडित त्या प्रांती आहेती. ते कांहीं इतर नव्हेती. आपले पुरातन. तुम्हासी कोणे रितीनें वर्तावे हें निपुण जाणितात. आम्हास मानितात तैसे तुम्हास मानितात. आम्हीं त्यांचे ठायीं विश्वास ठेविला आहे. तैसा विश्वास तुम्हींही ठेवून कार्यप्रयोजनास परस्परे अनुकूल व साह्य होऊन वर्तत जाणे. पुरुषार्थ व कीर्ती अर्जणे. रिकामे बैसोन, लोकांहातीं नाचीज खाववून, काल व्यर्थ न गमावणें. कार्य प्रयोजनाचे दिवस हे आहेती. वैराग्य उत्तरवयी कराल ते थोडे. आज उद्योग करून आम्हांसही तमासे दाखविणे. बहुत काय लिहिणें. तुम्हीं सुज्ञ असा. "( मोर्तब. मर्यादेयं विराजिते ).

---

# परिशिष्ट ७ वें.

विद्याप्रिय नृपावलि

## राज्यकर्ते, त्यांच्या कारकीर्दीचें शतक, त्यांच्या पदरीं असलेले विद्वान् आणि त्या त्या कालांत झालेली ग्रंथनिष्पत्ति.

गायकवाडांच्या पौरस्त्य ग्रंथप्रकाशनमालेंतील ४९ ज्या क्रमांकाच्या शब्दरत्नसमुच्चय कोशांतील उतारा.

# परिशिष्ट ७ वें.

हें पत्रक गायकवाडांच्या पौरस्त्य ग्रंथप्रकाशन मालेंतील ४९ व्या क्रमांकाच्या शब्दरत्नसमुन्वय कोशांतून घेतलेले आहे.

| क्रमांक | राज्यकर्ता | विशिष्ट शतक | पदरचे विद्वान् | ग्रंथनिष्पत्ति |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | विक्रमादित्य | ५ वें | १ अमरसिंह | नामलिंगानुशासन |
| | | | २ वररुचि | नाममाला |
| | | | ३ महाक्षपणक | अनेकार्थध्वनी मंजरी |
| | | | ४ कालिदास | नानार्थशब्दरत्न |
| २ | मान्यखेटाचा ३ रा कृष्णराज | १० वें | १ हालायुध | अभिधानरत्नमाला |
| ३ | भोज | ११ वें | १ निकुलकवि योगींद्र | तरला ( नानार्थशब्दरत्नावरील टीका ) |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ काश्मीरचा जयसिंह | १२ वें | १ मणरव | अनेकार्थकोश |
| ५ बंगालचा लक्ष्मणसेन | ,, | १ पुरुषोत्तम | त्रिकाण्डशेश. एकाक्षरकोश. द्विरूपकोश. वर्णदेशना. हारावळी. |
| ६ श्रीधर ( सेना वंशज मनुसेनाचा पुत्र ) | ,, | १ श्रीधर ( स्वतःराजा ) | मुक्तावली किंवा विश्वलोचन |
| ७ गुजराथचे राजे<br>१ जयसिंह व<br>१ कुमारपाल | ,, | १ हेमचंद्र | अभिज्ञान चिंतामणी. अनेकार्थ संग्रह. निघंटुशेष, देशीनाममाला. |
| ८ गंग ( ओरीसाचा राजा ) | १३ वें. | १ मेदिनीकर ( क्षत्रप ) | मेदिनीकोश |
| ९ राजराज ( कुलोत्तुंग चोलाचा पुत्र ) | १२–१३ वें. | १ केशवस्वामी | नानार्थार्णवसंक्षेप |
| १० मदनपाल | १४ वें. | १ मदनपाल ( स्वतः ) | मदनपालनिघंटु ( ओषधीग्रंथ ) |
| ११ विजयानगरचा २ रा. हरिहर | ,, | १ माधव ( मयनपुत्र ) | एकाक्षरनाममाला |
| १२ अकबर बादशहा | १६ वें. | १ भानुचंद्र गणी ( सुरचंद्राचा शिष्य ) | विविक्तनामसंग्रह |

हें पत्रक गायकवाडांच्या पौरस्त्य ग्रंथप्रकाशन मालेतील ४९ व्या क्रमांकाच्या शब्दरत्नसमुन्वय कोशांतून घेतलेलें आहे.

| अनुक्रमांक | आश्रयकर्ता | विशिष्ट द्योतक | पदरचे विद्वान् | ग्रंथनिष्पत्ति |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | २ कृष्णदास | पारसीक प्रकाश ( पार्शी-संस्कृत ) |
| | | | ३ पुंडरीक विठ्ठल | शीघ्र बोधनाममाला |
| १३ | भारतमल्लिका | ,, | भारतमल्लिका | मुग्धबोधिनी ( अमरकोशावरील टीका ) |
| | | | | द्विरूपध्वनि संग्रह |
| | | | | एकवर्णार्थसंग्रह |
| | (करीहर प्रांताचा जमीनदार) | | | |
| १४ | मूर्च्छा ( मक्का ) खान | १७ वें. | १ मथुरेश | शब्दार्थ रत्नावली |
| १५ | कीर्तिसिंह ( बागेल अधील अहीपारविषय राजाचा पुत्र ) | ,, | १ भानूजी दीक्षित | सुधा ( अमरकोशावरील टीका ) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १६ जोधपूरचा सूर्यसिंह | ,, | १ | वल्लभगणी ( भट्टोजींचा पुत्र ) | सारोद्धार ( हेमचंद्राच्या अभिधान चिंता. मणीवरील टीका ) |
| १७ छत्रपति शिवाजी | ,, | १ | रघुनाथपंडित | राजव्यवहारकोश |
| १८ राजधर ( त्रिपुराचा अमरमाणिक्य याचा पुत्र ) | ,, | १ | कर्णपुर | वर्णप्रकाश |
| १९ (दुसरा) शहाजी (तंजावरचा) | ,, | १ | शहाजी ( स्वतः ) | वेंकटेश्वर पदमणि मंजरी (नल्लाशास्त्री व श्रीधर व्यंकोश यांसह ) |
| | | ३ | वेंकटेश्वर | उणादि निघंटु |
| २० कृष्णकवि (लक्ष्मण व मल्लिकाराणी यांचा पुत्र ) | १८ वें. | १ | कृष्ण कवि ( स्वतः ) | वैभाविक कोश टीकेसह |

# परिशिष्ट ८ वें.

## दुसऱ्या सरभोजीच्या दानधर्माची यादी
## तंजावर चेट्टियान् काणीयाची

॥ श्री ॥

श्रीगगेशायनमः ॥ स्वति श्रीमान्महामंडलेश्वर राजाधिराज राजगंभीर भौंसलवंश कुलशिखामणी महाराजराजेश्री प्रतापसिंव्ह महाराज साहेब यांचे गर्भशिरोमणि ऐसे महाराजराजेश्री तुळजामहाराज साहेब यांचे पुत्र भव्यशीलसिखामणि ऐसे महाराजराजेश्री शरफोजीमहाराज साहेब यानी श्रीरामावतार होऊन चोळनीतीसहीं अधीक नीतीकडून राज्यपरिपालन करित असता, वटीयान् कल्वटी वगैऱ्यानी हुजूर यादी देऊन ते यादी हुजुरूनन्याय निसी माहालास पाठवून परामर्ष करिणे ह्मणून आज्ञा हाऊन यादी आल्याठायीं कल्वटीने लिहून दिल्या यादींत लिहिले होतें जें पूर्वापूर्वीपासून तंजनगर वट्टियकाणियाची आपली ह्मणून तरी ऐसीं वर्षा अगोदरीं सैदाचे कारभारीं नवे माहार तंज्यान् कोडियान् सिन्नान् यानी कोटची वटियेकाणी बांधूनघेतले ह्मणूनहीं व पूर्वेकडील पेटची वटीयेकाणियाची आपला पंगाळी परमान याची काणियाचींत थोडी बांधून घेतले ह्मणूनहीं, आतां न्यायता वारूनघेऊन द्यावें ह्मणून लिहून दिल्हा. त्यांत पेरमानानेहीं हस्ताक्षी घातला त्यास वठियान् तंजान् व कोठियान् व सिन्नान् यांस बलाऊन विचारिल्यास त्यानी लिहून दिले ते पूर्वापूर्वी पासून तंजनगर वटिमेकाणियाची आपली ह्मणून व सत्तर ऐंशी वर्षांस अगोदरी कल्वटोने तंजावरनगर वटिमे काणियाचि आपलि ह्मणून सिपारसी करून अपहरिलि; सर्वेच लटिका होऊन गेला.

अमची काणियाची अनभोगीत येतां पुनः दोनीदफे कल्वटीने व्यवहार करून लटिका होऊन गेला ह्मणून व आतां आला आहे न्यायता परामर्ष करावें ह्मणून लिहून दिल्हे. उभयता वाद्यानी लिहून दिल्यासहीं उभय वादी यानी बलावून आणिल्या साक्षींतहीं व्यवहार निवडनासें कल्वटीने लिहून दिल्हा जे कीं बृहदीश्वर स्वामींचे देउळाचे सन्निधींत तूप तावून तापल्या तुपांत तंजन्, कोडियन्, सिन्नान्यांपैकीं तंज्यनानें बोट घालून बोट जळनासें गेल्या वटिमेकाणियाची माझी ह्मणून धरिला व्यवहार हरून गुनेगारी देतों ह्मणून दिल्हा. तेणेप्रमाणें तंजनानें ताविल्या तुपांत बोट घालितों ह्मणून लिहून देऊन शालीवाहन शकाब्द १७२४ कल्यब्द ४९०३ दुंदुभी संवत्सर आडिमास तेदी ८-स श्रीबृहदीश्वर स्वामींचे देऊळाचे सन्निधींत तूप तावून तापिल्या तुपांत तंजनाने वटिमे काणियाची आपली ह्मणून कल्टीस नाहीं ह्मणून सांगून बोट घातला. बोट जळालें नाहीं. ते, कल्वटीने ओपूनघेऊन, वटिमे काणियाची माझी ह्मणून धरिलों ते व्याज्य मला गरज नाहीं. तंजन् कोडियान् व सिन्नान् यानी अनभोगूं देत ऐसें असता वटिमेकाणियाची तंजन् कोडियान् व सिन्नान् अनभोगीत यावयाचें अमची ह्मणून मी धरीलोंतें मजवरि गुना ह्मणून लिहून दिल्हा. त्यांत पेरमानानेंहीं हस्ताक्षी घातला. उभयवादी यांची यादी व हस्ताक्षी प्रमाणावरून कोठची वटिमे काणियाची कल्वटीस गरजनाहीं ह्मणून व पूर्वेकडील पेठेंत तंजन् कोडियान् सिन्नान् आज तागाईत किती अनभोगीन असतातकीं तितुके पेरुमानास गरजनाहीं ह्मणून कोट व पूर्वेकडील पेटेंत तंजन्, कोडियान्, सिन्नान् आजतागाईत अनभोगीत आल्या प्रमाणें आचंद्रार्क पुत्र पौत्र पारंपर्य तंज्यान्, कोडियन्,

सिनान्, यानीच अनभोगीत येणे; पूर्वेकडील पेटेंत तंब्यान्, कोडियन्, सिनान्, आजितागाईत अनभोगीताहेत ते जातां बाकीं पेरमानाने आजितागाईत अनभोगीत येण्याप्रमाणें पेरमानाने अनभोगीत येणे म्हणून वाहून तंब्यान् कोडियान् सिनान् यास जयपत्रिका देऊन श्रीबृहदीश्वर स्वामीचे देवळाचे शिखरी लिहिलें असें.

---

# परिशिष्ट ९

॥ श्री ॥

बृहदीश्वर स्वामी कारण राजे

## श्री शरफोजी महाराज साहेब यानी

### नग दिल्ह्यास तपसील

स्वस्ति श्री नृपशाली वाहन शकाब्द १७२० सत्तराशेवीस गतकलिः ४८९९ चारहजार आठशे नव्याणौ इस्तकबील चंद्र १५ मोहरमापासून अर्बामय्यांत नमाहरनव तागाईत श्री बृहदीश्वरस्वामी कारण राजेश्री शरफोजीमहाराज साहेब यानी नग दिल्ह्यास तपसीलः—

सनमय्यातन जडीत पदकचंद्र ९ जिलहेजर—रथारूढहोऊन वाड्याचे माहडीकडे आले असतां दिल्हे हिऱ्याचे पदक येक यासि हिरे देखील मदनाईक २४ पाचीशिरस देखील. २ माणकें; १८ लडकन्मोते ९ जर्जेरी गोफाची येकेरि सोनेरी नागमोडी प्रमाण १ "। १ ' २॥ स नग १ रुप्पेरी नग प्याला साधारण चरकीवजन " १ ' २॥। २॥। स न गचंद्र २९ शाबन १ अर्घ्य पाद्यासप्याले नकसी यास अइन प्याले २ बसक उभा २ येकून ४ स नगचद्र २९ शाबानक्रित्ताप्याला देखील बसक वजन " २॥। ' २ सं १ क्रित्ता प्यालादेखील बसक वजन " २॥। २ १ येकून २ थाबदल-चंद्र २६ रजान शंख उत्तरफाटोपण रुप्पेरि वरी मोलोमी सोनेरी लडकून मोती १ प्रोंवलें १ सोनेरी मणी १ येकून ३ येकून च्यार वजन रुप्पें " ॥। ५ २॥ स १ दरह शंखठेवावयास बसक गींद्री

तीवयी प्रमाणे वजन " ३७. २स येक येकून २ चंद्र २६ जिल-
कांड गोपूरार्ति पंचखणी वजन ४॥ ५॥। १॥ स १ अति येकपात्र
कासंड्या रुंद जोडीत्त्या कित्ता वजन " ३॥ ३॥ ॥ ० स नग
१ कित्ता वजन " ३॥ २। ०॥ सनग १ येकून २ श्रीदेवीस
कवचास किरीट नकशी १ उराचें कवच माजाखाले पासून
पोटऱ्यापर्यंत वस्त्रदेखील वस्त्राचाहोलकर्ण पत्रयास कानदेखील
मकरकुंडलें व बुगड्या व चंद्रमुरू येकून नकसी २ हातदरचुडे व
कंकण्या हातसरफण सीवाले देखील रविराव प्रमाण असे बोटास
अंगोट्या २ प्रमाणें हात येक प्रमाणें लाहान थोरहात उजवा
अभयहस्त, डावा वरदहस्त १,उजवा जपमाळ असें १ डावेस जास्ती
कमळमात्र असे १ येकून ४ पाययास पांयांचे नग देखील अस्सें
पाडघम गुजराती सांखळ्या व तोडे अनवटे, फुलें पोलारे, विरवद्या
जोडवींदेखील अशे पाय २ येकून १२ यासि सोनेरी मोलामा असे.
येकून जिनस १२स कवच पुढील वजन रुप्पे ' २॥ ' ५। २। स
नग १ येकून ४ येकून ९ येकून १० सन रहिंदे मय्यांतह रुप्पेरी
नग काळंजीयास बसक कमळाप्रमाणे हरडा देखील वरील घराटर
डा देखील मत्सूत प्रमाणें १ येकून २ स नग वरील घेऱ्यास लडकन
पान ३२ रवदर पोंवळे १ प्रमाणें पोवळी ३२ येकून ह्यस्तद वजन
" २॥ ' १॥ १। स नग चंद्र १० रबिलोवल १ तबक दौलती
प्रमाणें दिल्हें असें. चंद्र ३१ शाबानी जमाखर्च करविला असें.
येकून २ स नइस्सन्न मय्यात्तैइन जडीत नग चंद्र १४ शाबान-
शिरफूल्यास झहत हिरे मदनायक कमळ १ पलच लहान थोर १०
बारीक ८ येकून १९ माणकें १७३ पाची ३४ घेऱ्यास मोते ४८
येकून नग वजन " । ५. ' २॥ १ यास १ चांदयासशहत हिरे

पलचे २३ चाणकें ३७ पाची ३ घेऱ्यास मोते ४६ येकून वजन
" । १। १। ०॥० यास नग १ भांग टिळा यास जिनस १३ स
पदकें चंद्राकार यास २ हत मटना येकथोर गिर्दहिरा १ माणकें
१४ पाचि १ लडकन मोते ११ येकून नग १. टिका लांबोळ्या
कित्तापाची थोर १ माणक २ प्रमाणे येककित्ता दर हिरा १
माणकें २ प्रमाणे ९ यास तपसील कित्ता हिरे १ थोर चौक १
माणकें २ स १ कित्ता दर हिरा १ माणकें २ प्रमाणें ८ येकून ९
येकून १० स शहत हिरे ९ पाचि १ माणकें २० स १०
भासिंग्यास हिरा पलस १ माणके ९ येकून येक. कित्ता चौफुली
यास माणकें ४ स १ येकून १३स शहत हिरागद थोर १ चौक
४ लहान बारीक ९ येकून ११ माणकें ४१ पाचे थोर येक लाहान
१ येकून २ मोते ११ येकून रेशमीदोरेदेखील वोऊन नग १
पानपट्या साजास जडित जिनस टिका दरमाणकें तीनी प्रमाणे ४०
पानदर माणीक १ लडकनूतमोती १ प्रमाणे ४० येकून ८०
दोवणीस मोते ११६ येकून शहत माणके १६० मोते १५६ रेशिमी
दोरे देखील नग १ नाकचवसरयास माणकें १९ मोते सिरसलडकून
देखील ११ यास नग १ कापजोड १ शहत माणकें ४१ प्रमाणें
' २ हिरे २९ प्रमाणे १८ पाची कित्ता नगास २५ कित्तानगास
२८ येकून ५३ मोते घेऱ्यास ३५ प्रमाणें ५० आंतील कळ्यादेखील
जोड १ सनग २ टोपणें बाळ्याजोड १ स शहत माणकें ३२
पाची १६ मोते घोंस १६ पदर ६६ प्रमाणें मोते ९६ स नग २
कापाच्या सांखळ्या कित्ता जोड १ स कित्ता नग १ स टिका ४
गिर्ददर माणकें ६ पाची १ प्रमाणें २ भासिंगादर माणकें ६ येण

प्रमाणें २ येकून ४ मोते घोंस वासास ८० मध्य २३ येकून १०३ सनग १ कित्तास नग सदरह प्रमाणें १ येकून २ यास जोड १ स नग २ कित्ता जोड १ स टिका १६ हिऱ्याचे दरहिरा १ प्रमाणें ८ माणकाची दर माणकि १ प्रमाणें ८ येकून १६ मोते घोंस ३२ सदर पाच प्रमाणें १५० घोस ४ सदर ७ प्रमाणें २८ येकून १८८ येकून २०४ येकून सोनेरी आंकोड प्रमाणे नग २ येकून ४ येकून १३ सोनेरी नग चंद्र १४ शाबान मदनकसी कोडी रुप्पेरी रेसिमि तिप्पदरी प्रमाणें १ राखडी नकशी मथापूल जडितयास माणकें ८ पाचे पदनायक १ पाटी कोंडी रुप्पेरी प्रमाणे नग १ वेर्णाचा साज यास नाग पांचाफडीचा नकशी यास मोते माथा ५ लडकून ५ शेंड्यासी १ येकून ११ कोंड्या सोनेरी प्रमाणे १ ताइत दुहेरी नकसी कोंड्या सोनेरी १ फुले नकसी कुरीवचें वंदरी दरमाणिक येक प्रमाणे माणकें १५ स १५ कहिरी नकसी १ मासोळी नकसी १ चांपे कळी नकसी १ येकून २० लाल रेशिमांत वोऊन समूद नग १ चंद्र २९ जिल्हेजी अष्टोत्तर शतलिंग प्रतिष्टेचे दिवसी मंगळसूत्र देवीस सोनेरी कांबींत वोवून दिल्हे असें. वजन "।०॥१॥ सनम १ येकून ४ रुप्पे रीनग चंद्र २९ रबिलाखर चौकीस टावणीची वजन रुप्पें "७॥५॥ सनग १ राव नकसीयास १ नरीव १ बलक कमळाचादेंट कमळाचादेंट वांकडा येकून पोरवार वर मोलामा सोनेरी लडकून तोंडांत पोंवले थोर १ येकून वजन रुप्पें " २०।२ येकून २ चंद्र १४ शाबान कापुरार्तीची तबकडी "॥ ' १॥० धूपार्ती "॥०॥०। येकार्ती "।५ ' १।० पंचार्ती वजन " ॥ १ ॥ २।० येकून ४ चंद्र ३ वउदकारडा दांडी नकसीस जोडी वसज्यांची नकसीची नकसी मोलामा सोनेरी प्रमाणें नग १

येकून ७ स भार घांट कांशाची मुठी वृषभ रुप्पेरी प्रमाणें चंद्र १४ शाबान १ येकून २५ येकून ३७. यास तपसील जडित नग पदक हिऱ्याचे १ शिसफूल १ चांद १ भाग टिळासाच १ पानपट्टया साज १ बेसर १ काप जोड १ सनग २. टोपणबळ्या जोड १ सनग २ कापाच्या सांखळ्या जोड २ सनग येकून नग १४. सोनेरी नग मूद १ राखडी १ वेणीचा साजा—गरसोळी देर्खालएरी प्रमाणे १ येकून ४. रुप्पेरी नग १८ स तपसील—प्याले तीनीस कित्ता साधाप्याला १, कित्ता नकसी बसक देखील जिनस ४ स २, येकून ३ शंखटोपणाचा मोलामा सोनेरी प्रमाणे १ शंखाची १. कापुरार्ती पंचरवणी १ कासड्या २ कवचमोलामा सोनेरी प्रमाणे जिनस १२ स १ काळंजी १ तबक १ ताका १ रावा मोलामा सोनेरी प्रमाणें येक कापुरार्तीची तबक १ चंपार्ती १ येकार्ती १ पंचार्ती कारडा १ येकून १८ सुमार. घांटकांशाची; वृषभ रुप्पेरी. येणेप्रमाणे येकून नग ३७ समाप्त ॥ शुभमस्तु

---

॥ श्री ॥

स्वस्तिश्री शालीवाहन शकाब्द १७२३ सत्तराशे तेवीस गत कली ४९०२ चारिहजार नौशेदोनि याउपरि चालायाचे दुर्मतिनाम संवत्सर वैशाखमास तारीख ३ शुक्लपक्ष द्वितीया गुरुवार रोहिणी नक्षत्र युक्त शुभदिनी राजेश्री शरफोजी महाराज कृत श्रीबृहतीश्वर-स्वमीचे देउळांत त्रिपणीचे काम चालल्यास तपसीलः—

गणेशाचे देउळ गर्भग्रह उपाज कोरडा पासून कफोद तागाईत पांढरे धोंड्याचे काम नूतन करून वर स्तूबी तागाईत इटाचे काम करून गच्चाचे विग्रह करून रंग देऊन नूतन गणेश करवून कलश

ठेऊन कुंभाभिषेक करून अर्धमंडप महा मडप पांडरें धोंड्याचे बांधून इटाचे कोडग ठेऊन वरी इटाची दळवशीं घालून गच्च करून मंडपांत पांढरे धोंड्याची दळवशीं १५० गज घालून गच्च करून पाइऱ्या बांधल्या असती १.

सुब्रह्मणी स्वामीचे गोपूर कफोद पासून स्तूबी तागाईत दागदोजी करून गच्चाचे विग्रहें करून रंग देऊन नूतन कलश ठेऊन कुंभाभिषेक करून अर्ध मंडप महामंडपावरी इटाची दळवशीं घालून गच्च करून पुढील मंडपांत पांढरें धोंड्याने ३०० गज दळवशीं घालून मंडपाचे चारी बाजूच्या भिंती इटाने घालून पाइऱ्या दागदोजी केल्या अस्से ती १.

देवींचे देउळ गर्भ गृहावरी अंतस्त ३ अर्ध मंडप १ महा मंडप १ भैरव मंडप १ समोरील नदीमंडप १ येकून मंडप ७ सात मंडपहीं वरीइटाची दळवशीं घालून गच्चकरून महामंडपांत सन्निधीस दक्षिण उत्तर दोनी बाजूस कोरडावरी पांढरे धोंड्याची दळवशीं २०० गज नूतन घातिली अस्से १.

देवींचे देऊळ अर्धमंडप १ महा मंडप १ येकून दोनी मंडपागरी इटाची दळवशीं घालून गच्च केला असे १.

सभापतीचा मंडप अर्धमंडप १ महा मंडप १ येकून दोनी मंडपावरी इटाची दळवशीं घालून गच्च करून मंडपाचे भिंती गच्च करून पांढऱ्या दागदोजी करून मंडपांत २०० गज पांढरे धोंड्याचे दळवशीं घातली असे १.

दक्षिणामूर्तीचे गोपुरास कफोद पासून स्तूबीतागईत दागदोजी करून रंग दिला असे १.

चंडीश्वर स्वामीचे गर्भग्रह कफोद पासून स्तूबी तागाईत दागदोजी करून विग्रह करून रंग देऊन नूतन कलश ठेऊन कुंभाभिषेक करून, मंडपावरी इटाची दळवशीं घालून गच्च केला असें १.

देउळास ईशान्य भागीं त्रिमाळ पतीस लागून यागशालेस पांढर धोंडयाने नूतन बांधिला मंडप अंखण ४ याखेरीज मंडूकतीर्थ जीर्णोत्धार कूपरूप करून नूतन केले असें.

त्रिमांळपत्ती ईशान्यभागीं अंखणें २६ नैऋत्य भागीं अंखणें २४ येकून पन्नास अंखणें पांढरे धोंडयाचे काम नूतन करून वरकड त्रिमाळपत्ती येकंदर जद्द जाहल्याठायीं पाकळ घालून इटाची दळवर्शी घालून गच्च करुन मंडपास उत्तरेकडे पश्चिमेकडे दोनी ठाई इटाची दळवर्शी घालून गच्च करून मंडपास उत्तरेकडे दोनी ठाई इटाची दळवर्शी घालून गच्च करून प्राकाराचे च्यारी भिंतीसहीं आंतीलंर्गा गच्च केला असे त्रिमाळ पत्तींत नैऋती कोने पासून ईशान्य तागाईत शिवलिंग २४१ देवि १ येकून २४२ ठेऊन कुंभाभिषेक करून प्रतिष्ठा केली असे.

मडपळीचे मंडपास व भिंतीस देखील इटा घालून गच्च केला असें. दक्षिणेकडील प्राकारांत पूर्वेकडील त्रिमाळपत्तीचे कोरडा पासून पश्चिमेकडील त्रिमाळपत्तीच्या कोरडातागाईत बागास नूतन भिंती इटाचो घालून गच्च केल्या बाबत्ती गज २६० अडव्या भिंतसि गज ९० येकून गज ३५० नूतन भिंती घातिली असें. उत्तरेकडील प्राकारात देवीचे देउळाचे बागास भोंताले इटाची भिंती घालून गच्च केल्या बाबती गज १५० देउळचे च्यारी प्राकारात नूतन इटाच्या दळवर्शीमध्यें पांढरें धोंडयाची दळवर्शी घातले गज १५०० याखेरीज इटाची दळवर्शी तीनीइटा उंचीने घातिली १८०० येणे प्रमाणे दळवर्शी घालून चहूंकडिल पाणी खंदकांत जाऊन पडावयाजोगि मोरी बांधला असें. १

दरवाज्याच्या गोपुरा समोर अष्टकोडीचे खांबास कोरड पांढरे धोंडयाने सव्वा गज उंच तीन गज चौक, नूतन बाधिला असें.

# सूचि

